

# आपला महाराष्ट्र

परंपरा व प्रगती

मंगल देशा! पवित्र देशा! महाराष्ट्र देशा ।
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्रदेशा ।। धृ ।।

राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा ।
नाजुक देशा, कोमल देशा, फुलांच्याहि देशा ।।
अंजनकांचनकरवंदीच्या काटेरी देशा ।
बकुल फुलांच्या प्राजक्तीच्या दळदारी देशा ।।
भावभक्तिच्या देशा, आणिक बुद्धीच्या देशा ।
शाहीरांच्या देशा, कर्त्या मर्दांच्या देशा ।।

ध्येय जे तुझ्या अंतरी
निशाणावरी
नाचते करीं ।
जोडी इहपरलोकांसी
व्यवहारा परमार्थासी
वैभवासि वैराग्यासी ।।

जरिपटक्यासह भगव्या झेंड्याच्या एकचि देशा ।
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्रदेशा ।। १ ।।

# श्री महाराष्ट्र गीत

अपर सिंधुच्या भव्य बांधवा! महाराष्ट्रदेशा ।
सह्याद्रीच्या सख्या! जिवलगा! महाराष्ट्रदेशा ।।
पाषाणाच्या देही वरिसी तू हिरव्या वेषा ।
गोदा, कृष्णा, भीमा तुझिया ललाटिच्या रेषा ।।
तुझिया देही करी प्रतिष्ठा प्रथम प्राणांची ।
मंगल वसती जनस्थानिची श्रीरघुनाथांची ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। २ ।।

भिन्न वृत्तिची भिन्न भिन्न ही एक जीवसत्त्वे ।
तुझिया देही प्रकट दाविती दिव्य जीवतत्त्वे ।।
चित्पावन बुद्धीने करिसी तू कर्तबगारी ।
देशस्थाच्या खुल्या दिलाची तुजला दिलदारी ।।
कायस्थांचे इमान फिरवी रक्ताचा फेर ।
ठोक मराठी मनगट दावी तुझे हाडपेर ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। ३ ।।

ठायी ठायी पांडवलेणी सह्याद्रीपोटी ।
किल्ले सत्तावीस बांधिले सह्याद्रीपाठी ।।
तोरणगडचा, प्रतापगडचा, पन्हाळगडिचाहि ।
लढवय्या झुंझार डोंगरी तूच सख्या पाही ।।
सिंधुदुर्ग हा, विजयदुर्ग हा, ही अंजनवेल ।
दर्यावर्दी मर्दुमकीची ग्वाही सांगेल ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। ४ ।।

तुझ्या भुकेला वरी नागली आणिक कणिकोंडा ।
वहाण पायी अंगि कांबळी उशाखालि धोंडा ।।
विळा कोयता धरी दिगंबर दख्खनचा हात ।
इकडे कर्नाटक हासतसे, तिकडे गुजरात ।।
आणि मराठी भाला घेई दख्खन कंगाल ।
तिकडे इस्तंबूल थरारे, तिकडे बंगाल ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। ५ ।।

रायगडावर माय जिवाची गवळण बिनधोक ।
झोक हिरकणी नाव ठेवुनी जाइ रोखठोक ।।
करीत पावन अर्पुनि पंचप्राणांचा पिंड ।
हिरडस मावळचा श्रीबाजी, ती पावनखिंड ।।
करी रायगड रायरिचा तो जिजाइचा तान्हा ।
कोंडाण्याचा करि सिंहगड मालुसरा तान्हा ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। ६ ।।

रसवंतीच्या पहिल्या बाळा मुकुंदराजाला ।
पहिलावहिला अष्टांगांनी प्रणाम हा त्याला ।।
शहर पुण्याच्या, शिवनेरीच्या, पंढरिच्या देशा ।
पुंडलिकाच्या, शिवरायांच्या, टिळकांच्या देशा ।।
अनंत कोटी ग्रंथ रचुनिया जोडि तुझ्या नामा ।
वाल्मीकीचे शतकोटी यश विष्णुदास नामा ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। ७ ।।

मयूर कविच्या पूर्ण यमकमय महाराष्ट्रदेशा ।
कवि कृष्णाच्या निर्यमका हे महाराष्ट्रदेशा ।।
देवी ज्ञानेश्वरी करि जिथे भक्तीचा खेळ ।
तिथेच गीतारहस्य बसवी बुद्धीचा मेळ ।।
जिथे रंगली साधीभोळी जनाइची गाणी ।
तिथेच खेळे श्रीपादांची कलावती वाणी ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। ८ ।।

विकावयाला अमोल असली अभंगमय वाणी ।
करी तुझी बाजारपेठ तो देहूचा वाणी ।।
तुला जागवी ऐन पहाटे गवळी गोपाळ ।
धार दुधाची काढित काढित होनाजी बाळ ।।
मर्दानी इष्काचा प्याला तुझा भरायासी ।
उभा ठाकला सगनभाउ हा शाहुनगरवासी ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। ९ ।।

प्रभाकराची जडणघडण कडकडित म्हणायाला ।
दो हातांचा मुजरा माझा तुळशीरामाला ।।
भीमथडीहूनि चहुमुलखावर फिरले धारकरी ।
भीमथडीवर चहुमुलखातुनि जमले वारकरी ।।
आळंदीच्या ज्ञानोबांची भिंत घेत धाव ।
पुंडलिकाचे नाव चालवी दगडाची नाव ।।
गोलघुमट घुमवीत सारखा नवलाची भाक ।
जेजुरीवर चढी पायरी उभी नऊ लाख ।।
ध्येय जे तुझ्या अंतरी ।। १० ।।

(अपूर्ण)




छाया : रामदास एम्. कुमठाकर

*सोनियाचा दिवस : १ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्याच्या उद्घाटनप्रसंगी स्वरसम्राज्ञी लता मंगेशकर महाराष्ट्रगीत गात असताना. बाजूला उद्घाटक पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू व संगीत दिग्दर्शक वसंत देसाई*

# संदेश

२५ वा वर्धापनदिन सोहळा हा व्यक्तीचा असो किंवा संस्थेचा असो तो प्रवासातला एक महत्त्वपूर्ण टप्पा असतो. लक्षावधी लोकांच्या आशाआकांक्षांना मूर्त स्वरूप देणाऱ्या कल्याणकारी राज्याचा रौप्यमहोत्सव म्हणजे तर समाज जीवनातील एक महत्त्वपूर्ण घटना होय. महाराष्ट्राच्या रौप्यमहोत्सवी सोहळ्याचे आयोजन आणि सूत्रसंचालन मी करावे ही महाराष्ट्रातील लोकांची इच्छा मान्य करावी अशी विनंती राज्याचे सर्वोच्च लोकप्रतिनिधी असलेल्या मुख्य मंत्र्यांनी मला केली आणि ही जबाबदारी मी मोठ्या आनंदाने आणि अभिमानाने स्वीकारली.

आम्ही अनेक योजना हाती घेण्याचे ठरविले आहे. त्यांपैकी ज्यांचा आवर्जून उल्लेख करता येईल अशा योजना म्हणजे ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, वनीकरण आणि अपारंपरिक पद्धतींचा अवलंब करून ऊर्जा निर्मिती करणे व ती ऊर्जा ग्रामीण भागाला पुरविणे. या योजनांमुळे ग्रामीण भागातील लोकांना दूरगामी लाभ मिळू शकतील असा आम्हाला विश्वास वाटतो.

महाराष्ट्राची स्थापना झाल्यानंतर आज २५ वर्षांचा कालावधी लोटला आहे. रौप्यमहोत्सवाचा प्रसंग म्हणजे गेल्या २५ वर्षांत आपण काय साध्य केले याबद्दल अभिमानपूर्वक सिंहावलोकन करण्याचा सुअवसर होय. आपण या काळात कोणत्या दिशेने वाटचाल केली, प्रवासात किती साधन संपत्ती आणि दौलत जोडली, राज्याचा चेहरामोहरा बदलण्याच्या बाबतीत आपण किती यशस्वी झालो आणि प्रगतीच्या प्रवासात नेमका केवढा पल्ला गाठला, किती मजल मारली याची खूणगाठ या प्रसंगी बांधायला हवी. शेवटी ऐश्वर्य म्हणजे तरी काय तर मानवी समाजाची संपन्नता. कारण मानवी समाजच आपल्या प्रगतीची दिशा ठरवीत असतो, नवे मार्ग चोखाळत असतो. प्रगतीची गतीही समाजच ठरवीत असतो आणि त्यातून आपले दैनंदिन जीवन तो समृद्ध करतो, जीवनाला नवा आशय देतो.
या पुस्तकात महाराष्ट्राची प्रगती आणि महाराष्ट्राची अस्मिता यांचा वेध घेण्याचा लहानसा प्रयत्न आहे. वाचकांना आणि भावी पिढीला तो अवश्य उद्बोधक ठरेल, असा माझा विश्वास आहे. हा छोटा ग्रंथ म्हणजे महाराष्ट्राच्या जनताजनार्दनाला केलेला मानाचा मुजराच होय.

मी आणि माझी पत्नी आम्ही दोघेही रौप्यमहोत्सवी सोहळ्यास व्यक्तिशः उपस्थित राहू शकणार नाही. असे असले तरी हृदयाने आणि मनाने आम्ही या सोहळ्यात निश्चितपणे सहभागी असू.

इ ह लतीफ

१६ एप्रिल १९८५

एअर चीफ मार्शल



रौप्य महोत्सवी महाराष्ट्र
१९६०-१९८५

# अंतरंग

# दोन शब्द

१ मे १९६० रोजी भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांच्या हस्ते विदर्भ, मराठवाडा, कोकण आणि पश्चिम महाराष्ट्र ह्यांचा समावेश असलेल्या सलग महाराष्ट्र राज्याची मुहूर्तमेढ रोवली गेली. मराठीभाषी जनतेच्या दृष्टीने तो दिवस अतीव आनंदाचा, साफल्याचा, इच्छापूर्तीचा होता. वर्षानुवर्षे वेगळ्या वातावरणात राहिल्याने एकभाषी असले तरी स्थलकालपरत्वे थोडीशी भिन्न परंपरा लाभलेले, काहीसा भिन्न सांस्कृतिक वारसा जपणारे हे वेगवेगळे भूभाग एकत्र आले आणि तेथील लोक समस्त मराठीभाषी बांधवांच्या आशाआकांक्षांची पूर्ती करण्यासाठी दृढ निश्चयाने व एकदिलाने कामास लागले. नवनिर्मित महाराष्ट्राचे शिल्पकार, थोर नेते आणि कुशल प्रशासक स्वर्गीय यशवंतराव चव्हाण ह्यांच्या चतुरस्त्र मार्गदर्शनाखाली महाराष्ट्राच्या भावी वाटचालीसाठी निश्चित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांच्या अनुषंगाने संकल्पित ध्येयाच्या पूर्तीसाठी महाराष्ट्र राज्याची महत्त्वाकांक्षी वाटचाल सुरू झाली. विकासाच्या विविध क्षेत्रांत प्रगतीचे नवनवे टप्पे गाठत असतानाच भावनिक एकात्मता साधण्याचा, राज्यातील जनतेची मते जोडण्याचा प्रयत्नही जाणीवपूर्वक करण्यात आला. त्यामुळे आज महाराष्ट्र हे एकसंध राज्य बनले आहे.

महाराष्ट्र राज्य स्थापनेला आज पंचवीस वर्षे पूर्ण होत आहेत. योगायोगाने ह्याच वर्षात भारतीय राष्ट्रीय काँग्रेसची म्हणजेच स्थूलमानाने भारतीय स्वातंत्र्य लढ्याची शताब्दीही साजरी केली जात आहे. असा हा दुग्धशर्करा योग लाभला असताना १ मे १९८५ पासून पुढील संपूर्ण वर्ष महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचे रौप्यमहोत्सवी वर्ष म्हणून साजरे करण्याचा निर्णय महाराष्ट्र शासनाने घेतला आहे. ह्या रौप्यमहोत्सवी वर्षात अनेक कार्यक्रम, अनेक योजना हाती घेऊन यशस्वीपणे पूर्ण करण्याचा निर्धार महाराष्ट्र शासनाने व्यक्त केला आहे.

रौप्यमहोत्सवी कार्यक्रमाचा भाग म्हणून 'आपला महाराष्ट्र' हे महाराष्ट्राची, मानवी व्यवहाराच्या संदर्भातील विविध क्षेत्रांतील महाराष्ट्राच्या समृद्ध परंपरांची, गेल्या पंचवीस वर्षांतील महाराष्ट्राच्या अखंड वाटचालीची माहिती करून देणारे सचित्र पुस्तक महाराष्ट्र शासनाच्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने परिश्रमपूर्वक तयार केले आहे. महाराष्ट्रासंबंधीचा हा परिपूर्ण संदर्भग्रंथ असल्याचा दावा कोणीही मांडणार नाही. मात्र, महाराष्ट्रातील जनतेला आपल्या राज्याची ओळख स्थूलमानाने करून देण्याचा हा प्रयत्न आहे. त्या दृष्टीने हे पुस्तक निश्चित उपयुक्त ठरेल असा मला विश्वास वाटतो.

जाणकार व्यक्तींचे माहितीपूर्ण लेख, व्यावसायिक कलाकाराने केलेली उत्तम सजावट आणि उत्कृष्ट छपाई ह्या गुणसमुच्चयामुळे हे पुस्तक अंतर्बाह्य देखणे असल्याचा निर्वाळा माझ्याप्रमाणेच सर्व वाचकही देतील ह्यात शंका नाही.

मुंबई, १ मे १९८५

मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य



*ऐतिहासिक क्षण : दिनांक ३० एप्रिल —— १ मे च्या मध्यरात्री ठीक १२ वाजता पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी नवनिर्मित महाराष्ट्राचा नकाशा 'प्रकाशमान' करून महाराष्ट्र राज्याचे उद्घाटन केले. बाजूला मुख्य मंत्री यशवंतराव चव्हाण व राज्यपाल श्रीप्रकाश*

# आभार

महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या रौप्यमहोत्सवाच्या निमित्ताने महाराष्ट्राची ओळख सहजसोप्या, ओघवत्या भाषेत करून देणारे एक सचित्र पुस्तक १ मे १९८५ रोजी प्रकाशित करण्यात यावे अशी सूचना राज्यपालांच्या पत्नी श्रीमती बिल्कीस लतीफ ह्यांनी महाराष्ट्र शासनाने रौप्यमहोत्सवाच्या आखणीसाठी राज्यपालांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या उच्चस्तरीय समितीच्या एका कार्यकारी गटाच्या अध्यक्षा ह्या नात्याने आपल्या कार्यकारी गटाच्या सदस्यांसमोर मांडली व ती सर्वानुमते स्वीकारण्यात आली. 'आपला महाराष्ट्र' ह्या पुस्तकाच्या निर्मितीमागील मूळ प्रेरणा अशा प्रकारे श्रीमती बिल्कीस लतीफ ह्यांची आहे. त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणे त्यामुळे अत्यावश्यक आहे.

ह्या पुस्तकाची रूपरेषा आखून आवश्यक सर्व तपशील सिद्ध करण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी गटाचे सदस्य श्री. गोविंद तळवलकर ह्यांनी स्वीकारली व अनेक नामवंत जाणकार लेखकांकडून महाराष्ट्राच्या विविध अंगांची माहिती करून देणारे लेख लिहवून घेण्याच्या कामी मोलाचे सहाय्य केले.

प्रा. वसंत बापट, श्री. अरुण ओगले, प्रा. डॉ. सौ. सरोजिनी वैद्य, प्रा. ज्ञानेश्वर नाडकर्णी, प्रा. डॉ. अशोक रानडे, प्रा. संतोष दास्ताने, श्री. य. गो. नित्सुरे, डॉ. रा. वि. सोवनी, प्रा. श्रीमती नलिनी भागवत, श्री. अरुण खोपकर आणि श्री. रमेश औंधकर ह्या सर्वांनी केलेल्या मौलिक लेखन सहाय्याबद्दल त्यांचे आम्ही ऋणी आहोत.

आंतरराष्ट्रीय कीर्तीचे ग्राफिक डिझायनर श्री. यशवंत चौधरी ह्यांनी पुस्तकाचे बाह्यरूप आणि अंतरंग सजविले व पुस्तकाचे स्वरूप निश्चित करण्यात सहाय्य दिले. ह्या पुस्तकाचे देखणेपण त्यांच्या कलात्मक हाताळणीचे फळ आहे.

दृश्यकला विभागात समाविष्ट करण्यासाठी आवश्यक त्या चित्रकारांची चित्रे व त्यांची छायाचित्रे मिळविण्याच्या कामी सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टचे डीन प्रा. वसंत परब ह्यांचे बहुमोल सहाय्य लाभले.

ज्या मान्यवर चित्रकारांनी आपल्या प्रसिद्ध चित्रांच्या प्रतिकृती ह्या पुस्तकासाठी उपलब्ध करून दिल्या, ज्या छायाचित्रकारांकडून पुस्तकासाठी कृष्णधवल व रंगीत छायाचित्रे लाभली त्या साऱ्यांचे आम्ही ऋणी आहोत.

हे पुस्तक अत्यंत अल्पावधीत एवढ्या आकर्षक स्वरूपात छापून प्रसिद्ध करण्याचे संपूर्ण श्रेय शासकीय मुद्रण व लेखनसामग्री विभागाचे संचालक, श्री. रो. बो. अल्वा, उप संचालक श्री. घनश्याम धोंड आणि मुंबईच्या शासकीय मध्यवर्ती मुद्रणालयातील त्यांचे सर्व सहकारी ह्यांचे आहे.

ह्या पुस्तकाची अंतर्बाह्य आखणी करण्याच्या बाबतीत माहिती व जनसंपर्क खात्याचे राज्यमंत्री डॉ. राममनोहर त्रिपाठी आणि सचिव श्री. शशिकांत दैठणकर ह्यांचे मौलिक मार्गदर्शन सातत्याने लाभले.

नित्याप्रमाणे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे सर्व संबंधित अधिकारी व कर्मचारी ह्या कामी कर्तव्यबुद्धीने अहोरात्र झटले ह्याचाही उल्लेख आवर्जून करावयास हवा.

माननीय राज्यपाल महोदयांनी आपला अमोल संदेश देऊन आणि मुख्य मंत्रीमहोदयांनी पुरस्काराचे दोन शब्द लिहून आम्हास कायम उपकृत केले आहे.

मुंबई, १ मे १९८५

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय



इ.स. १९४६ मध्ये प्रसिद्ध साहित्यिक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या अध्यक्षतेखाली बेळगावमध्ये झालेल्या मराठी साहित्य संमेलनात संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा ठराव संमत झाला व महाराष्ट्रीय जनतेने एकभाषी राज्याचे रणशिंग फुंकले




एकभाषी महाराष्ट्राच्या मागणीचा संदेश जनमानसापर्यंत पोचविण्यासाठी काढलेल्या प्रभात फेरीत सेनापती बापटांबरोबर गाडगेमहाराजांसारखे संतही सामील झाले



संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याला सेनापती बापट यांचे
समर्थ नेतृत्व लाभले



श्री. एस्. एम्. जोशी यांनी सयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला
संयमी नेतृत्व दिले



*हुतात्मा स्मारक : संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत प्राणार्पण केलेल्यांच्या स्मरणार्थ मुंबईतील फ्लोरा फाऊंटन येथे उभारण्यात आलेले हुतात्मा स्मारक*



आचार्य अत्रे यांनी आपल्या प्रभावी वाणीने आणि
लेखणीने संयुक्त महाराष्ट्राचा संदेश
घरोघरी पोहोचविला




श्री. चिं. द्वा. (सी.डी.) देशमुख यांनी एकभाषी महाराष्ट्र राज्याच्या
निर्मितीच्या प्रश्नावरून केंद्रीय अर्थमंत्रिपदाचा राजीनामा दिला आणि
बाणेदार 'चिंतामणी' महाराष्ट्राचा 'कंठमणी' झाला



आधुनिक महाराष्ट्राचे शिल्पकार
श्री. यशवंतराव चव्हाण यांनी
संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसाठी
पंडित नेहरूंचे मन वळविले.
महाराष्ट्र राज्य स्थापनेनंतर
त्यांनी महाराष्ट्राच्या विकासाला
निश्चित धोरण व दिशा दिली.
केंद्र सरकारच्या अनेक
खात्यांचा कारभार त्यांनी
समर्थपणे सांभाळला

श्री. वसंतराव नाईक यांची मुख्य मंत्री म्हणून सुमारे एक तपाची कारकीर्द स्थैर्य व
गतिमान विकास यांसाठी उल्लेखनीय ठरली. दोन युद्धे, तीन मोठी राज्यव्यापी अवर्षणे
यांसारख्या संकटांना तोंड देत असतानाच त्यांनी शेतीचा आमूलाग्र विकास
करून महाराष्ट्र अन्नधान्याच्या बाबतीत जवळजवळ स्वयंपूर्ण बनविला



श्री. शंकरराव चव्हाण यांनी अनेक महत्त्वाच्या खात्यांचे मंत्री व पुढे मुख्य मंत्री म्हणून महाराष्ट्राच्या कृषि-औद्योगिक विकासात मोलाची भर घातली. महाराष्ट्रात दुधाचा महापूर निर्माण करण्यात त्यांचा फार मोठा वाटा आहे. सध्या केंद्र सरकारात गृह मंत्री म्हणून ते महत्त्वाची भूमिका पार पाडीत आहेत



श्री. वसंतदादा पाटील म्हणजे सामान्य जनातून उदयाला आलेले नेतृत्व. महाराष्ट्राचे मुख्यमंत्रिपद त्यांच्याकडे चारदा आले. महाराष्ट्राचे नेतृत्व करीत असताना त्यांनी सामान्य जनतेचे हित सदैव डोळ्यासमोर ठेवले. त्यांच्या अगदी अलीकडच्या कारकीर्दीत महाराष्ट्राने वीस कलमी कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत लागोपाठ दोनदा संपूर्ण देशात पहिला क्रमांक मिळविला.



श्री ज्ञानेश्वर उद्यान व पार्श्वभूमीवर जायकवाडी प्रकल्प



महाराष्ट्राचे ज्येष्ठ नेते, कुशल संघटक आणि अनुभवी प्रशासक श्री. शिवाजीराव पाटील निलंगेकर यांनी ३ जून १९८५ रोजी, महाराष्ट्र राज्याच्या रौप्य महोत्सवी वर्षात, राज्याच्या मुख्यमंत्रीपदाची सूत्रे स्वीकारली. देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या कामी सिंहाचा वाटा उचलणाऱ्या भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचे शताब्दी अधिवेशन त्यांच्या कारकीर्दीत महाराष्ट्राची राजधानी मुंबई येथे भरत आहे.



महाराष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्यासाठी
खास परंपरागत पद्धतीने मंगल आरती !

# महाराष्ट्र परंपरा

**वसंत बापट**

आज ज्या भूमीला महाराष्ट्र ही संज्ञा आहे ती भूमी मुख्यत: थंड झालेल्या लाव्हाच्या थरांची बनलेली आहे. भूगर्भातून नैसर्गिक उद्रेकामुळे बाहेर पडलेल्या दगडाच्या रसाचे थर एकावर एक असे चढत राहिले की त्यांनी एक अनेकपदरी कातळाचे कवच या भूमीवर चढवले. सखल सपाट भूमीला राकट कणखर दगडांचा देश बनवणारी ही घटना अर्थात खूप प्राचीन काळी म्हणजे सुमारे ७ कोटी वर्षांपूर्वी घडली. भारतीय भूमिपृष्ठाला तोलदारपणा देणाऱ्या या दक्षिण कातळावर (डेक्कन ट्रॅपवर) महाराष्ट्रीय लोकजीवन आपल्या बहुविध सौंदर्यासह आणि वैशिष्टचांसह विकसित झालेले आहे.

तप्त लाव्हाने आकार दिलेल्या या महाराष्ट्र भूमीचा सह्याद्री हा कणा आहे. सह्याद्रीचे पठार म्हणजे भारताचा सर्वांत प्राचीन आणि प्रबळ प्रदेश. सह्याद्री हिमालयाएवढा विस्तीर्ण नाही आणि उत्तुंगही नाही; त्याची सरासरी उंची जेमतेम ३,००० फूट आहे आणि सर्वांत उंच शिखर कळसूबाई सुमारे साडेपाच हजार फूट उंच आहे; पण सह्याद्रीचे हाडपेर फार मजबूत आहे. काळ्या फत्तराचे हे थर म्हणजे पृथ्वीचे कढ वर येऊ न देणारी एक भक्कम ढाल झालेली आहे. सह्याद्री तापीपासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेला आहे आणि तो अरबी समुद्राच्या किनाऱ्यापासून जास्तीत जास्त ४० मैलांहून दूर नाही. त्याच्या काही भुजा थेट समुद्रातच घुसलेल्या आहेत. उत्तरेला त्याच्याशी काटकोन करणारा सातपुडा त्याचा सख्खा धाकटा भाऊच आहे. उत्तर शिवेवर सातपुड्याचा तट आणि पश्चिमेला सह्याद्रीचा. या दोघा रक्षकांनी दक्षिण पठाराचा सांभाळ केलेला आहे. डोंगराच्या रांगांपासून खाली खाली जाणाऱ्या उतारावर अनेक ठिकाणी काळी कसदार जमीन आहे. पण अशी सुपीक मळई जिथे नाही तिथे रूक्ष खडकाळ जवळजवळ दुष्काळी भूमी आहे. वऱ्हाड-खानदेशची कसदार काळी जमीन, नगर-सोलापूरकडची कोरडी जमीन आणि सातारा-कोल्हापूरची मळी अशी विविधता असणारा पठाराचा प्रदेश 'देश' या नावाने ओळखला जातो. सह्याद्रीच्या पूर्वेकडच्या उतारावर सह्याद्रीच्या शाखांमुळेच खोरी निर्माण झालेली आहेत. त्यांना मावळ भाग म्हणतात. पश्चिमेच्या उतारापासून समुद्रापर्यंत डोंगराळ चिंचोळी पट्टी आहे. ही 'अपरान्त' म्हणजे पश्चिम सीमेवरची भूमी. हे कोकण. एका पसरलेल्या पंखावर देश आणि मुडपलेल्या दुसऱ्या पंखावर कोकण घेऊन सह्याद्री उभा आहे. ही सारी आमची 'महाराष्ट्रभूमि सुंदरा'!

सह्याद्री-सातपुड्याच्या या विशाल प्रांगणातच सातमाळ, बालाघाट आणि महादेव या डोंगररांगा आहेत. सह्य-सातपुड्याचे माथे अनेक ठिकाणी सपाट आहेत. त्यांच्यावर ठायीठायी किल्ले उभे आहेत. कोठे कोठे मजेदार वळ्या पडल्या आहेत, खोल घळी तयार झालेल्या आहेत. छोट्या नद्या-निर्झरांनी आणि भन्नाट घुसणाऱ्या वाऱ्या-वावटळींनी खडक तासून काढलेले आहेत. त्यांच्या वळचणीला सुंदर लेणी खोदलेली आहेत. कोठे कोठे विशेषत: पश्चिमेकडे सह्याद्रीचे कडे तुटलेले आहेत आणि तेथील सुळक्यांवरून खाली पहावे तर भोवंडल्यासारखे वाटते. सह्याद्रीने ज्यांना जन्म दिला आहे त्या कृष्णा, गोदावरी यांच्यासारख्या मोठ्या नद्या आणि त्यांच्या उप नद्या पूर्व समुद्राकडे धाव घेतात. या पूर्ववाहिन्या मोठ्या असल्या तरी त्यांची मुखे आंध्रात आणि शेपटे महाराष्ट्रात असल्यामुळे उन्हाळ्यात त्या कोरड्या पडतात. उलट, पश्चिमवाहिन्या छोट्या असल्या तरी त्या बाजूला पर्वताला ढाळ फार असल्याने आणि कोकणात पावसाचे प्रमाण

*छत्रपति शिवरायांच्या प्रतापगडाचे विहंगम दृश्य*



भरपूर असल्यामुळे नद्या-झरे-पाटस्थळे-धबधबे-पऱ्हे यांना पाणी चांगले असते. सातपुड्याच्या कुशीत तळी आणि सरोवरें पुष्कळ आहेत. पण एकंदरीत पाहता, शेतजमीन भिजवण्यासाठी आवश्यक तेवढा पाण्याचा पुरवठा केवळ नैसर्गिक जलसंचयाने आणि जलवाहिन्यांतून होत नाही. परिणामी येथील शेती अतिशय कष्टाची असते.

जगामधील प्रत्येक प्रकारची सृष्टी आणि हवामान भारतीय उप खंडात आपण अनुभवू शकतो. त्यात महाराष्ट्र भूमीचे वैचित्र्य तर खूपच लक्षणीय आहे. माळ आणि खडकाळ, हिरवळीची आणि रेताड, घनदाट जंगलाची आणि उजाड ओसाडीची, लोण्यासारखी, काळी आणि नापीक वरड, डोंगराळ पायऱ्यापायऱ्यांची आणि साफ सपाटीची, म्हणाल तशी जमीन येथे आहे. घाटमाथ्याच्या क्षितिजांकडे पहावे तर क्षितिजांच्या कडा नाना आकारांच्या शिखरांनी, तुटक्या कड्यांनी आणि तासलेल्या कातळांनी चित्रमय झालेल्या दिसतील. निसर्गाच्या या वैचित्र्यात भर घालण्यासाठी मऱ्हाठी माणसांनीही खूप कामगिरी करून ठेवलेली आहे. डोंगरी किल्ले-गिरिदुर्ग ही मऱ्हाठभूमीची शान आहे. हे किल्ले म्हणजे मराठ्यांच्या स्वाभिमानाची, स्वातंत्र्यप्रेमाची आणि लढवय्या बाण्याची मंदिरेच आहेत. जगामधल्या कोणत्याही देशात आणि कोणत्याही पर्वताच्या मस्तकावर एवढे किल्ले नाहीत. आधुनिक युगात, पडझड झालेल्या अवशेषांची कळा त्यांना आली असली तरी एके काळी महाराष्ट्राच्या दुर्दम्य स्वातंत्र्यप्रीतीची जपणूक त्यांनी केली आहे. सह्याद्रीच्या आणि सातपुड्याच्या अनेक मस्तकांनी हे वज्रमुकुट घातलेले आहेत आणि महाराष्ट्राच्या क्षितिजरेषा त्यांनी चित्राकार केलेल्या आहेत. महाराष्ट्रातले देवही सहसा डोंगरकड्यावर राहणे पसंत करतात. पर्वतशृंगावरची देवी सप्तशृंगी, कडेपठारीची तुळजाभवानी, शिखरशिंगणापूरचा महादेव, जेजुरीचा खंडोबा अशी अनेक दैवते उंचावरची मंदिरे जागती ठेवतात. नदीतटांवरही, सर्वत्र असतात तशी, तीर्थे आणि मंदिरे भरपूर आहेत. किल्ल्यांप्रमाणेच या प्रदेशाच्या सौंदर्यात साध्या सुंदर मंदिरांनी भर टाकली आहे. महाराष्ट्राचा प्रवास करणारे प्रवासी, गिरिगुंफा धुंडाळणारे तडीतापसी, आपल्या काटकपणाची कसोटी पहाणारे साहसी आणि सुंदरतेचा वेध घेणारे कलाभ्यासी सर्वांच्या मनाची असोशी महाराष्ट्र पुरी करील. रायगडावर उभे रहावे आणि सह्याद्रीच्या कातीव, ताशीव कड्यांकडे डोळे भरून पहावे. सावळ घाट, थळ घाट, अणे-माळशेज घाट, नाणे घाट, बोर घाट, वरंध घाट, आंबेनळी ऊर्फ रडतोंडी घाट, पार घाट, मेढा घाट, कुंभारली घाट, अंबा घाट, फोंडा घाट, अंबोली घाट . . . यांतला कोणताही घाट ओलांडावा आणि आसमुद्र कोकणाचे रूप डोळ्यात साठवावे. पांचगणी, तोरणमाळ, माथेरान, महाबळेश्वर या पहाडी आरामस्थळी जावे आणि नागमोडी वाटांवर हिंडताना हिरव्या सोयऱ्याधायऱ्यांना भेटावे. किंवा अष्टविनायकांची अथवा ज्योतिर्लिंगांची यात्रा करण्यासाठी, भीमाशंकर, त्र्यंबकेश्वर यांना भेटण्यासाठी भटकत रहावे. चांद्याच्या ताडोबाला किंवा कोयनाकुशीतल्या वासोट्याला जावे आणि जंगलांचे भव्यभीषण रुद्रसुंदर दर्शन घ्यावे. नद्यांची परिक्रमा करावी. आळंदी-पंढरीची वारी करावी, दिंडीत सामील व्हावे. आणखीही एक अनुभव घ्यावा: समुद्राच्या किनाऱ्याकिनाऱ्याने कोकणाधिप सह्याद्रीचा 'प्रोफाइल' पहावा! खलाटीने, वलाटीने प्रवास करावा. हवे तर विमानातून विहंगम दृष्टीने पहावे. शक्य तर हे सर्वच करावे! तरीही या सुंदरा महाराष्ट्रभूमीचे सर्व सौंदर्य पाहून होणारच नाही. प्रचंड कडे, गर्द राने, किर्र झाडी, उंच सुळके, 'धबाबा आदळे पाणी' असे प्रपात, हे या भूमीचे एक रूप. निळे, करडे, काळेभोर उघडेबोडके कातळ, काटेरी चिलखते घातलेले ठेंगणेठुसके डोंगर, दृष्टी निववण्यापुरत्याच हिरवळीने अलंकृत दऱ्याखोरी हे दुसरे. काठांवर लव्हाळी, कळकी पोसणाऱ्या नद्या आणि त्यांच्या सोबतीने राहणारी देवळे . . . सागपळसांच्या तुऱ्यांनी, लाल फुलांनी नटलेल्या रानवट राया हे तिसरे. माडपोफळींनी आकाशाला लुचावे, आंबेफणसांनी दाट गर्दी करावी आणि टुकीने संसार करणाऱ्या झोपड्यांनी किंवा लाल कौलारू घरकुलांनी अर्धेमुर्धे दर्शन मात्र देत रहावे, हे आणखी एक! विदर्भ, कुंतल, अश्मक, लाट, अपरान्त

*सह्याद्रीच्या माथ्यावर राजगडासारखे मजबूत किल्ले आहेत*



सह्याद्रीच्या कडेकपारीतील मावळा सह्याद्रीसारखाच कणखर आहे



या प्राचीन नामकरणांनी ओळखले जाणारे सर्व प्रदेश एकमेकात सरमिसळ होत होत साधारणपणे दीड हजार वर्षांपूर्वी एकवट घडलेला हा मरहट्ट देश आहे. प्राचीन इतिहासातल्या महाराष्ट्रविषयक उल्लेखांची चर्चा न करता केवळ हजारबाराशे वर्षांपुरता विचार केला तर महाराष्ट्राची संकल्पना तेव्हाही बरीच सुस्पष्ट दिसते. 'विंध्याद्रीपासून दक्षिण दिशेसी। कृष्णा नदीपासून उत्तरेशी। झाडीमंडळापासून पश्चिमेशी। कोकणपर्यंत महाराष्ट्र बोलिजे।' हा भूगोल एका महानुभाव कवीने दिलेला आहे. दुसऱ्या महानुभाव भाष्यकाराने अधिक तपशिलात जाऊन सांगितले आहे—"देश भणिजे खंडमंडळ। जैसे फलेठाणापासौनि दक्षिणेस मऱ्हाटी भाष जेतुला ठाईं वर्ते तेतुले एक मंडळ। तयासि उत्तरे बालेघाटाचा सेवट असे। ऐसे एक खंडमंडळ। मग उभय गंगातीर (गोदा-पैनगंगा) तेहि एक खंडमंडळ। आन तयापासौनि आवघे वराड तेहि एक मंडळ। पर आघवीचि मिळौनी महाराष्ट्रची बोलिजे। किंचित किंचित भाषेचा पालट असे म्हणौनि खंडमंडळे म्हणावी।" अशा प्रकारे महानुभावांनी महाराष्ट्राचा गौरवाने भूगोल सांगावा याचे कारण उघड आहे: त्या पंथाच्या संस्थापकांनी, श्रीचक्रधरांनी गुजरातेतून महाराष्ट्रात आल्यानंतर, महाराष्ट्र ही आपली धर्मभूमी मानली, कर्मभूमी केली आणि मराठीला धर्मभाषेचा मान दिला. 'इतर देशां जाऊ नये', 'महाराष्ट्रीं असावे', असा आपल्या शिष्यांना सल्ला दिला. एका वैराग्यशील संन्याशाला जिने असा लळा लावला ती ही आपली प्रिय महाराष्ट्रभूमि सुंदरा. यादव काळापासून तर ती आपल्या स्वतंत्र वैशिष्टचांनी अधिकच शोभू लागली. भक्ती आणि शक्ती यांचे संगमतीर्थ ठरली.

## २. आम्ही सर्व मऱ्हाटे

आठव्या शतकातील उद्योतनसूरीच्या 'कुवलयमाला' ग्रंथात मरहट्टे कसे असतात याचे प्रत्ययकारी चित्र पहायला मिळते. त्यात वर्णिलेली मराठ्यांची प्रतिमा आज, बाराशे वर्षे उलटली तरी, यथातथ्य वाटेल. मूळ प्राकृत आर्येचा स्वैर मराठी अनुवाद असा :

सुदृढ सावळे सहनशील अन् कलहप्रिय अभिमानी।
दिले घेतले बोलत लढती मरहट्टे मैदानीं ।।

कालमहिम्यामुळे ही लक्षणे आता थोडीफार बदलली असली तरी सर्वत्र मराठी माणसांची हीच प्रतिमा आहे खरी. परंतु, ही काही महाराष्ट्रीय लोकांची वांशिक लक्षणे नाहीत. आणि कशी असणार? मराठी समाज अनेक वंशांच्या सहज संकराने सिद्ध झालेला आहे. महाराष्ट्राच्या भौतिक सृष्टीप्रमाणे मानवी सृष्टीही वैचित्र्यसंपन्न आहे. नाग, कोल, मुंड, द्रविड, आर्य इत्यादी मानववंशांची ही मिलनभूमी आहे. मऱ्हाठी माणसे आणि मऱ्हाठी संस्कृती यांना वंशवादाचा शाप नाही. आर्यावर्त आणि द्रविडभूमी दोन्ही एकत्र येतात ती महाराष्ट्रात, मानववंशशास्त्राच्या दृष्टीने, भाषेच्या दृष्टीने आणि जीवन पद्धतीचा विचार केला तरीही. महाराष्ट्रीय माणसांचे स्वभावधर्म कोणी घडवलेच असले तर ते आधी भूगोलाने आणि नंतर इतिहासाने घडवलेले आहेत. कोकणात खडतर खडकाळ जमिनीशी आणि देशावर दुष्काळी परिस्थितीशी मुकाबला करावा लागतो. येथील जीवनसंघर्ष सामान्य नाही. फेकले की उगवले अशी खुषीची, देवभात-शेती येथे नाही. आमच्या कठोर जिजीविषेनेच आम्हाला घट्टमुट्ट, सहनशील, कलहप्रिय आणि अभिमानी बनवले आहे. ईशान्य आशियातल्या टोळ्या ज्या अर्थाने लढाऊ आहेत त्या अर्थाने मराठ्यांना लढाऊ म्हणता येणार नाही. आपण होऊन क्रूर लांडगेतोड करीत आक्रमण करावयाचे आणि प्रचंड नरमेध, अत्याचार करून विध्वंस मांडावयाचा असला लढाऊपणा मराठ्यांच्या स्वभावात नाही. मराठा लढतो तो वैऱ्याचे उसने फेडण्यासाठी, स्वाभिमानाच्या रक्षणासाठी, स्वातंत्र्यासाठी, अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी, जीवनमूल्यांच्या जपणुकीसाठी. एरवी शांत मनाने आपली शेतीभाती करीत रहावे हाच त्याचा स्वभावधर्म आहे. चिनी प्रवासी ह्यू-एन-त्संग यानेही महाराष्ट्राचे अवलोकन केल्यानंतर लिहिले आहे: 'येथील लोक धाडसी, उमदे, परंतु प्रामाणिक आणि साधे आहेत. विद्याभ्यासाचे ते चाहते आहेत. उपकारकर्त्यांचे उपकार ते कधीही विसरणार नाहीत; परंतु कोणी अपमान



*'ज्ञानियांचा राजा' संत ज्ञानेश्वर यांचे मंदिर, आळंदी*



केला, तर प्राणाची तमा न बाळगता ते त्याच्यावर सूड उगविल्याशिवाय राहणार नाहीत. निःशस्त्र माणसावर तो बेसावध असताना ते कधीही हल्ला करणार नाहीत. ज्याच्यावर हल्ला करावयाचा आहे, त्याला ते पूर्वसूचना देतील. त्याचप्रमाणे त्याला शस्त्रसज्ज होण्यास वेळ देतील. नंतरच त्याच्याशी चार हात करतील. पळणाऱ्या शत्रूचा ते पाठलाग करतील, पण शरणागताला उदार मनाने अभय देतील.' हे वर्णन तत्कालीन महाराष्ट्रीयांचे असले, तरी ते चालुक्य कालखंडातले आहे आणि त्या काळी आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्यातल्या सीमारेषा फारच अंधुक होत्या, हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे. ते काहीही असले, तरी एक गोष्ट खरी की सातवाहनांपासून यादवांपर्यंत गोदावरीच्या किनाऱ्यापासून कृष्णेच्या किनाऱ्यापर्यंत राज्य करणाऱ्या राजवंशांत आक्रमणाचा प्रतिकार करणारे सातकर्णी, पुलकेशी यांच्यासारखे अनेक पराक्रमी राजे झाले आणि त्यांनी कित्येक शतके उत्तरेकडून होणारी आक्रमणे विंध्याचलात थोपवून धरली. याला अपवाद असला तर तो फक्त शकांचा. चालुक्य, आभीर, वाकाटक, राष्ट्रकूट, कदंब, शिलाहार या सर्वांच्या राजवटींत अनेक महत्त्वाच्या सांस्कृतिक घटना घडल्या, सौंदर्याची लेणी निर्माण झाली, अपभ्रंश भाषेत ग्रंथनिर्मिती झाली; परंतु मराठभूमी एकछत्र राज्याखाली आली ती यादवांच्या साम्राज्यात. महाराष्ट्रात अनेक जनसमुदाय आले आणि स्थिरावले. पहिलेवहिले इस्लामी आक्रमक धर्मवेडे नसते, असहिष्णु आणि अत्याचारी नसते तर तेही येथे खपवून घेतले गेले असते. पण त्यांची सुलतानशाही जेव्हा प्राणावर बेतू लागली तेव्हा अन्यायाला मूठमाती देण्यासाठी छत्रपति शिवाजीमहाराजांच्या लोकोत्तर नेतृत्वाखाली महाराष्ट्राने समशेर उपसली. या समशेरीने मोगल बादशाहीला मूठमाती दिली. पुढे खैबर खिंडीतून हिंदुस्तानात होणाऱ्या आक्रमणांचा कायम बंदोवस्त करण्याची महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या मराठ्यांच्या फौजा सिंधू आणि काबूल नद्यांच्या संगमापाशी अटकच्या किल्ल्यावर थडकल्या आणि कंदाहारपासून पसरलेल्या मध्य आशियाकडे वटारलेल्या डोळ्यांनी त्यांनी पाहिले. विंध्य-सातपुड्याच्या दक्षिणेला सह्याद्रीच्या दुर्गम खोऱ्यांत आपले चिमुकले स्वराज्य राखीत मराठे स्वस्थ बसू शकले असते. यमुनेपल्याड जाऊन अबदालीच्या अफगाणांशी झुंज घेण्याचे तसे त्यांना काय प्रयोजन होते ? पण पवित्र भारतीय भूमीवर वारंवार होणाऱ्या स्वाऱ्या थांबवल्याच पाहिजेत या अनिवार वेडाने मराठे वीर उत्तरेत दौडत गेले. तेथे मराठ्यांचे पानिपत झाले. लाख बांगडी फुटली. पण खचून गेलेल्या महाराष्ट्राने पुन्हा उभारी घेतली आणि आपला दरारा निर्माण केला. मध्ययुगात भौतिक विज्ञानाच्या दृष्टीने भारतात अंधार होता. त्या अंधाराची झापड असल्यामुळे, केवळ शौर्याच्या बळावर पाश्चात्य साम्राज्यशाहीपुढे महाराष्ट्राचा निभाव लागला नाही हे खरे; परंतु मराठे शेवटपर्यंत कधीच सर्वतोपरी शरण गेले नाहीत हेही तितकेच खरे!

### ३. महाराष्ट्राचे भाग्यविधाते

तेराव्या शतकापासून विसाव्या शतकापर्यंत महाराष्ट्राला अनेक प्रेरक विभूतींनी मार्ग दाखवलेला आहे. त्या सर्वांच्या प्रेरणांच्या प्रकाशामुळे हा समाज प्रगतीच्या वाटेवर अथकपणे चालत राहिलेला आहे. त्यात संत, महंत, महापराक्रमी योद्धे आणि बुद्धिवान विचारवंत . . . सर्वांचाच समावेश असला तरी संत ज्ञानेश्वर आणि छत्रपति शिवाजीमहाराज या चंद्रसूर्यांची महती विशेष आहे. अंध कर्मकांडात गुरफटून पडलेल्या आणि नाना पंथ-संप्रदायांच्या चिरफळ्यात विभागून गेलेल्या समाजाला भक्तीच्या सुलभ शिकवणुकीने एकत्र आणण्याचे श्रेय ज्ञानेश्वरांना आणि त्यांच्या नेतृत्वाने चार शतके प्रभावित झालेल्या संतमेळ्याला आणि पंढरीच्या वारकऱ्यांना दिले पाहिजे. ज्ञानेश्वरांनी एका नव्या मानवता धर्माचे चक्रप्रवर्तन महाराष्ट्रात केले आणि जातिभेदाची धार त्यामुळे पुष्कळच बोथट झाली. भक्तिपंथामधील सुलभ उपासनामार्गामुळे कर्मकांडाचे प्रस्थ संपुष्टात निघाले. ज्ञानेश्वरांनी नव्या धर्माचे आवाहन आणि प्रवर्तन करताना आणखी एक महत्त्वाचे काम केले: मराठी भाषेच्या
















संतश्रेष्ठ नामदेव, नरहरी, निवृत्ती, रामदास व तुकाराम



सौंदर्याचे आणि सामर्थ्याचे प्रभावी दर्शन त्यांनी घडवले. संस्कृत भाषेशी त्यांचे वैर नव्हते; परंतु त्या भाषेच्या कुलपात सर्व धर्मविचार आणि तत्त्वज्ञाने कोंडून ठेवून त्याची किल्ली आपल्याच जानव्याला लावणाऱ्या अनुदारतेविरुद्ध त्यांनी बंड केले. ' त्या बडया बंडवाल्यांत ज्ञानेश्वर मानें पहिला ' हे बी कवींचे उद्‌गार यथार्थच आहेत. स्त्रीवैश्यशूद्रादिकांचा मोक्षाचा अधिकार भगवद्‌गीतेने मान्य केला होता, पण धर्मविचार त्यांच्यापर्यंत पोचावा कसा? तो पोचू नये अशीच उलट योजना झालेली होती. त्यासाठी ' देशी ' भाषेची गरज होती. ज्ञानेश्वरांनी गीतेचे हृदय ' मऱ्हाटा बोलां 'तून प्रकट केले ते या जाणिवेने. कोणताही गहन विचार सहज आणि सुंदर रीतीने व्यक्त करण्याएवढी प्रगल्भता आणि समर्थता मराठी भाषेत आहे असा त्यांचा दृढ विश्वास होता. तो ज्ञानेश्वरीमध्ये ठायी ठायी दिसून येतो. ' ऊस वरून ओवडधोवड असला तरी आत माधुर्य असतेच ना?' असली अजीजीची भाषा वापरून मुकुंदराजाने ज्ञानेश्वरांच्या आधी, मराठीची कैफियत माफी मागण्याच्या सुरात मांडलेली होती. ज्ञानेश्वरांच्या नंतरही ' संस्कृत भाषा देवें केली। प्राकृत काय चोरापासोनि आली?' असा करडा सवाल विचारावा लागतच असे. महानुभाव पंथातील संस्कृत पंडितांना मराठीचे महत्त्व शिकवण्यासाठी, ' संस्कृताने सामान्य माणसे नागवली जातात, वंचित ठेवली जातात ' असे फटकारे द्यावे लागतच होते. पण या सर्वांहून ज्ञानदेवांचा मराठी भाषेचा अभिमान आगळाच आहे. त्यांचे समर्थन आत्मविश्वासाचे असूनही आक्रमक नाही. या देशीचे नागरणपण पहायला दुसरे दाखलेच नकोत. प्रतिपदी सुंदर आशयाची वलये निर्माण करणारी ज्ञानेश्वरांची प्रतिभाच आपल्या नैसर्गिक सौंदर्याने ते सिद्ध करीत आहे. हा ' मऱ्हाटाचि बोलु अमृतातें जिंकेल ' ही पोकळ दर्पोक्ती नव्हती; साहित्य सोनियाच्या खाणी उघडून आणि शृंगाररसाचा आनंद फिका पाडणारी शांत रसाची खुलावट करून या कवीश्वराने मराठीची उत्तम साहित्याला जन्म देण्याची क्षमता किती मोठी आहे याचे निदर्शन केले. ज्ञानेश्वरांनी जागा केलेला मराठीचा अभिमान सातशे वर्षांच्या दीर्घ साहित्यपरंपरेने जोपासलेला आहे.

संत ज्ञानेश्वरांचे दोन चमत्कार : जडमूढ झालेल्या समाजाची भिंत त्यांनी ' चालविली ' हा पहिला चमत्कार; आणि दुसरा चमत्कार हा की मराठी समाजाच्या सर्व थरांकडून मायभाषेत त्यांनी वेदान्त वदवून घेतला! ' वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा। येरांनी वहावा भार माथां ।। ' हा तुकोबांचा फटका पोथीनिष्ठांना अगदी वर्मी लागला असेल. तुकोबांच्या या प्रखर आत्मविश्वासाच्या मागे चार शतकांच्या समृध्द संतवाङ्मयाची परंपरा आहे. जिचा पाया ज्ञानदेवांनी घातला, जिचा विस्तार नामदेवांनी केला, जिला आधार एकनाथांनी दिला, तिचा ओजस्वी कलशाध्याय तुकोबांनी लिहिला आहे. याशिवाय गोरा कुंभार, सावता माळी, परसा भागवत, नरहरी सोनार, चोखा मेळा आणि सोयरा, जनाबाई, राका, बंका, सेना न्हावी, शेख महंमद अशा मराठी समाजाच्या कितीएक थरांतल्या प्रतिनिधींनी ज्ञानेश्वरांची आध्यात्मिक लोकशाही दृढमूल केलेली आहे. आपले व्यक्तित्व आणि आपल्या वैयक्तिक आवडीनिवडी यांना लोकशाहीत थोडी मुरड घालावी लागते ना? हे शिक्षण ज्ञानदेवांपासून सर्व संतांनी महाराष्ट्राला दिले आहे. ज्ञानेश्वर मुळात नाथपंथी, योगी, ज्ञानमार्गी होते. पण ज्ञानोत्तर भक्तीचे महत्त्व पटवता पटवता ते भक्तिमार्गाकडे आले आणि विठ्ठलभक्ती शिकवणाऱ्या भागवत मंदिराची त्यांनी पायाभरणी केली. ज्ञानियांच्या राजाने दाखवलेल्या दिशेचा सर्वांनीच मग अंगीकार केला. शिवभक्ती करणारे, विसोबा खेचरांचे शिष्य नामदेव; त्यांनीही ' नामा म्हणे मज विठ्ठल सापडला ' असा उद्‌घोष केला. दत्तसंप्रदायातील जनार्दनस्वामींना गुरू मानणारे एकनाथ ' माझे माहेर पंढरी । आहे भिवरेच्या तीरीं ।।' असे म्हणू लागले. तर चैतन्य संप्रदायाच्या बाबाजींनी तुकारामांना स्वप्नसाक्षात्कार घडवून ' राम कृष्ण हरी ' हा सहा अक्षरी मंत्र दिला असला तरी एका विठ्ठलावाचून तुकोबांना दुसरा विषय कोठे होता? कर कटावरी ठेवोनीया विटेवरी उभ्या असलेल्या त्या सुंदर सावळ्या विठ्ठलाकडे त्यांचे लयलक्ष लागलेले होते. ग्यानबा-तुकाराम



*विदर्भापासून गोव्यापर्यंतचे हजारो वारकरी ग्यानबा-तुकाराम हा घोष करीत भागवत धर्माची पताका घेऊन दर वर्षी पंढरपूरला जातात*



या उभयतांचा जयघोष करीत, टाळवीणा वाजवीत, भागवत धर्माची पताका खांद्यावर घेऊन आजही विदर्भापासून गोव्यापर्यंतचे लक्षावधी वारकरी पंढरीला आनंद मेळावा भरवतात. यातला काही भाग गतानुगतिक अनुकरणाचा असेलही. पण ' या रे या रे अवघे जण ' ही ज्ञानेश्वरांनी नाना यातींना मारलेली हाक ऐकूनच ही लक्षावधी पावले पंढरीची वाट चालत असतात हे सत्य कोणाला नाकारता येणार नाही.

**४. यादवकाळ आणि मराठी भाषेची प्राणप्रतिष्ठा**

महाराष्ट्राच्या अस्मितेचे पहिले स्पष्ट चित्र दिसू लागते ते यादवकालात! राज्यविस्तार करून सम्राट होणाऱ्या यादव घराण्याची कर्तुकी आणि मराठी भाषेचा जाज्वल्य अभिमान धरून निर्माण केलेले वाङमय या दोहोंनी त्या अस्मितेला जन्म दिला. यादवांच्या भरभराटीचा काळ जेमतेम एक शतकाचाच असेल. पण या म्हणजे तेराव्या शतकातच मराठी भाषेची व साहित्याची प्राणप्रतिष्ठा झाली आणि महाराष्ट्राला त्याचे व्यवच्छेदक लक्षण सापडले. येथून पुढे, ' मराठी भाषा बोलणारांचा मुलूख तो महाराष्ट्र ' ही साधी सरळ व्याख्या दृढमूल व्हावी एवढे मराठी भाषेतील प्रतिभावंतांच्या आणि संतांच्या कामगिरीचे महत्त्व आहे. या शतकातच महानुभाव पंथाचा विकास झाला आणि त्याने धरलेल्या मराठीच्या प्रखर अभिमानाचे फलित म्हणून मराठीच्या बालपणीच गद्य साहित्यही विकसित झाले. १३ व्या शतकाच्या अखेरीस, सन १२९० मध्ये ज्ञानेश्वरीचा जन्म झाला आणि तेथून पुढे चारशे वर्षे संतसाहित्य फुलत राहिले! महानुभाव पंडित कवी नरींद्र, भास्करभट्ट बोरीकर आणि दामोदर पंडित यांनी कलात्मक कवितेचा पाया घातला. पुढे १६ व्या शतकात मुक्तेश्वरांनी महाभारताचा जो मराठी अवतार घडवला त्याने मराठी कथा-कवितेचे स्वरूप महाकाव्य सदृश होऊ शकते, हे सिद्ध केले. १४ व्या शतकारंभी अल्लाउद्दिन खिलजी आणि मलिक कफूर यांनी यादवांचा नि:पात केला आणि मग बहामनी राज्याची सद्दी सुरू झाली. सुमारे ३०० वर्षांच्या या कालखंडात अरबी-फार्सी या भाषांनी मराठीवर बरीच कुरघोडी केली, परंतु मराठी भाषेने त्यांना पोटात रिचवून टाकले. मुळात मराठी भाषा म्हणजे प्राकृत अपभ्रंशाचा आणखी पुढला अपभ्रंश नव्हे, उलट अपभ्रंशाचे लेवाडेपण नाहीसे करून, त्या भाषेवर पुन्हा संस्कृतचे कलम बेमालूम केल्यावरच कणा असलेली मराठी भाषा तयार झाली. तिने तेलगू, कानडी वगैरे शेजारच्या भाषांतून आलेले शब्द सहज आत्मसात केले. मुसलमान राजवटींत अरबी, फारसी शब्दांनी मराठीच्या मूळ शब्दसंपत्तीत अधिक भर घालण्याचे काम केले. लोकव्यवहाराच्या क्षेत्रांची संख्या व व्याप्ती वाढली तर त्या लोकसमूहाच्या भाषेची शब्दसंपत्ती भरपूर वाढू शकते; पण भाषेचे सामर्थ्य आणि सौंदर्य वाढते ते मात्र प्रतिभावंतांच्या साहित्यामुळे! शिवकाळात आणि त्यानंतर मराठ्यांचा संबंध संपूर्ण भारताशी येत गेला हे मराठीच्या विस्ताराचे एक महत्त्वाचे कारण आहे. तसेच ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, पंडित कवी, बखरकार आणि लावण्या-पोवाडे रचणारे शाहीर यांच्या आपापल्या परीने सरस असणाऱ्या वाङमयीन कृतींमुळे मराठी भाषेचा आंतरिक विकासही झाला.

वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट आहे की, ज्ञानेश्वरांनी धर्मकल्पनेत नवा आशय ओततानाच अगदी स्वाभाविकपणे मातृभाषेची प्राणप्रतिष्ठा केली. म्हणजेच सुमारे सात शतकांपूर्वी ज्यांचा आरंभ झाला, त्या नव्या मानवधर्मी जाणिवांनी महाराष्ट्राला त्याचे वेगळेपण दिले, भाषासामर्थ्य दिले आणि नवी अस्मिता दिली.

**५. आरंभीचा धर्माश्रय**

मध्ययुगीन महाराष्ट्राच्या प्रेरणा सर्वसामान्यपणे मध्ययुगीन भारतीय प्रेरणांप्रमाणेच होत्या, हे स्थूलमानाने खरे आहे. या युगातील वैचारिक नेतृत्व धर्माश्रयी असणे स्वाभाविकच होते. आरंभकाळात कला, साहित्य आणि तत्त्वज्ञान सर्वत्र



धर्माच्याच आधाराने विकसित होताना आढळतात. युरोप खंडात ख्रिश्चन चर्च हाच सामाजिक आणि सांस्कृतिक चलनवलनाचा केंद्रबिंदू ठरला. म्हणून तर कार्ल मार्क्सनेही ' काही काळपर्यंत चर्च ही प्रागतिक शक्ती होती ' असे मानलेले आहे. त्यानंतर चर्चची सत्ता एकछत्री राहिली नाही आणि प्रॉटेस्टंट पंथाच्या उदयामुळे धार्मिक विचारमंथनाला तेथे गती मिळाली. त्यामागोमाग तेथे प्रबोधनयुग उदयाला आले आणि अंधश्रद्धेला संशयाने शह दिला. मग भौतिक विद्यांची अभूतपूर्व प्रगती होऊन औद्योगिक क्रांती झाली. तिने नव्या ' साम्राज्यवादा ' ला जन्म दिला. या सर्व घटना घडत असताना त्यांचा परिपाक म्हणून, किंवा निदान त्यांच्या संगतीने साहित्याची समृद्धी वाढली. शिक्षणाचा प्रसार झाला आणि युरोपिअन संस्थाजीवन सर्वांगी विकसित झाले. पाश्चात्य जीवनात जसा हा विकासक्रम आपण नमूद करू शकतो, तसा विकासक्रम त्याच कालखंडातील भारतीय जीवनात सुतराम् आढळत नाही. म्हणून तर आपले मध्ययुग थेट इंग्रजी राजवटीपर्यंत रेंगाळत राहिले. भारतीय समाजजीवन हे युरोपप्रमाणे सतत ढवळले गेले नाही आणि म्हणून आपल्याकडील नवा विचार हा संतमहंतांच्या प्रतिपादनापुरता मर्यादित राहिला. या मर्यादा लक्षात घेता ज्ञानेश्वरांना झालेले स्फुरण विलक्षणच म्हटले पाहिजे. चातुर्वर्ण्याच्या विचाराशी ते फारकत घेऊ शकले नाहीत, नवा विचार स्वतंत्रपणे सांगण्याऐवजी जुन्या धर्मग्रंथांच्या आश्रयानेच त्यांना सांगावा लागला, आदी मर्यादा लक्षात घेऊनही त्यांचा विचार क्रांतिकारकच म्हणावा लागेल. ' हे विश्वचि माझे घर ', ' समता वर्तावी, अहंता खंडावी ', ' वेदु कृपणु (कारण तो उच्चवर्णीयांच्याच कानात बोलतो)', ' दुरितांचे तिमिर जावो, जो जे वांछील तो ते लाहो ', यांसारख्या अनेक उद्गारांतून समाजातील सर्वांचे कल्याण चिंतणारा, सर्वांना मोक्षाची दारे उघडी आहेत असे म्हणणारा आणि ममतेसह समता निर्माण करू पाहणारा एक महापुरुष साकार होतो. संन्याशाची पोरे म्हणून ज्यांचा धिक्कार झाला त्या निवृत्ति-ज्ञानदेव-सोपान-मुक्ताबाई यांनी जगाचा राग केला नाही, 'उलट' आपल्या करुणेने ' अवघाचि संसार सुखाचा ' करण्याची आकांक्षा बाळगली आणि ' जग जालिया वन्ही, संतकृपां व्हावे पाणी ' असा संदेश समाजाला दिला. मात्र ही अहिंसा शूराची अहिंसा आहे. त्यामुळे प्राकृतांच्या भाषेचा स्वकर्तृत्वाने गौरव करणाऱ्या ज्ञानदेवांनी प्राकृत जनांना त्यांच्या धर्माधिकाराविषयी जागृत केले. संत नामदेवांनी महाराष्ट्रातच नव्हे तर महाराष्ट्राबाहेर जाऊन नवा धर्मविचार प्रसृत केला. जनाबाईने अतिशय धैर्याने, आपल्याला हीन मानणाऱ्या समाजाला खडसावून सांगितले, ' डोईचा पदर । आला खांद्यावरी । भरल्या बाजारीं । जाईन मी ।। हातीं घेइन टाळ । खांद्यावरी वीणा । आता मज मना । कोण करी ।। पंढरीचे पेठे । मांडियले पाल । मनगटावर तेल । घाला तुम्ही ।। ' आपल्याला दासी म्हणणाऱ्या, हीन लेखणाऱ्या उच्चवर्णीयांना हे विचारण्याची हिंमत जनीमध्ये यावी, हा ज्ञानेश्वरप्रणीत क्रांतीचा विजयच आहे. याच शक्तीच्या आधाराने महारापोरांना कडेखांद्यावर घेण्याची शक्यता एकनाथांच्या आयुष्यात निर्माण झाली आणि सामाजिक दंभावर प्रहार करणाऱ्या तुकोबांच्या वाणीत वज्राची प्रखरता आली. कधीकधी नम्रतेपोटी स्वतःचा उल्लेख तुकोबांनी ' शूद्र याति ' असा केला असला, तरी ' वेदांचा तो अर्थ आम्हांसीचि ठावा । येरांनी वहावा भार माथां ।। ' असे त्यांनी जरूर बजावले आहे. ' दर्भ खोवी शेंडी । लटकी धरी बोंडी । नासिकेची ।। ' असल्या बकध्यानी ढोंग्यांचा उपहास करून ' तुका म्हणे ऐसे मायेचे मविंद । त्यांपासी गोविंद । नाही नाही ।। ' असे निक्षून सांगितले आहे. एकीकडे मेणाहून मऊ असलेले विष्णुदास वज्राहून कठोर होऊ शकतात, ही संतजीवनातली शक्तीच तुकारामांच्या वाणीतून प्रकट होते. या संतमंडळापेक्षा वेगळा आणि एकांडा संत म्हणजे रामदास. समतेचा विचार त्यांच्या मनाला फारसा भावला नाही आणि ' भेद ईश्वराने केला ' असे सांगून तो ' ईश्वराच्या बापाला मोडता येणार नाही ' असा प्रतिगामी विचार त्यांनी व्यक्त केला. सामाजिक समतेच्या जरा कुठे



वीर बाजीप्रभू छत्रपति शिवाजीमहाराजांना पावनखिंड लढविण्याचे वचन देत आहे. चित्रकार : रा. व. धुरंधर



रुजू लागलेल्या अंकुराला या रामदासी खाक्याची झळ निश्चित लागली असेल. परंतु एवढा भाग वगळला, तर रामदास हा महाराष्ट्रातच नव्हे तर अवघ्या भारतवर्षात पूर्ण वेगळ्या व्यक्तित्वाने उठून दिसणारा संत आहे. राजकीय दुर्दशा, दारिद्र्य, करंटेपणा, अभद्रपणा, सारांश, लोकजीवनाचा अध:पात करणारी भोवतालची परिस्थिती ज्याला सतत जाणवत होती, असा दुसरा संत देशात झाला नाही. शिवाजी आणि रामदास यांची भेट झाली असो की नसो, शिवाजीमुळे होणाऱ्या राजकीय परिवर्तनाशी रामदासांच्या मनाचा पूर्ण संवाद झालेला होता हे नि:संशय ! म्हणून तर, 'बुडाला औरंग्या पापी, म्लेंच्छसंहार जाहला' असा आनंद ते प्रकट करतात, 'मांडिली मोडली क्षेत्रे' असा निर्वाळा देतात आणि शिवाजीच्या मृत्यूनंतर 'शिवरायाचे आठवावे रूप। शिवरायाचा आठवावा प्रताप' असा संदेश संभाजीला पाठवितात. साहित्यनिर्मितीखेरीज, मोक्याच्या जागी त्यांनी केलेली मठांची स्थापना आणि ठायी ठायी निर्माण केलेली हनुमानाची मंदिरे, आखाडे, रामदासांच्या वेगळेपणाची साक्ष देण्यास पुरेशी आहेत.

सतत चारशे वर्षे संतवाङ्मयाच्या रूपाने महाराष्ट्रात विचारमंथन होत राहिले. भक्तीच्या धाग्याने का होईना, येथील समाज एकत्र बांधला गेला. धार्मिक कृत्य म्हणजे यज्ञयाग आणि कर्मकांड नव्हे; 'ज्यासी आपंगिता नाही, त्यासी धरी जो हृदयीं' तो खरा धार्मिक, हा विचार सर्वमान्य झाला; आणि नामस्मरण, नामसंकीर्तन ही सर्वजनसुलभ उपासना समाजाला शिकविल्यामुळे अन्य धर्मीयांच्या धर्मप्रसाराला तोंड देण्याची शक्ती काही प्रमाणात निर्माण झाली. भक्ती हा महाराष्ट्राच्या सणंगातला ताणा आहे, तर शक्ती हा बाणा आहे. 'देव दुबळ्यांना सांभाळीत नाही,' हे सत्यही महाराष्ट्राला हळूहळू उमगत गेले आणि एकदा उमगल्यानंतर सर्व सामर्थ्यानिशी महाराष्ट्र अन्यायाचा आणि गुलामगिरीचा प्रतिकार करण्यासाठी उभा राहिला.

भक्तिमार्गाची परिणती महाराष्ट्र धर्मामध्ये झाली, असे मानण्यात येते; परंतु 'महाराष्ट्र धर्म' या शब्दाला निश्चित अर्थ नाही. फार तर असे म्हणता येईल की, भागवत संप्रदायातील संतांचा दया-करुणा-शांती यांवर आधारलेला एक प्रकारचा उदारमतवाद, अधिक, एकनाथ रामदास यांनी शिकविलेला स्वाभिमानाचा आणि स्वधर्मासाठी संघर्ष करण्याचा संदेश या दोहोंच्या मिलाफातून शिवकालात निर्माण झालेली महाराष्ट्राची अस्मिता महाराष्ट्रधर्म या नावाने ओळखली जाऊ लागली. वारकरी आणि समर्थ रामदास यांनी भावना आणि मूल्य यांच्या पातळीवर निर्माण केलेल्या या धर्माला शिवछत्रपतींच्या कर्तृत्वाचे तिसरे परिमाण लाभले नसते, तर मात्र महाराष्ट्रधर्म ही एक निरर्थक संकल्पना ठरली असती. भक्तीप्रमाणेच शक्तीची उपासना महाराष्ट्रात झाली, ही इतर प्रदेशांच्या तुलनेने एक वेगळी घटना मानावी लागेल.

भक्तिमार्ग आणि त्याच्या प्रेरणेने निर्माण झालेले साहित्य यांनी महाराष्ट्राच्या जडणघडणीत महत्त्वाचा वाटा उचलला हे खरे असले तरी मऱ्हाटचांच्या मनात महाराष्ट्राविषयी अपार अभिमान निर्माण केला आहे, तो शक्तीच्या उपासनेने.

### ६. तेजस्वी इतिहास

या इतिहासाचे आदिपर्व यादवांच्या कर्तबगारीने निर्माण केले. परंतु अल्लाउद्दिन खिलजी व मलिक कफूर यांच्या हिंस्र आक्रमणापुढे यादवांचे राज्य टिकू शकले नाही. त्यामुळे त्या आदिपर्वामागोमाग तीन शतकांचा वनवास महाराष्ट्राला भोगावा लागला. अल्लाउद्दिन खिलजीच्या स्वारीमुळे क्षीण झालेली मराठ्यांच्या पराक्रमाची ज्योत पुन्हा तेजाळू लागली, ती १६ व्या शतकात. बहामनी राजवटींना जसजशी उतरती कळा लागली तसतशी कर्तृत्वाची आणि पराक्रमाची क्षेत्रे भूमिपुत्र मऱ्हाटचांच्या हाती आपोआप येऊ लागली. याच ज्योतीने यज्ञकुंडाचे उग्र तेज धारण केले, ते १७ व्या शतकात, छत्रपती शिवाजी महाराजांनी 'सारेच नूतन केले' त्या कालखंडात.

छत्रपती शिवाजी महाराज हे महाराष्ट्राचे आजही दैवत आहे. त्यांच्याविषयीचा अभिमान हा महाराष्ट्राच्या अस्मितेचा

छत्रपती शिवाजीमहाराजांची स्वाक्षरी व शिवमुद्रा असलेले आज्ञापत्र. यात लष्करी मोहिमेच्यावेळी वेदमूर्ती पुरुषोत्तम केशव भट यांना त्रास देऊ नये अशी आज्ञा आहे. सेवकांनी जनतेशी कसे वागावे यासंबंधी महाराजांच्या अनेक पत्रात मौलिक उपदेश असे



अविभाज्य भाग आहे. १७ व्या शतकातील भारताचा फार मोठा भाग मोगल साम्राज्यात मोडत असे. त्यात काबूलपासून आसामपर्यंत आणि काश्मीरपासून नर्मदेपर्यंत संपूर्ण उत्तर भारत समाविष्ट होता. दक्षिणेत पाच सल्तनतींनी आपले पाय रोवले होते. मोगल साम्राज्याचा विस्तार लक्षात घेतला, तर त्या काळात एवढे मोठे साम्राज्य जगात अन्यत्र कोठेही नव्हते हे स्पष्ट होते; त्यात पुन्हा सम्राट होता स्वतःला ‘ आलमगीर ’ म्हणवणारा करोल आणि निष्ठुर सम्राट औरंगजेब! हाडा आणि मेवाडी रजपूत वगळले, तर त्याच्याविरुद्ध झुंज घेण्याची कुवत अथवा इच्छाही कोणांत उरलेली नव्हती. दक्षिणेतील शाह्याही त्याला दबून होत्या. आपला घास मोगल सम्राट केव्हा गिळून टाकील, या भयाने त्या व्याकूळ झालेल्या होत्या. त्यांचे आपसांत बेबनाव होते आणि त्यामुळे दक्षिणेतील सत्तेचा तोल वारंवार ढळत असे. शहाजीराजे भोसले अथवा मलिकंबरसारखे कर्ते पुरुष या पाच शाह्यांची सूत्रे आपल्या बोटांत अडकवून त्यांच्यामधील सत्तांतरांचा कळसूत्री खेळ लीलया खेळत असत. परंतु या सर्व सुलतानांना बाजूला करून आपणच दख्खनच्या दौलतीचे स्वामी व्हावे हे काही शहाजी राजांना सुचले नाही. किंवा सुचले असले तर तसे प्रत्यक्ष करण्याचे धाडस त्यांच्या मनात मूळ धरू शकले नाही. परंतु शहाजी आणि शिवाजी या पितापुत्रांमधील ‘ पिढीचे अंतर ’ जबरदस्त होते असेच म्हटले पाहिजे. स्वजनांची होणारी मानहानी, स्वधर्मावर वारंवार पडणारा घाला आणि दीनदुबळ्यांची होणारी पिळवणूक आणि छळ यांनी अस्वस्थ झालेल्या शिवाजीने स्वराज्य स्थापनेचा निश्चय केला आणि आपल्या अंगच्या लोकोत्तर गुणांच्या बळावर महाराष्ट्रात स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा केली. ज्ञानेश्वरांच्याप्रमाणे शिवाजीलाही प्रस्थापित समाजधुरीणांविरुद्ध झुंजावे लागले. छोट्या मोठ्या जहागिरी आणि वतने सांभाळीत बसलेल्या आणि त्यांच्या लोभाने जुलमी सत्तेविरुद्ध हत्यार उचलावयास नाखूष असलेल्या सरदार-वतनदारांचा शिवाजीला विरोधच होता. मोरे-शिर्के-सुर्वे-सावंत प्रभृती त्याकाळचे मातबर सरदार शिवाजीच्या शत्रूंच्या फळीतच राहिले. यामुळे मराठी मातीतून त्याने नवी माणसे उभी केली. मावळखोऱ्यांतले मावळे आणि कोकणचे काटक कुणबी यांचीच मदत घेऊन प्रचंड साम्राज्यशाहीला हादरा देण्याचा चमत्कार शिवाजी राजाने करून दाखविला. हेमाद्रिप्रभृती कर्मकांडपूजकांचा दबदबा नाहीसा करून वारकऱ्यांनी ज्याप्रमाणे जड धार्मिक नेतृत्वाचा निरास केला, त्याप्रमाणे सामान्यांतून असामान्य विरपुरुष निर्माण करून राजा शिवाजीने आणि त्याच्या धारकऱ्यांनी महाराष्ट्रातील राजकीय नेतृत्व साफ बदलून टाकले. सूर्यवंश, चंद्रवंश यांत आपली कुलपरंपरा बसवून खानदानाच्या खोट्या अभिमानाने आपला अहंकार आणि क्षुद्र वतने जोपासत बसलेल्या दिखाऊ दरकदारांची मिजास शिवाजी महाराजांपासून पुढे अगदीच मावळलेली दिसते. शिवकालातील काय आणि नंतर पेशवाईमधील काय, सरदार कारभाऱ्यांच्या नावांकडे नजर टाकली तरी ही गोष्ट स्पष्ट होते. पालकर, पासलकर, जेधे, मालुसरे, गुजर, इत्यादी शिवकालीन धुरंधर पहा, किंवा नंतरही पराक्रमाची शर्थ करणारे जाधव, घोरपडे पहा—ही सर्व माणसे सामान्यांच्या थरांतून आलेली होती. हाच कित्ता गिरवून बाजीरावाने शिंदे होळकरांसारखे नवे सरदार निर्माण केले. ‘ शिवाजीने सारे नूतनच केले ’ असा रामचंद्रपंत अमात्यांच्या आज्ञापत्रांतला अभिप्राय आहे. या नूतन पुरुषार्थात ज्याप्रमाणे शिवाजीचा अलौकिक पराक्रम येतो, शक्ती, युक्ती, सावधानता इत्यादी शककर्त्याला शोभणारे विशेष गुण येतात, त्याचप्रमाणे सामान्य माणसांकडून असामान्य कर्तृत्व करवून घेण्याची त्याची प्रतिभाही येते. शिवाजीच्या थोरवीचा प्रत्यय त्याच्या जीवितकालात तर येतोच, पण त्यापेक्षाही अधिक तो त्याच्या मृत्यूनंतर येतो. १६८० मध्ये शिवाजीच्या मृत्यूनंतर औरंगजेबाशी २७ वर्षे मराठ्यांनी गनिमी काव्याने लढाई चालविली. निर्नायक झालेल्या महाराष्ट्राने मोगलशाहीशी दिलेली झुंज ही शिवाजीने निर्माण केलेल्या स्वराज्याच्या तेजस्वी अभिमानाची ज्वलंत साक्ष आहे! अखेर औरंगजेबाला महाराष्ट्राच्या भूमीत १७०७ साली मूठमाती



परकीयांनी भारताच्या किनाऱ्यावर पाय रोवू नये म्हणून छत्रपती शिवाजी
महाराजांनी बलाढ्य आरमार उभारले व सिंधुदुर्गासारखे जलदुर्ग बांधले



मिळाल्यावरच संपली. मोगल साम्राज्यशाहीचे पेकाट मराठ्यांनी असे मोडले की ती मिळमिळीत सौभाग्यासारखी दिल्लीला जेमतेम टिकून राहिली एवढेच. मोगल साम्राज्याची ही कथा, तर दक्षिणेतील दुबळ्या पातशाह्या नामशेष झाल्या असल्या तर नवल कसले? येथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की शिवाजीची स्वराज्यस्थापना म्हणजे सामान्य सत्तांतर नव्हते; स्वराज्य म्हणजे काय आणि राजधर्म कसा असावयास पाहिजे याचे विलक्षण स्पष्ट भान शिवाजीराजाला होते. त्याने जाणीवपूर्वक दीनदुबळ्यांचा सतत कैवार घेतला आणि त्याची राजवट येण्याआधी मस्तवाल, बलदंड लोकांनी स्त्रीच्या अब्रूची चालवलेली धूळधाण त्याने बंद केली. सैन्याने सर्व रसद सरकारकडून घेतली पाहिजे किंवा आवश्यक तेव्हा बाजारात किंमत मोजून सर्व काही विकत घेतले पाहिजे, असा दंडक घालून देताना त्याने आपल्या अधिकाऱ्यांना वजावले : 'गरिबाच्या भाजीच्या काडीला दाम दिल्याशिवाय हात लावाल तर खबरदार. तसे केल्यास यापरीस मोगल परवडला असे त्यांस होऊन जाईल.' रात्रीच्या वेळी गावातील समया, दिवे विझवून टाकले पाहिजेत अशी सूचना देताना तिच्यामागचे प्रयोजन त्याच्या मनात स्पष्ट होते. उंदीर जळती वात पळवतात आणि त्यामुळे गरिबाच्या गंजीस आग लागण्याचा संभव असतो, हे सांगण्याइतकी त्या प्रजाहितदक्ष राजाची दृष्टी चोख होती, गरिबाचा कैपक्ष घेणारी होती. शिवाजीराजाचे राजकीय यश आणि त्याने गाजवलेले पराक्रम हे जितके महत्त्वाचे, तितकाच त्याचा आदर्श राजधर्म महत्त्वाचा आहे. अशी दृष्टी मराठेशाहीत अखेरपर्यंत राहिली असती तर काय झाले असते, हा आता कल्पनाविलासाचाच विषय म्हणावा लागेल. अर्थात एक पराक्रमी राजा म्हणूनही त्याची थोरवी मोठी आणि मुलखावेगळी आहे. त्याने जुने किल्ले जिंकले, तसे नवे निर्माणही केले. गनिमी काव्याचा एक नवाच साक्षात्कार घडविला. 'टोपीकर, फिरंगी, वलंदेज हे वरकड व्यापाऱ्यांसारखे सामान्य व्यापारी नव्हत' हे ओळखण्याची दूरदृष्टी त्याला होती. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे समुद्रावरून येणाऱ्या आक्रमकांचा बंदोबस्त समुद्रावरच केला पाहिजे हे ओळखून डच, पोर्तुगीज, इंग्रज आणि हबशी आरमारांचा पराभव करण्याएवढे जबरदस्त लढाऊ नौकादल त्याने उभारले. प्राचीन काळानंतर लढाऊ आरमाराची कल्पना करणारा आणि ती प्रत्यक्षात आणणारा तो एकमेवाद्वितीय राजा होता. तो कधी पराभवाने खचून गेला नाही आणि यशाने उन्मत्त झाला नाही. त्याच्या परिस्थितीत असलेला कोणीही इतर धर्माचा द्वेष करणारा झाला असता. परंतु शिवाजीची या बाबतीतली दृष्टी पुष्कळच उदार होती, व्यापक होती. त्याच्या सैन्यातही मुसलमानांचा भरणा होता. हिंदूंच्या देवस्थानांप्रमाणे त्याने मुसलमानांच्या पवित्र स्थानांचाही सांभाळ केला. शिवाजी अत्यंत न्यायी होता. प्रसंगी अपराध्यांना त्याने कडक शासन केले असले, तरी सहसा तो क्षमाशीलतेने वागे आणि कठोर शासन करतानाही त्याची वृत्ती अंध, लहरी, दुष्टपणाची नसे, तर अपराध्याला शासन करून पुढीलांना जरब बसवावी असा त्याचा हेतु असे. तसे पाहिले, तर त्याने जिंकलेले राज्य आकाराने छोटेच होते; कधी कधी तर तो केवळ तळकोकणचा राजा उरत असे! परंतु त्याची योग्यता आणि त्याच्यापासून संभवणाऱ्या धोक्याची व्याप्ती याची कल्पना असल्यामुळे तर शिवाजीचे चिमुकले स्वराज्य नष्ट करण्यासाठी सम्राट औरंगजेब जातीने महाराष्ट्रात ३० वर्षे लढत राहिला. १७ व्या शतकात झालेल्या या कायाकल्पामुळेच १८ व्या शतकात मराठ्यांचे कर्तृत्व दिगंत पसरले. पहिले बाजीराव पेशवे म्हणजे मराठेशाहीने पाहिलेला सर्वांत श्रेष्ठ सेनापती. या सेनापतीने स्वराज्याची सीमा चंबळपार नेली आणि त्याच्या हाताखाली जे शिंदे-होळकर यांच्यासारखे नवे पराक्रमी सरदार तयार झाले, त्यांच्यामुळे दिल्लीच्या पातशाहीचा पायाच उखडला गेला. पूर्वी एकदा शहाजीने पाच पातशाह्या बोटांवर खेळविल्या त्याप्रमाणे मोगल सत्ता हे महादजी शिंद्यांच्या हातचे खेळणे होऊन बसले. सन १७४० मध्ये पहिल्या बाजीरावांना अकाली मृत्यू आला; पण नंतरची २० वर्षे नानासाहेब पेशव्यांच्या कारकिर्दीत मराठ्यांचे वैभव अपरंपार



वाढले. १७६१ मध्ये पानिपतच्या तिसऱ्या युद्धात मराठ्यांचा दारुण पराभव झाला तरीही मराठी अभिमान तडकला नाही की वाकला नाही. थोरल्या माधवरावांनी हरिपंत फडके आणि पटवर्धन अशा सेनानायकांच्या मदतीने मराठी साम्राज्याच्या कक्षा पुन्हा विस्तृत केल्या. निजाम, हैदर यांच्या दक्षिण भारतातील महत्त्वाकांक्षेला मराठ्यांनीच पूर्णविराम दिला. शिवाजी महाराजांनी निर्माण केलेल्या आरमाराची परंपरा कान्होजी आंग्रे यांनी पुढे चालविली आणि दर्यावर पालाण घातले. हे सर्व खरे असले, तरी मराठ्यांचा विजयी वारू पानपतावर छातीत फुटला होता तो पूर्णपणे काही सावरू शकला नाही. रणांगणावरच्या पराक्रमाला शहाणपणाच्या मुत्सद्देगिरीची जोड देणारे नाना फडणवीस लाभल्यामुळे सुमारे चाळीस वर्षे मराठेशाहीचा निभाव लागला एवढेच. १८ व्या शतकाअंती भौतिक विज्ञानाच्या आधारावर बलिष्ठ झालेली पाश्चात्य संस्कृतीची दुर्दम्य लाट भारतावर कोसळली आणि सर्वच राजेरजवाड्यांचा चक्काचूर उडाला. त्यात मराठेशाही देखील तग कशी धरणार ? अंतर्गत दुही, केंद्रसत्ता ठोकरून लावण्याइतका उर्मटपणा आणि अंगात विष भिनावे तसा भिनलेला संकुचित स्वार्थ या व्याधींनी पोखरलेल्या मराठी राज्याच्या मानकऱ्यांना एकेकटे पाडून इंग्रजांनी नेस्तनाबूत करून टाकले. सुखलोलुप झालेल्या दुसऱ्या बाजीरावाने शरणागतीचे शेवटचे संस्कार पुरे केले आणि इंग्रजांचे निशाण महाराष्ट्राच्या छाताडावर रोवले गेले. मराठ्यांचा जरिपटक्याचा हत्ती पारतंत्र्याच्या गाळात रुतला.

आपण हिंदुस्थानचे राज्य जिंकले ते शेवटी मराठ्यांकडून हे इंग्रज पुरते जाणून होते. मरहट्टे सूडाला प्रवृत्त झाल्याशिवाय रहात नाहीत, हेही त्यांना माहीत होते. भारतातील अनेक प्रदेशांत केवळ निष्ठुर छळाच्या बळावर इंग्रजांनी गुलामगिरीच्या शृंखला आवळलेल्या होत्या. महाराष्ट्रात तसे करून चालणार नव्हते. म्हणून वरकरणी सामोपचाराचा मुखवटा चढवून इंग्रजांनी त्याच्यावर नेहमीच सावध करडी नजर ठेवली आणि महाराष्ट्रही शक्य तसे आणि शक्य तेवढे वैर करीतच राहिला! परकीय आक्रमक राज्यकर्त्यांना महाराष्ट्राने मनोमन कधीच क्षमा केली नाही.

मराठेशाही संपून अव्वल इंग्रजीचा कालखंड आला तेव्हा त्याची पहिली पन्नास वर्षे महाराष्ट्राची रयात्र गेल्यासारखी झाली होती. स्वराज्यनाशाचे दुःख आणि इंग्रजी राजवटीच्या नवलाईविषयी अचंबा या दोहोंमुळे कर्ते पुरुषही, भांबावून गेले होते. आपल्याच समाजाची कठोर चिकित्सा करावयास धजावणारा पहिला विचारी पुरुष रावबहादूर गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी हा होय. समाजात अग्रगण्य मानल्या गेलेल्या ब्राह्मणांच्या खुळचट धार्मिक समजुती आणि त्यांची बुरसटलेली विद्या यांवर त्यांनी कडक टीका केली. सामाजिक सुधारणेची प्रबळ प्रेरणा त्यांच्या लेखनाने प्रथम निर्माण केली. त्यानंतरच्या शतकात महाराष्ट्रात उत्तुंग व्यक्तित्वाच्या अनेक महनीय विभूती जन्माला आल्या आणि सर्व अंगांनी विकसित झालेल्या आधुनिक समाजाची पायाभरणी या काळात झाली. त्यांच्यापैकी कोणा एका विभूतीलाच शककर्ता मानणे योग्य होणार नाही; परंतु त्यांपैकी सर्वाधिक प्रभाव लोकमान्य टिळकांचा होता. न्यायमूर्ती रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळ गणेश आगरकर, बाळ गंगाधर टिळक, महात्मा जोतीबा फुले, गोपाळ कृष्ण गोखले या सर्व महापुरुषांनी नव्या महाराष्ट्राची प्रभात निर्माण केली. त्यानंतरही महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, महर्षी कर्वे, सेनापती बापट, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, साने गुरुजी अशी तपस्वी आणि मनस्वी माणसे होऊन गेली. या सर्वांनाच महाराष्ट्राचे भाग्यविधाते म्हणता येईल. इंग्रजी सत्तेच्या विरुद्ध धैर्याने लढणारे लोकमान्य टिळक यांचे स्थान त्यांत अग्रगण्य आहे ते यासाठी की त्यांनीही जनसामान्यांच्या शक्तीवरच राजकीय स्वातंत्र्य मिळू शकेल 'ही' श्रद्धा अभंग ठेवली आणि ज्ञानेश्वर आणि शिवाजीमहाराज यांच्याप्रमाणेच समाजाच्या सर्व थरांमध्ये आपले तेजस्वी विचार पेरण्याचे व्रत घेतले. स्वातंत्र्यसंपादन आणि स्वातंत्र्यरक्षण या दोहोंसाठी आधार

*महात्मा जोतिबा फुले. सामाजिक अन्यायाविरुद्ध बंड पुकारणारे आद्य समाज सुधारक*

केवळ लोकशक्तीचाच असू शकतो, हे टिळकांनी ओळखले होते. त्यांच्या अंगी असामान्य धैर्य होते आणि राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठी देहदंड सोसण्याची त्यांची सदैव तयारी होती. लोकसागराच्या सामर्थ्यावरच गांधीजींचाही विश्वास होता आणि लोकमान्य टिळकांनंतरच्या भारतीय राजकारणात म्हणूनच अनेक स्तरांवरचे नेतृत्व उभे राहिले.

१८५७ चे स्वातंत्र्य समर, वासुदेव बळवंतांची बंडखोरी, लोकमान्य टिळकांनी आरंभिलेला व्यापक संग्राम, चाफेकर, कर्वे, कान्हेरे, सेनापती बापट, सावरकर प्रभृतींचा आतंकवादी सशस्त्र क्रांतीचा प्रयत्न, गांधी युगातील सत्याग्रह पर्व, 'करेंगे या मरेंगे' अशा निर्धाराने झालेले १९४२ चे आंदोलन .... सारांश, वैयक्तिक किंवा सामूहिक प्रतिकाराचा जो जो मार्ग दृष्टिपथात आला, तो तो मार्ग स्वीकारून महाराष्ट्र लढतच राहिला.

येथून पुढे एकाद्या व्यक्तीच्या पराक्रमापेक्षा समाजाच्या सामूहिक पुरुषार्थालाच अधिक महत्त्व आल्यामुळे महाराष्ट्राचे भाग्यविधान करणाऱ्या सर्व लहानथोर पुढाऱ्यांची आणि कार्यकर्त्यांची आता कृतज्ञतेने आठवण करणे एवढेच आपल्या हाती आहे. तरीही फटक्यांचा देहदंड सोसणारे शंकरराव देवांसारखे देशभक्त, राष्ट्रासाठी आपले प्राण तुच्छ मानणारे सेनापती बापट, राष्ट्रीय स्वातंत्र्याबरोबरच सर्व दु:खितांसाठी आणि दलितांसाठी कळवळणारे साने गुरुजी यांसारख्यांचे व्यक्तिगत जीवनही हजारोंना प्रेरणा देणारे ठरलेले आहे. महात्मा फुले आणि छत्रपती शाहू महाराज यांनी दलितांचा अभिमान जागवला होताच तो डोळस केला महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांनी. पुढे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यासारखा कडवा लढवय्या नेता मिळाल्यावर समाजाच्या तळाच्या थरांतील सर्व उपेक्षितांना, दलितांना, संघर्षाची दीक्षा मिळाली. दया नको, न्याय हवा—ही नवी जाणीव बाबासाहेबांनी निर्माण केली आणि रुजविली. विसाव्या शतकातील या विभूतींचा पुरुषार्थ पहाता एक गोष्ट नजरेत भरते ती अशी की, राजकीय आघाडीप्रमाणेच सामाजिक समतेच्या आघाडीवरही महाराष्ट्र अग्रेसरच राहिला. महाराष्ट्राच्या पराक्रमाची ही गाथा



*भारतीय असंतोषाचे जनक आणि लोकशक्तीचा उपयोग स्वातंत्र्य चळवळीसाठी करून घेणाऱ्या राजकारण्यांचे अग्रणी लोकमान्य बाळ गंगाधर टिळक*

तेजस्वी आहे, परंतु ती सर्वार्थी यशस्वी नाही याची जाणीव अर्थातच ठेवली पाहिजे. भारतीय समाजाला ग्रासणारे दोष महाराष्ट्रालाही भोवत आहेतच. अज्ञान, रूढिबंधने, जातिभेद या शापांतून येथील समाजही मुक्त नाही. तरीही तारतम्याने पाहिले तर भारतातील सर्वांत अग्रेसर समाज महाराष्ट्रीयच आहे याचा गर्व आम्हा मऱ्हाटय़ांना जरूर आहे. स्त्री-स्वातंत्र्य, स्त्रीशिक्षण, जातिनिर्मूलन, सर्वधर्मसमभाव, विज्ञानस्वीकार, शेती आणि उद्योग या क्षेत्रांत आधुनिक तंत्रज्ञानाचा अवलंब, सहकार, परिवारनियोजन अशा अनेकविध बाबतींत इतर समाजांशी आम्हा मऱ्हाटय़ांची कोणीही वस्तुनिष्ठपणे तुलना करावी — आम्ही प्रत्येक क्षेत्रात एक पाऊल तरी पुढेच असल्याचा निर्वाळा मिळेल.

मराठय़ांच्या मनात आपल्या तेजस्वी इतिहासाविषयी ओतप्रोत अभिमान भरलेला असतो. या इतिहासाभिमानाने त्यांचे सत्त्व आणि स्वातंत्र्यप्रेम सदैव जागृत ठेवलेले आहे. पण त्याबरोबर वडिलांच्या कीर्तीवर याही काळात फुशारकी मारण्याचा अवगुणही आम्हाला जडला आहे. महाराष्ट्राचे त्रिदोष सांगताना, विनोबा भावे यांनीही या अतिरेकी इतिहास प्रेमावर बोट ठेवले आहे. 'इतरांना फक्त भूगोल आहे; महाराष्ट्राला मात्र इतिहास-भूगोल दोन्ही आहेत' ही दर्पोक्ती आचार्य अत्रे यांची असली तरी तिच्यात बहुसंख्य महाराष्ट्रीयांचे मनोगत व्यक्त झाले आहे. या अतिरेकी इतिहासप्रेमामुळेच सध्याच्या युगातही मराठी माणसे स्वयंतुष्ट असल्यासारखी वागतात आणि कधीकधी अकारण वैरीही निर्माण करून ठेवतात.

### ७. सौंदर्याची उपासना

महाराष्ट्रात विठ्ठल भक्तीचा प्रचंड डांगोरा पिटला जातो आणि इतिहासकालीन पराक्रमाची नौबतही धडाक्याने वाजत असते. त्यातच आमच्या रांगडेपणाचा लौकिक असा काही पसरलेला आहे की महाराष्ट्रात सौंदर्याची उपासना अखंड चालत आली आहे या गोष्टीकडे अनेकांचे लक्षच जात नाही ! परंतु



*छत्रपती शाहूमहाराज. कोल्हापूर संस्थान जरी लहान होते तरी शाहू महाराजांनी सामाजिक अन्यायाचे निवारण व पददलितांची उन्नती यासाठी अहर्निश प्रयत्न करून छत्रपती शिवाजीमहाराजांचा 'राजधर्म' पुढे चालविला*



शक्ती आणि भक्ती, या ताण्याबाण्यांनी विणलेल्या महाराष्ट्राच्या महावस्त्राला जरीचे काठ आणि जरीचे बुंद लावलेले आहेत ते सौंदर्योपासनेने. ही सौंदर्योपासना ललित कला आणि प्रयोगापेक्षी कला — या दोन्ही क्षेत्रांत अखंडपणे चाललेली आहे. आता हे खरे की उत्तर भारताच्या मानाने महाराष्ट्रात साधनसमृद्धी आणि ख्यालीखुशाली कमी आहे आणि दक्षिण भारताला तुलनेने जशी सतत अधिक शांतता लाभली तशी शांतत महाराष्ट्राला लाभली नाही. त्यामुळे महाराष्ट्रातील कला-वैभवा उत्तरेतल्या बुलंद इमारतींची भव्यता नाही आणि दक्षिणेतील सुंदर मंदिरांतील नक्षीकामाची नजाकतही नाही. महाराष्ट्रातील स्थापत्य आम्हा मराठ्यांसारखे अटकर बांध्याचे आहे. देवळे ठेंगणी आणि लहानखुरी आहेत. अंबरनाथ किंवा सिन्नर इथल्या देवळांसारखे चारदोन अपवाद वगळले, तर शिल्पी लोकांची करामत फारशी दिसत नाही. किल्ले आणि वाडे बांधताना काही घट्टमुट्ट बांधकाम महाराष्ट्रात झाले आहे. क्वचित कळाशीदार कारंजी, चौक आणि वगीचेही आहेत. पण भव्यतेपक्षा उपयुक्ततेलाच महत्त्व जास्त आहे. घारापुरी, कार्ले, भाजे, वेरूळ, अजिठा, कान्हेरी ही सर्व सौंदर्यतीर्थे आहेत ; घारापुरीच्या त्रिमूर्तीएवढे भव्य आणि प्रभावी शिल्प दुनियेत क्वचितच पहावयास मिळते; सुडौल रेषा आणि भावदर्शी मुद्रा यांनी अतुलनीय ठरलेली अजिठ्याच्या लेण्यांतली चित्रकला आणि वेरूळच्या लेण्यांतील पाषाणशिल्पांची गतिमानता यांना जगात कुठे तोड नाही; मूर्तिकलेचेही काही उत्तम नमुने महाराष्ट्रातील मंदिरांतून आणि गुंफांमधून पहावयास मिळतात; पण ही सर्व महाराष्ट्राची प्राचीन काळची कमाई आहे. महाराष्ट्रा 'महाराष्ट्रपण' निर्माण होण्यापूर्वीची ती कामगिरी आहे. पुढे मात्र महाराष्ट्राबाहेरच्या महाराष्ट्राने म्हणजे ग्वाल्हेर, इंदूर, वडोदा, तंजावर येथील राज्यांनी स्थापत्य आणि चित्रकला यांची बऱ्यापैकी जोपासना केली आहे. अलीकडे पेशवेकालीन चित्रकलेचे काही चांगले नमुने प्राप्त झाले आहेत. आधुनिक भारतात मात्र अनेक महाराष्ट्रीय चित्रकारांना फार मोठे यश आणि लौकिक

*महात्मा गांधी महाराष्ट्राला विधायक कार्यकर्त्यांचे मोहोळ म्हणत असत वर्ध्याजवळील सेवाग्राम हे एक तप महात्माजींच्या राजकीय व विधाय कार्याचे मुख्य केंद्र होते*

मिळाला असल्याचे दृश्य दिसेल. केरळीय चित्रकार राजा रविवर्म्यानें महाराष्ट्र आपले घर केल्यापासून अभिजात वळणाचे चित्रकार पुष्कळ निर्माण झाले. बाळासाहेब पंतप्रतिनिधी, रावबहादुर धुरंधर, बाबूराव पेंटर वगैरे चित्रकार या पंक्तीतले आहेत. मुंबई शहरात कलाशिक्षणाचा आरंभ झाल्यापासून विशिष्ट चित्रकारांना मुंबईपठडीतले म्हणण्याचा रिवाज पडला. परंतु चित्रकलेच्या विविधतेचे आणि वैयक्तिक प्रतिभेचे नवेनवे उन्मेष प्रकट होऊ लागल्यानंतर आत्मनिष्ठ चित्रकार आपापल्या स्वतंत्र प्रतिभेने चमकू लागले आहेत. त्यांच्यावर पठडीचा शिक्का राहिला नाही. हा मुंबईचा, तो बडोद्याचा आणि हा तिसरा कोल्हापूरचा या लेबलांना फारसा अर्थ राहिला नाही. बेंद्रे, हुसेन, आरा, आलमेलकर, सातवळेकर, बी. प्रभा, हळदणकर, पळशीकर, बडणगेकर, मोहन सामंत अशा अनेक प्रवृत्तींच्या चित्रकारांची नावे येथे सांगता येतील. पण नावे आणि व्यक्तिगत गुणधर्म यांचा विचार येथे प्रस्तुत नाही. चित्रकलेतील नव्या ऊर्मींचे दर्शन महाराष्ट्रात भरपूर होऊ शकते, एवढेच येथे सांगण्याचा हेतू आहे. त्यामानाने महाराष्ट्रातील शिल्पकला डोळ्यांत भरण्यासारखी नाही; तिला जवळ असणारी पुतळे घडवण्याची जी कला आहे, तिचा मात्र खूपच उच्च दर्जाचा आविष्कार महाराष्ट्रात झालेला आहे. फडके, म्हात्रे, करमरकर, तालीम, साठे, सोनवडेकर, राम सुतार अशी मातबर मंडळी या क्षेत्रात लक्षणीय कामगिरी करून गेली आहेत, करून राहिली आहेत.

नाटक आणि संगीत या दोन कला भारतात महाराष्ट्राएवढ्या क्वचितच कोठे विकसित झालेल्या असतील. वन्यजीवनापासून ते आधुनिक शहरी जीवनापर्यंत या दोन कलांचे दर्शन अनंतरूपांनी घडत राहाते. मुंबईपासून जेमतेम शंभर किलोमीटर अंतरावर आदिवासी वाड्या-वस्त्या लागतात. वारली, ठाकर, कोळी, कोकणे अशा अनेक नावांचे हे लोकसमूह कष्टाचे आणि दारिद्र्याचे जिणे जगत असतात; परंतु त्यांचे सर्व सण आणि उत्सव मात्र गाण्या-नाचण्याशिवाय साजरे होत नाहीत. तारपे



*महात्मा फुले यांनी दलितांचा स्वाभिमान जागृत केला तर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी त्यांना सामाजिक समतेसाठी लढा देण्यास प्रवृत्त केले. बाबासाहेब हा लढा अनेक पातळ्यांवरून लढले*



आणि ढोल यांच्या साथीने सजलेले त्यांचे कार्यक्रम रात्र-रात्रभर चालू राहतात. दूर विदर्भातही गोंड आणि माडिया यांचे जीवन त्यांच्या समाजातील आनंदाच्या प्रसंगी असेच विविध नृत्यांनी नटते. मराठवाड्याच्या उत्तर भागात वंजारा समाजाची वस्ती मोठी आहे. त्यांचा एक वेगळाच रंग आहे. वन्य नव्हेत पण पूर्ण ग्रामीणही नव्हेत अशा समाजांत देखील लोककलांचे अनेक प्रकार प्रचलित आहेत. माळा-पठारांवर शेळ्या-मेंढ्या घेऊन फिरणाऱ्या धनगरांची गजानृत्यासारखी नृत्ये ग्रामीण महाराष्ट्रात खूपच लोकप्रिय आहेत. याशिवाय बंदरपट्टीचे कोळी, कोकणातून घाटावर पोटापाण्यासाठी येणारे ' बाल्ले ', खंडोबाचा येळकोट करीत भक्तीच्या मस्तीत नाचणारे वाघे आणि मुरळ्या ही सर्व मंडळी लोककलांची श्रीमंती वाढवतात. शेतीप्रधान समाजात शेतकऱ्यांच्या औदार्यावर आपली उपजीविका करणारे नाना प्रकारचे लोक असतात, तसे महाराष्ट्रातही पूर्वापार आहेत. त्यांतले काही भिक्षा मागतात; पण भिक्षेच्या मोबदल्यात गावोगाव ते मनोरंजनही करतात. वासुदेव, भुत्या, चित्रकथी, भराडी, जोशी, सहदेव भाडळी, गोंधळी असे त्यांचे कैक प्रकार मराठी भूमीवर वावरत असतात. प्राचीन वाङ्मयात नट, नागर, भांड, इत्यादींचे उल्लेख आहेत. विठोबा, खंडोबा, अंबाबाई, मरीआई, भैरोबा अशा अस्सल मऱ्हाटी देवांची भक्ती करणारे हे कलावंत असतात. गोंधळी तर खेड्यापाड्यांतून धार्मिक आणि सामाजिक-धार्मिक प्रसंगी आवर्जून बोलावले जातात. शिवकालाच्याही पूर्वीपासून गोंधळी, दांगट, भराडी कलाकार पवाडे गात फिरत असत. पुढे शाहिरी कलेचा विकास झाल्यावर ,' अकट-बिकट कवनांच्या चाली 'मधले पवाडे गाणारे व्यावसायिक शाहीर लोकमंचावर आले आणि ही मंडळी जरा मागे पडली. शूर मर्दाचा पोवाडा शूरमर्दाने ऐकावा असा दंडक शिवाजी महाराजांच्या काळात पडल्यापासून पोवाड्याने मराठी माणसाचे मन जिंकले आहे. वीरांची चरित्रे आणि वीरतेच्या घटना हे पोवाड्यांचे विषय असतात. त्यांचा ढंग नाट्यपूर्ण आणि ओजस्वी असतो, मोजक्या झिलकऱ्यांच्या म्हणजे साथीदारांच्या मदतीने आणि तुणतुणे, डफ, ढोलकी व मंजिरा अशा साध्या वाद्यमेळाच्या साथीने शाहीर आपल्या बुलंद आवाजात जेव्हा पोवाडा गातो तेव्हा ऐकणाऱ्यांच्या मनालाही काही वेगळेच स्फुरण होऊ लागते. देवळात भजन आणि चव्हाट्यावर शाहिरी कला यांमध्ये ग्रामीण जनता रंगून जाते. पुढे लावण्यांची रचना होऊ लागल्यानंतर त्यांची मुक्त मस्ती अनुभवण्याची असोशी मराठी मनाला निर्माण झाली. पेशवाईमध्ये अनंतफंदी, रामजोशी, होनाजी, प्रभाकर, परशराम, सगनभाऊ वगैरे नामांकित शाहीर होऊन गेले. १९व्या शतकाच्या उत्तरार्धात आणि २० व्या शतकाच्या पूर्वार्धात तमाशाच्या कलेला नवे बळ मिळाले. पठ्ठे बापूराव हे या काळातील अग्रगण्य लावणीकार होत. ह्या काळातील तमाशामध्ये गण, गौळण आणि लावण्या यांच्या गायनाबरोबरच हजरजबाबी संवादांनी फुलवलेले वगनाट्यही रांगड्या मनाला पसंत पडू लागले. आजही महाराष्ट्रात व्यावसायिक तमासगिरांचे अनेक फड अतिशय लोकप्रिय आहेत. या क्षेत्रात भाऊ बापू नारायणगांवकर, कौसल्या कोपरगांवकर अशा काही मातबर कलाकारांना फार मोठी कीर्ती मिळाली. शाहिरी कला आणि तमाशाची कला यांचे जनमानसातील स्थान काय आहे याचा अंदाज आल्यानंतर महाराष्ट्रात सामाजिक आणि राजकीय प्रबोधन करू पाहणाऱ्या भिन्नभिन्न विचारप्रणालींच्या पक्षांनी हे लोककलेचे माध्यम आपल्या मतप्रसारासाठी वापरले. सत्यशोधकी तमाशा, आंबेडकरी तमाशा, अमर शेख यांचे साम्यवादी कलापथक आणि समाजवादी विचारांचे राष्ट्रसेवादल कलापथक या सर्वांनी प्रभावी लोकनाट्ये सादर केली. केवळ पोवाड्यांची कला विकसित करणारे आणि तिला कालानुरूप स्वरूप देणारे असेही शाहीर २०व्या शतकातसुद्धा पुष्कळ झाले आहेत. शाहीर खाडिलकर, मुचाटे, नानिवडेकर, दीक्षित, पिराजीराव सरनाईक, शाहीर निकम, अमर शेख, शाहीर साबळे, लीलाधर हेगडे अशा प्रसिद्ध शाहिरांची नामावळी पुष्कळ मोठी आहे. एखाद्या जत्रेच्या वेळी पहावे तर लोककलांच्या दर्शनासाठी हजारो माणसांची झुंबड उडालेली दिसते. चव्हाट्यावर, पारावर, मैदानातील मोकळ्या जागेवर आणि मोठमोठ्या कनाती

*तमाशा ही महाराष्ट्रातील सर्वात लोकप्रिय कला आहे. त्यात नृत्य, गायन व संवाद या तीनही बाजू असतात.*



जुन्या मराठी नाटकातील सूत्रधार



लावून वेगवेगळे लोककलांचे उपासक वातावरण झंकारून सोडतात.

मध्ययुगीन भारतात नाटक आणि रंगभूमी जवळजवळ लुप्तप्रायच झालेली होती. परंतु तंजावरच्या मराठा राजवटीत म्हणजे १८ व्या शतकात तेथील राजांच्या प्रोत्साहनाने आणि त्यांच्या स्वतःच्या प्रतिभेने मराठी नाटयसृष्टीचा किंवहुना भारतीय नाटयसृष्टीचा उगम झाला. दुर्दैवाने दळणवळणाच्या अभावीं तंजावरी नाटक महाराष्ट्रापर्यंत पोहोचलेच नाही. त्यामुळे १८४३ साली सांगली येथे तेथील राजाच्या सूचनेवरून विष्णुदास भावे यांनी रचलेले 'सीता-स्वयंवर' नाटक म्हणजे मराठी नाटकाची गंगोत्री मानली जाते. येथून पुढे ४० वर्षांचा काळ मुख्यतः पौराणिक नाटकांचा होता. आणि ही नाटके वव्हंशीं विष्णुदासी पद्धतीचीच होती. इचलकरंजीकर नाटक मंडळीचे नाटककार 'बावाजीशास्त्री दातार' यांनीही विपुल नाटके रचली. त्यानंतर अनुवादित नाटकांमुळे संस्कृत नाटयसृष्टी आणि शेक्सपियर, मोलिअर इत्यादींची नाटके महाराष्ट्रीय सुशिक्षितांच्या परिचयाची झाली. १८८० मध्ये अण्णासाहेब किर्लोस्करांचे 'शाकुंतल' रंगभूमीवर आल्यापासून मराठी रंगभूमीचा वैभवकाळ सुरू झाला. किर्लोस्कर,देवल, कोल्हटकर, गडकरी, खाडिलकर, वीर वामनराव जोशी, वरेरकर, अत्रे, रांगणेकर अशा भिन्न-भिन्न प्रकृतीच्या नाटककारांनी उत्तमोत्तम नाटके लिहिली. भाऊराव कोल्हटकर, गणपतराव जोशी, केशवराव भोसले, वालगंधर्व, मास्टर दीनानाथ, केशवराव दाते, गणपतराव बोडस, नानासाहेब फाटक, दुर्गा खोटे, ज्योत्स्ना भोळे इत्यादी प्रतिभाशाली कलाकारांनी आपल्या अभिनयाने आणि गायनाने अर्धशतकाहून अधिक काळ महाराष्ट्राच्या मनावर अधिराज्य चालवले. अवघ्या शंभर वर्षांच्या रंगभूमीच्या इतिहासात 'सौभद्र', 'शारदा', 'संशयकल्लोळ', 'एकच प्याला', 'स्वयंवर', 'मानापमान', 'कीचकवध', 'भाऊबंदकी', 'लग्नाची बेडी', 'आंधळयांची शाळा', 'कुलवधू' वगैरे उत्तमोत्तम नाटके निर्माण व्हावी हा महाराष्ट्राचा भाग्ययोगच म्हटला पाहिजे.

आजही महाराष्ट्र हा नाटकवेडा मुलूख आहे. येथे अनेक व्यावसायिक नाटक कंपन्या नित्यनेमाने आपापले प्रयोग सादर करीत असतात. पण त्यांच्याशिवाय हौशी नटसंचही फार मोठया संख्येने आणि उत्साहाने कलोपासना करीत असतात. महाराष्ट्रात नाटक हे फक्त राजधानीच्या शहरापुरते मर्यादित नाही. अनेक शहरांतून इतकेच काय, छोटया-मोठया खेडयांतूनही त्याचा भरपूर प्रसार झालेला आहे. गिरणगावात फेरफटका करणाऱ्यालाही ठिकठिकाणी रंगभूमीच्या उपासकांचे अड्डे आढळतील. असे नाटकाचे वेड भारतात अन्यत्र कोठेही नाही म्हटले तरी चालेल.

रंगभूमीप्रमाणेच महाराष्ट्रात संगीत कलेलाही माहेरघर मिळालेले आहे. अभिजात संगीताचे पुनरुज्जीवन झाले ते अव्वल इंग्रजीत. पंडित वाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, पंडित विष्णु दिगंबर पलुस्कर, पंडित भातखंडे, भास्करबुवा वखले, प्रो० देवधर, नारायणराव व्यास, विनायकबुवा पटवर्धन, पं० रातंजनकर प्रभृतींनी हिंदुस्तानी अभिजात संगीताचा प्रसार भारतभर करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. महाराष्ट्रात प्रतिभाशाली गायकांची दीर्घ परंपरा निर्माण झाली. भूगंधर्व रहिमत खाँ, अब्दुल करीम खाँ, अल्लादिया खाँ आणि या सर्वांचे शिष्य-प्रशिष्य यांनी महाराष्ट्रात अभिजात संगीताच्या रसिकांचा फार मोठा वर्ग निर्माण केला. वझेबुवा, भास्करबुवा, मास्टर कृष्णराव, वालगंधर्व, सुरेशवाबू माने, हिरावाई वडोदेकर, केसरवाई केरकर, मोगूवाई कुर्डीकर, भीमसेन जोशी, वसंतराव देशपांडे, कुमार गंधर्व, पं० जसराज, जितेंद्र अभिषेकी, माणिक वर्मा, किशोरी आमोणकर, प्रभा अत्रे अशा सर्व उल्लेखनीय कलाकारांची मोठी नामावळी सांगायचा मोह टाळून तूर्त एवढेच नमूद केले पाहिजे की अखिल भारतामधील गाणारे वजावणारे कलावंत, मग ते थोर असोत की होतकरू, आपल्या कलेचे चीज करण्यासाठी महाराष्ट्राकडेच मोहोरा वळवितात. 'गानवाले जगह जगह पर होते हैं, सुननेवाले सिर्फ महाराष्ट्र में मिलते है' हा एका बुजुर्ग गायकाचा—वडे गुलाम अलींचा अभिप्राय पुरेसा बोलका आहे. ज्या निष्ठेने तामीळनाडूमध्ये घरच्या लेकी-सुना भरतनाटयम्‌ची साधना




स्त्रीला समाजात आदराचे स्थान मिळावे यासाठी प्रयत्न करण्यात महा-
नेहमीच अग्रेसर राहिला आहे. स्त्री मुक्ती संघटनेच्या 'मुलगी झाली
नाटकातील एक प्रवेश



करतात, त्या निष्ठेने मराठी मुलुखातील लेकी-सुना आणि पुरुषही अभिजात भारतीय संगीताची उपासना करताना आढळतील.

महाराष्ट्राला खास त्याची अशी अभिजात नृत्यशैली नाही. मात्र गेल्या ५०–६० वर्षांत भरतनाट्यम् आणि कथ्थक या दोन शैली आत्मसात करणाऱ्या महाराष्ट्रीय नर्तकांनी डोळ्यात भरेल असे यश मिळविले आहे. भरतनाट्यम्चे गुरू पार्वतीकुमार आणि कथ्थक नर्तिका रोहिणी भाटे व दमयंती जोशी ही नावे वानगीदाखल पुरेशी आहेत. विशेषतः महाराष्ट्रातील शहरांमधून अलिकडे नृत्यसाधना विकसित स्वरूपात दिसू लागली आहे. महाराष्ट्रात रसिकांची उणीव नसल्यामुळे, गायकांप्रमाणेच भारताचे ख्यातनाम नर्तक आणि वादकही येथे आनंदाने हजेरी लावतात. गोपीकृष्ण व सितारा या कथ्थक नर्तक भाचा-मावशीप्रमाणे महाराष्ट्रात कायम वस्तीला आलेल्या अन्य प्रांतीय कलावंतांची महाराष्ट्राला नेहमी आठवण असते.

चित्रपटसृष्टीचा भारतातील मूळारंभ महाराष्ट्रात झाला, ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. दादासाहेब फाळके भारतीय चित्रसृष्टीचे जनक म्हणून ओळखले जातात. भारतीय चित्रपटाच्या विकासक्रमातला ‘ प्रभातकाल ’ महाराष्ट्रातच पहावयास मिळतो. बाबूराव पेंटर, भालजी पेंढारकर, मास्टर विनायक, व्ही० शांताराम यांची ख्याती देशभर झाली. आजही चित्रपटामधील अभिनय, छायाचित्रण, संकलन, संगीतरचना इत्यादी क्षेत्रात अनेक नामवंत महाराष्ट्रीय आहेत. एका नावाचा तर सुवर्णाक्षरांनी उल्लेख केला पाहिजे. स्वरसम्राज्ञी लता मंगेशकर आज केवळ भारतातीलच नव्हे तर अवघ्या दुनियेतील पार्श्वगायक-गायिकांच्या तारांगणातले सर्वात तेजस्वी नक्षत्र ठरले आहे.

गेल्या १०० वर्षांच्या इतिहासाकडे नजर टाकली, तरी असे दिसेल की, देशात निर्माण होणाऱ्या प्रत्येक नव्या उपक्रमात आणि समाजहितार्थ होणाऱ्या आंदोलनात महाराष्ट्र आघाडीवर राहिलेला आहे. राष्ट्रीय सभेची स्थापना, स्वातंत्र्याचे आंदोलन, धर्मसुधारणेच्या चळवळी, समतेसाठी सुरू असलेले भगीरथ प्रयत्न, कला-क्रीडा यांमधील नवीन स्फुरणे, सर्वत्र महाराष्ट्र बिनीवर आहे. टिळक आणि गांधी यांच्या युगातील राष्ट्रीय आंदोलनाच्या वातावरणात महाराष्ट्राने अंगेजणीने भाग घेतला आहे. स्वातंत्र्यानंतरही देशावर आलेल्या संकटांच्या प्रसंगी महाराष्ट्र पुढे सरसावला आहे. दलितांनी चालविलेला संघर्ष असो, स्त्रीमुक्ती आंदोलन असो, बालविवाह, हुंडा इत्यादी रूढींविरुद्धचा लढा असो, दलित साहित्य किंवा रंगभूमी यांचे प्रवर्तन असो, पहिले पाऊल उचलले आहे ते महाराष्ट्राने. राजकीय आणि सामाजिक क्षेत्रात एकेकाळी बंगालकडे नेतृत्व होते. बघता बघता महाराष्ट्र वेगाने पुढे आला. क्रीडेच्या प्रांगणात भारतातील पंजाब, बंगालसारख प्रदेश खूपच पुढारलेले आहेत. परंतु काही खेळांत तरी महाराष्ट्रच अग्रगण्य आहे. देशी खेळांत कबड्डी, पाश्चात्य खेळात क्रिकेट आणि बैठ्या खेळांत बुद्धिबळ, यांची नावे येथे कोणाच्याही लक्षात येतील.

भक्तीला दिलेले समतेचे अधिष्ठान, शक्तीला मिळालेले स्वातंत्र्यप्रेमाचे वरदान आणि या दोहोंबरोबरच अखंडपणे चाललेली सौंदर्योपासना या सर्वांनी मिळून महाराष्ट्राचे महावस्त्र विणलेले आहे. या तिन्ही क्षेत्रांत महाराष्ट्राचे खास वेगळेपण आहे. या तिहींनी मराठी माणसाच्या जाणिवा कळत-नकळत विकसित केल्या आहेत. त्यांतून महाराष्ट्राची बलवत्तर अस्मिता साकार होते. प्रस्तुत लेखनाची मर्यादा थेट अद्ययावत घटनांपर्यन्त ताणावयाची कल्पना नसल्यामुळे, अलिकडच्या घडामोडींचे विवेचन करणे शक्य नाही. तरीही काही गोष्टींकडे लक्ष वेधणे अत्यावश्यक आहे. या गोष्टी अलिकडच्या खऱ्या, परंतु महाराष्ट्राची प्रगतिपर दृष्टी, चिवट जिद्द, आणि स्वदेशाविषयीची आस्था या अनेक शतकांच्या गुणधर्मांचाच आधुनिक आविष्कार त्यांच्यात दिसतो. राजकीय जागृती सामाजिक प्रबोधन आणि विधायक कर्तृत्व या तीन माध्यमांद्वारा आधुनिक भारताची घडण होत आहे आणि या तिन्ही बाबतींत महाराष्ट्राचे श्रेय अक्षरशः अद्वितीय आहे.



महात्मा गांधींचे श्रेष्ठ अनुयायी संत विनोबा भावे. 'सब भूमि गोपाल की' हा भूमीदानाचा संदेश भारतभर पोचविण्यासाठी विनोबांनी देशभर पदयात्रा केली



लोकमान्य टिळकांपासून जिचा आरंभ झाला ती ज्वलंत स्वातंत्र्याकांक्षा महाराष्ट्रात कधीच शबल झाली नाही, क्षीण झाली नाही, याचा उल्लेख पूर्वी झालेला आहेच. तसेच सामाजिक न्यायासाठी आधुनिक भारतात झालेल्या विचारमंथनात आणि संघर्षात मनःपूर्वक सहभागी झालेल्या थोर पुरुषांची कृतज्ञ आठवणही आपण नमूद केलेली आहेच. या दोन्ही गोष्टींबरोबर महाराष्ट्राच्या विधायक कार्यकर्त्यांचाही गौरवाने उल्लेख केला पाहिजे. ' महाराष्ट्र म्हणजे विधायक कार्यकर्त्यांचे मोहोळ आहे ', असे महात्मा गांधी नेहमी म्हणत. खादी-ग्रामोद्योग, राष्ट्रभाषा प्रचार, ग्रामस्वराज्य, कृषिसुधारणा, अंत्योदय, कुष्ठनिवारण, नवभारताच्या निर्मितीसाठी आवश्यक असलेल्या अशा अनेक कार्यांना स्वतःचे जीवन निष्ठेने वाहून टाकणारे विधायक कार्यकर्ते महाराष्ट्राने देशाला दिले. रत्नागिरी जिल्ह्यातील अप्पासाहेब पटवर्धन, बोर्डीचे आचार्य भिसे, नाशिक जिल्ह्यातील दत्तोपंत बिडकर, खानदेशातील बाळूभाई मेहता, अण्णासाहेब दास्ताने, पुण्याचे हरिभाऊ फाटक, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, नागपूरच्या कमलाबाई होस्पेट, अमरावतीचे शिवाजीराव पटवर्धन या गेल्या पिढीतील विधायक कार्यकर्त्यांपासून ते आजही कार्यरत असलेल्या बाबा आमटे, मणीभाई देसाई, विलासराव साळुंके, देवल इत्यादींपर्यन्त खूपच मोठी यादी करावी लागेल. आणि या वस्तुस्थितीमुळेच तर गांधीजींनी महाराष्ट्राला ' कार्यकर्त्यांचे मोहोळ ' म्हणून गौरविले.

असा आहे आमचा रांगडा पण रसिक महाराष्ट्र. भाविक पण झुंजार महाराष्ट्र. स्वतःच्या मुलुखाबरोबरच साऱ्या देशाची नित्य चिंता वाहणारा महाराष्ट्र. जेथे अवघ्या राष्ट्राला महान मानण्याची परंपरा आहे तो हा महाराष्ट्र. ऐष-आराम आणि मिजास यांच्यापेक्षा सत्त्व आणि साधेपणा जवळ करणारा महाराष्ट्र. तत्त्वासाठी भांडणारा आणि जीवनमूल्यांच्या जपणुकीसाठी निकराने झुंजणारा महाराष्ट्र. हा केवळ गुणांचा पुतळा नाही हे मान्यच केले पाहिजे. या युगात तरी त्याने आपला पीळ प्रसंगी सैल करावा ही अपेक्षाही रास्तच आहे. आमचा अभिमान अनेक वेळा अहंकार ठरतो आणि निर्भय-निःस्पृह बाण्याला क्वचित तुसडेपणाची झाक मारते, हा आरोपही आम्हाला कबूल आहे. आम्हाला काळाबरोबर नेहमीच पावले जुळवून घेता आली अशी ग्वाही देता येणार नाही. पण तरीही, भारताच्या जडावाच्या जवाहिरात महाराष्ट्र एक राजवर्खी रत्न आहे यात संशयच नाही. मराठी मातीने मराठी माणूस घडवला. मराठी माणसाने आपल्या प्रकृतीशी सुसंगत मराठी भाषा जोपासली. मराठी कर्तृत्वाला तर अजानवृक्षाचे दीर्घायुष्य आहे. भारताचे सर्वच प्रदेश विविध सौंदर्याने सजलेले आहेत. त्या सर्वांच्या सौंदर्याला आधार देण्याएवढे महाराष्ट्राचे सामर्थ्य उदंड आणि उदार असावे एवढेच आम्हा मऱ्हाठियांना मागायचे आहे.

*पुढील पानावर : वेरुळच्या लेण्यातील ध्वजस्तंभ*

# महाराष्ट्राची वास्तुकला

अरुण ओगले

**सांस्कृतिक परंपरा आणि वाटचाल**

"मनुष्य वास्तुकला घडवितो व वास्तुकला माणसाला घडविते" या परस्परविरोधी विधानातच मनुष्यजीवनाचे व वास्तुकलेचे सूत्र सापडते. अनेक धर्मसत्ता, राजसत्ता येतात. धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक आचार, विचार, व्यवहार स्पष्ट होतात. त्यांतूनच मानवाचे जीवन उकलत जाते. वास्तु-अवकाशात, अवकाशाभोवती ते विकसित होतात. त्यातूनच खऱ्या अर्थाने मनुष्याच्या संस्कृतीचे, परंपरेचे विश्व निर्माण होते. म्हणजेच या वास्तु माणसाला घडवितात. धर्मसत्ता, राजसत्ता येतात व जातात, परंतु वास्तुकलेच्या अवशेषांवरून पूर्वी घडलेल्या मनुष्यजीवनाचा परिचय होतो.

मानवाची भौतिक व मनोमय सृष्टी म्हणजे संस्कृती, आध्यात्मिक व आधिभौतिक शक्तींना सामाजिक जीवन उपयुक्त वनविण्याची कला म्हणजे संस्कृती—अशा संस्कृतीच्या अनेक व्याख्या केल्या जातात. वास्तुकला परंपरा, इतिहास यांच्या दृष्टीने पहिली व्याख्या यथायोग्य वाटते. कारण भौतिक प्रगतीमध्ये उद्योगधंदे, यंत्रे, वाहतूक व्यवस्था आदी अनेक गोष्टींचा अंतर्भाव होतो तर मनोमय सृष्टीत धर्म, तत्त्वज्ञान, राजनीती, समाजशास्त्र, साहित्य, कला व विज्ञान यांचा समावेश होतो.

महाराष्ट्र संस्कृतीच्या प्रारंभकाळीच विख्यात सातवाहन राजघराण्यासारखे राज्यकर्ते मिळाले हे भाग्यच म्हणावे लागेल. या काळात सांस्कृतिक जीवनाला सुरूवातीसच मोठी प्रतिष्ठा मिळाली. पुढे वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट व यादव या घराण्यांनी दीड हजार वर्षे ही परंपरा टिकविली. त्यानंतरच्या चारशे वर्षांच्या काळात मुसलमान सुलतानी सत्तेच्या परचक्रात महाराष्ट्र होता. शिवछत्रपतींनी हिंदवी राज्याची स्थापना करून महाराष्ट्राचे स्वातंत्र्य परत मिळविले. पुढे पेशवाईच्या सुस्थितीची सुमारे शंभर वर्षे झाली आणि इंग्रज सत्तेने साऱ्या भारतावर आपले साम्राज्य पसरविले. एका शतकाच्या अपूर्व चळवळीनंतर भारताला स्वातंत्र्य मिळाले व १९६० साली महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली.

आज महाराष्ट्राच्या वास्तुकलेचा आढावा घ्यावयाचा असेल तर तिच्या या गतकालीन परंपरांचा मागोवा घेणे आवश्यक आहे.

**बौद्ध काल**

बौद्ध धर्म इ. स. पूर्वी सहाव्या शतकात ईशान्य भारतातील बिहार प्रांतात प्रस्थापित झाला. भारतात बौद्धांची एकूण नऊशे लेणी आहेत. त्यातील आठशे लेणी महाराष्ट्रातील कोकण, देश, मराठवाडा अशा सर्व भागात आहेत हे विशेष. महाराष्ट्रातील सर्व राजघराणी बौद्ध धर्म न मानणारी असूनसुद्धा बौद्ध, जैन या वेदविरोधी, नास्तिक धर्म-पंथांकडे त्यांनी नेहमीच सहिष्णुतेने व उदार दृष्टीने पाहिले. त्यामुळे महाराष्ट्रातच काय पण सर्व भारत देशात भिन्नधर्मीय पंथांनी निर्माण केलेली वास्तुकला विकसित झाली व टिकू शकली. निवृत्तिवादी, नास्तिक, आत्म्याला न मानणाऱ्या ह्या पंथाला वेदांतील कर्मवाद, पुनर्जन्म हे सिद्धांत मान्य होते. सत्य, अहिंसा, अपरिग्रह या तत्त्वांचा अवलंब करून तप केले पाहिजे व अंती संसारत्यागावाचून निर्वाण वा मोक्ष प्राप्त होणार नाही, अशी या धर्माची शिकवण होती. काही राजांचा व धनिक व्यापाऱ्यांचा या धर्माला मोठा पाठिंबा मिळाला. राजा अशोकाच्या पाठबळामुळे या धर्माचा प्रसार करण्याच्या प्रेरणेतून बौद्ध वास्तुकला भारत देशातच नव्हे तर परदेशात पण आकारली.

*अजिंठा लेणी—चित्र व शिल्प कलांचा अपूर्व संगम*



कार्ला लेण्यातील खांबांवरील मिथुन युगुले



बौद्ध धर्मामध्ये सुरुवातीला हिनयान पंथ होता. या पंथाने ब्रह्म-जाल-सूत्र या बौद्धाच्या शिकवणीचा प्रसार करण्याचे व्रत आरंभिले. बौद्ध मूर्तीची पूजा त्यांना अमान्य होती परंतु धर्माची शिकवण अधिक परिणामकारक करण्यासाठी त्यांनी बुद्धाच्या मूर्त स्वरूपाचा आश्रय घेतला. महायान पंथाने इ. स. पूर्व तीनशेच्या सुमारास सातवाहन घराण्यापासून ते यादव घराण्यापर्यंतच्या कालखंडात बौद्ध वास्तुकला महाराष्ट्रात विकसित केली.

शिलालेख, स्तंभलेख या प्रचार माध्यमांची परिणती पुढे आराध्य प्रतीकात झाली. अस्थी, नखे अशा प्रतीकात्मक वस्तू मध्यभागी ठेऊन त्याभोवती माती, दगड, विटा रचल्या. गती हा चक्राचा गुणधर्म असल्याने व धर्मप्रचाराचा गतीशी संबंध असल्याकारणाने स्तुपाच्या गोलाकार वास्तू रचण्यात आल्या. उघडच्या भूमीवर वातावरणाशी कालांतराने तडजोड करण्याची क्षमता या भव्य वास्तूत राहणार नाही व धर्मप्रतीके नष्ट झाल्यास धर्म टिकणार नाही या विचाराने पुढे बौद्धकलेचा लेण्यांच्या स्वरूपात आविष्कार झाला व त्यांनी डोंगरांचा आश्रय घेतला.

विहार, चैत्य असे लेण्यांचे घटक असत. बौद्ध भिक्षूंची राहण्याची व अध्ययनाची जागा म्हणून मध्य चौकाभोवती तीन बाजूंना छोटेखानी विहारांच्या खोल्या खोदण्यात आल्या. मध्यभागी प्रार्थना मंडपाचे दोन्ही बाजूला चौकोनी, काटकोनी, अष्टकोनी आकाराचे खांब व मध्यभागी आराध्य प्रतीकावर रचलेला स्तूप व त्याभोवती प्रदक्षिणापथ अशी चैत्याची योजना होती. महाराष्ट्रात भाजा, कोंडाणे, पितळखोरे, अजिंठा-वेरूळ, बेडसा, नाशिक, जुन्नर व कार्ला येथे अशी लेणी व्यापारी मार्गांवर खोदली गेली.

**लेण्यातील कलाविष्कार**

कार्ला लेणी ही बौद्ध-कलेची पूर्ण विकसित लेणी समजली जातात. या लेण्याच्या प्रवेशद्वाराजवळ सोळा कोनी, पन्नास फूट उंचीचे दोन सिंहस्तंभ स्वतंत्र पाषाणखंडातून कोरलेले असून त्यावर अशोक चक्र व चार सिंहांच्या प्रतिकृती आहेत. प्रवेशाच्या दर्शनी भागावर सूर्यझरोक्याची योजना केली आहे. तीन दरवाजातून पुढे चैत्य मंडपात प्रवेश मिळतो. मंडपाच्या दोन्ही बाजूंना जवळजवळ उभे खांब असून, शेवटी स्तूप व त्याचे भोवती प्रदक्षिणापथ आहे. सूर्य झरोक्यातून चकाकित परंतु मंद प्रकाश या चैत्याच्या अवकाशात पडला की प्रकाश व सावल्यांचा नाट्यमय खेळ सुरू होतो व चैत्य मंडपाला सजीवता प्राप्त होते. या लेण्यांच्या वास्तुघटकांची प्रमाणबद्धता व भव्यता अतिशय परिणामकारक आहे.

**अजिंठा**

अजिंठा येथील लेण्यांमध्ये चित्र व शिल्पाचा अपूर्व संगम आहे. सातवाहनांच्या काळात क्रमांक दहाच्या लेण्यातील कलाविष्कार म्हणजे संवेदनशील मानवी मनातील भावनांचा उत्कट रंगपटच आहे. बोधिवृक्षाला वंदन करावयास निघालेला राजा व त्याचा लवाजमा असा या चित्राचा विषय असून त्यातील एक नृत्यांगना सर्पिणीच्या चपळतेने आपल्या अंगाला प्रत्यक्ष गिरकी देत आहे असा भास होतो. एका सुंदरीचा पती भिक्षु झाल्याने तिची शोकाकुल मन:स्थिती असा आणखी एका चित्राचा विषय आहे. शोक, कारुण्य, कथाकथनाची अपूर्व पद्धती, भावविश्व व्यक्त करण्यास वापरलेली रंगसंगती अशा ह्या शिल्प चित्रकलेच्या अभिजात आविष्काराला जगात तोड नाही. ह्या लेण्यांचे दर्शन प्रेरणादायी ठरते यात संशय नाही.

बौद्ध लेण्यातील हा कलाविष्कार जागतिक कला इतिहासातील एक सोनेरी पर्व आहे. पाषाणाला सजीवता प्राप्त करून देण्याचे संवेदनशील, सर्जनशील कसब या कलेत आहे. बंदिस्त अवकाशे, त्यांची आश्चर्यकारक रचना पद्धती, सूर्य झरोक्यातून येणाऱ्या प्रकाशाचा विशेष दर्जा, वास्तुघटकांची साधलेली प्रमाणबद्धता व त्यातून निर्माण झालेली परिणामकारी भव्यता ह्या वास्तुकलेच्या विविध अंगांची दालने उघडली गेली.

**धर्म ही बैठक**

जगाच्या प्राचीन इतिहासावरून एक गोष्ट स्पष्ट होते की,



ठाणे जिल्ह्यातील अंबरनाथ येथील शिवमंदिर. यादव काळातील हे सर्वोत्कृष्ट मंदिर होय



सर्व देशात धर्म हा लोकांच्या संस्कृतीचा मूलाधार होता. तत्त्वज्ञान, कला, काव्य यांचा प्रारंभ धर्मप्रेरणेतूनच झाला. या धर्माचे उदात्त स्वरूप लोकांच्या मनावर ठसविण्याच्या व आचारधर्म साध्य करण्याच्या गरजेतूनच प्राचीन मंदिर वास्तुकलेची संकल्पना आली. अमूर्त परमेश्वराचे ध्यान करता येत नाही म्हणूनच धर्माला मूर्तीचा आश्रय घ्यावा लागला. त्यातूनच पुढे धर्म आचरणाचे मार्ग आले. धर्म, धर्म आचरण व त्यांचा प्रचार ही प्राचीन मंदिर वास्तुकलेची बैठक आहे. हिंदु धर्मात परमेश्वर हा चराचर सृष्टीत सर्वव्यापी आहे अशी श्रद्धा आहे. त्यामुळे देवाची प्रतिमा एखाद्या स्थिर आकारात बद्ध करण्याच्या आवश्यकतेतून प्राथमिक व स्थिर चौकोनी आकाराची मंदिर रचनेसाठी निवड करण्यात आली. त्यातूनच पुढे वास्तु पुरुष मंडळाच्या विचारधारणेचा उगम झाला. मंदिराच्या वास्तुघटकांचे गर्भगृह किंवा गाभारा, त्यावर त्रिकोणी मनोऱ्याच्या आकाराचे शिखर, त्यावरील अमलेकेवरील कलश असे प्रकार आहेत. शिखराची कल्पना मेरु पर्वतावरून आली किंवा रथाच्या त्रिकोणी छतावरून आली असे अनेक प्रवाद आहेत. सृष्टीशी संधान बांधण्याच्या दृष्टीने आकाशात उंच जाणाऱ्या शिखराची योजना होती असेही मानण्यात येते.

ऋग्वेदामध्ये व गीतेमध्ये परमेश्वर व मनुष्य यांच्या नात्याचे वर्णन खालीलप्रमाणे केले आहे :

इंद्रस्य सख्यम् अमृतत्त्वमश्याम्
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः ।

असे हे परमेश्वर व मनुष्य यांच्या संबंधाचे वर्णन आहे. हे संबंध मित्रत्वाचे मानले आहेत. म्हणूनच गाभाऱ्यात उपासक व उपासित एकाच पातळीवर असतात. हे व्यक्तिगत संबंध प्रस्थापित करण्यासाठी ही गाभाऱ्याची जागा ह्या दोघांपुरतीच लहान ठेवण्याची प्रथा आहे. फक्त स्वत:साठी स्वत:नेच उपासना करणे हा हिंदु धर्माचा मुख्य आचार. एकाग्र मनाने उपासनेच्या माध्यमातून उपासिताशी जवळचे संबंध साधता यावे यासाठी गाभाऱ्यात अंधार असतो. अक्षय परमेश्वराची कल्पना दृढ असल्यामुळे मंदिरातील मूर्ती, चौदा वर्षे वयाच्या पुरुषांच्या दाढीमिशी विरहित असतात. उत्पत्तीशी सबंधित ब्रह्म हा त्याला अपवाद. साधूंचे रक्षण व दुष्टांचा नि:पात परमेश्वराच्या कल्पनेतील महत्त्वाचे अंग असल्यामुळे मूर्तीचा एक हात वरदहस्त व एका हातात शस्त्र दाखविण्याची प्रथा आहे. मंदिरातील देवांच्या मूर्ती काही अपवाद वगळता सपत्निक दाखविलेल्या असतात. दोन विशेषक एकत्र येण्याने उत्पत्ती होते यानुसार ब्रह्म माया, शिव शक्ती, पुरुष प्रकृती असे जगाच्या उत्पत्तीचे सूत्र मानले आहे. मंदिरामध्ये कोरलेली मिथुने किंवा मंदिर घटकांची विशिष्ट रचना करण्यात याच सूत्राची प्रचीती देण्याचा उद्देश असावा.

प्राचीन मंदिरांच्या संकल्पनेची बैठक धर्म ही असली तरी सामाजिक जीवनाचा या मंदिरांशी घनिष्ठ संबंध आला. सभामंडपात नृत्य, गायन हे परमेश्वराच्या उपासनेचे साधन मानल्यामुळे निषिद्ध नव्हते व यामुळे या कलांचा विकास होण्यास मदत झाली. याच सभामंडपात गावांच्या प्रश्नांची चर्चा होत असे. भजने-कीर्तने यासाठी लोक एकत्रित येत. तेव्हा देवळे ही धार्मिक, सामाजिक, कलासंस्कृती यांच्या हालचालींची केंद्रे बनली हे महत्त्वाचे आहे.

ठाणे जिल्ह्यातील अंबरनाथजवळ तळयाकाठचे शिवालय हे यादव काळातील एक उत्कृष्ट मंदिर समजले जाते. दोन चौकोनाच्या विशिष्ट मांडणीतून या मंदिराचा आकार आकर्षकरीत्या आकारलेला आहे. शिखराची रचना त्रिकोणी मनोऱ्यासारखी असून त्याच्या दोन मजली उंचीभोवती छोटेखानी वास्तु घटकांची योजना आहे. या मंदिराचे वैशिष्ठ्य म्हणजे त्याच्या खांबावर, तक्तपोशीवर मती गुंग करणारी कलाकुसर होय.

नाशिकजवळ सिन्नर येथील गोंदेश्वराचे मंदिर उंच पातळीच्या चौथऱ्यावर डौलदारपणे उभे आहे. मुख्य मंदिराभोवती चार लहान मंदिरे असून प्रवेशद्वाराजवळ नंदी मंडप आहे. या मंदिराच्या वास्तूची उंची व एकूण आकाराची व्याप्ती यांच्यात साधलेली प्रमाणबद्धता वैशिष्ठ्यपूर्ण आहे.

खानदेशातील महेश्वराचे मंदिर व अहमदनगर जिल्ह्यातील पेटगाव येथील लक्ष्मीनारायणाचे मंदिर उल्लेखनीय आहेत.



महेशमूर्ती. घारापुरी (एलिफंटा) लेणी. आधीच भव्य असलेले हे [illegible]
बांधून त्यांनी केलेल्या नैसर्गिक प्रकाश योजनेमुळे अधिक भव्य वाटते



हिंदू मंदिर वास्तुकलेचे सर्व संकेत झुगारून देऊन जगातील एक आश्चर्यकारक कलात्मक आविष्काराचा निर्माण झालेला ठेवा म्हणजे वेरूळ येथील पर्वतातून खोदून काढलेले शिवमंदिर. अथेन्स येथील पार्थनॉनच्या भव्य वास्तुविस्ताराएवढा विस्तार असलेले व त्याच्या सुमारे दीडपट उंचीचे हे खोदकाम केवळ अद्वितीय व अलौकिक असेच आहे. एक अखंड मोठा पाषाण मुख्य पर्वतापासून खोदून अलग केला गेला व अक्षरश: आधी कळस मग पाया या पद्धतीने या मंदिराची घडण झाली. शिवपार्वती विवाह, त्यांची सारीपाट क्रीडा अशी अनेक दृश्ये त्यात कोरली आहेत.

मुंबईजवळ एका छोटया बेटावर घारापुरी गाव आहे. येथील डोंगरात पाच लेणी खोदलेली आहेत. मुख्य लेणे दोन छेदीत जाणाऱ्या रेषांच्या आरेखनावर आकारलेले असून त्यात अकरा हात उंचीची ब्रह्मा, विष्णु, महेशाची भव्य मूर्ती आहे. बाजूच्या मोकळया जागेतून मुख्य मंदिरात अप्रत्यक्ष मंद असा येणारा प्रकाश हे याचे वैशिष्ठच आहे.

सातवाहन ते यादव या काळातील शेवटच्या म्हणजे यादवांच्या काळात हेमाडपंत पद्धतीच्या देवळांची रचना उदयास आली. रामदेवराव यादवाचा प्रधान हेमाडपंत याने ही पद्धत रचली. दगडावर दगड ठेऊन ही रचना चुनामाती न वापरता केली जात असे. या मंदिराच्या पायाची आखणी कोनबद्ध असे. यावरील भिंतींच्या कोनरेषा जमिनीपासून थेट कळसापर्यन्त पोचत. सातगाव येथील विष्णु मंदिर, लोणार येथील दैत्य संदना अशी काही मंदिरे या हेमाडपंत पद्धतीची साक्ष देतात.

**शिवाजीराजांची दृष्टी**

अल्लाउद्दिन खिलजीने देवगिरीवर स्वारी करून १२९६ साली यादवांचा पराभव केला. येथून पुढे चारशे वर्षे मुसलमानी सत्ता महाराष्ट्रात अस्तित्वात होती. या काळातील धगधगती अशांतता, घबराटीचे, अस्थिर सामाजिक जीवन हे वास्तुकला आविष्काराला पोषक नव्हते. परंतु दलपती, कमलाकर नीळकंठ भट्ट, अनंतदेव असे धर्मशास्त्रज्ञ तसेच ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास हे प्रसिद्ध संत या काळात होऊन गेले. या महापुरुषांनी आपल्या वाणीने, लेखणीने व कर्तृत्वाने प्राचीन वैदिक धर्माचे, गीता धर्माचे पुनरुज्जीवन केले व भक्तीमार्ग, वारकरी पंथ, राष्ट्रधर्म यांची दीक्षा समाजाला देऊन समाज जागृत, संघटित व स्थिर करण्याचा प्रयत्न केला. या पार्श्वभूमीवर शिवाजी महाराजांनी इ.स. १६४५-४६ साली तोरणा किल्ला घेऊन मराठी साम्राज्याचा पाया घातला.

द्रष्टेपणा, उत्कृष्ट नेतृत्वगुण व बावनकशी राजनीति या गुणांच्या जोरावर पुढे त्यांनी हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. राज्य स्थापनेबरोबरच राज्याचे संरक्षण व वाढ याबाबत महाराजांचा दृष्टिकोन वस्तुनिष्ठ होता. मोगलांएवढे मनुष्यबळ नाही, सैन्य उभारणीस पैसा नाही अशा परिस्थितीत गनीमीयुद्धासाठी सह्याद्रीच्या दऱ्या-खोऱ्यांचा त्यांनी कल्पकतेने उपयोग करून घेतला. यातूनच कोट-किल्ले या वास्तू विकासाला चालना मिळाली.

युद्धप्रणालीत आक्रमण व रक्षण किंवा बचाव ही सूत्रे महत्त्वाची प्राप्त परिस्थितीत रक्षण-बचाव या प्रणालीच्या अनुरोधाने उभ्या चढाचे डोंगर, अरुंद दऱ्याखोरी यांचे रक्षण व टेहळणी या उद्दिष्टातून महाराजांनी अनेक किल्ल्यांचा विकास केला व नवीन अधिक सोयींचे किल्ले बांधले. भुईकोट, गिरिदुर्ग व जलदुर्ग असे किल्ल्यांचे प्रकार असून ते महत्त्वाची, मोक्याची गावे, उंच पर्वताच्या कोपऱ्याच्या जागा या ठिकाणी विशेषत: व्यापारी मार्गावर बांधले गेले. आरमार निर्माण करून जलदुर्ग बांधणारा शिवाजी हा पहिला राजा होता. किल्ल्यावर प्रमुख बालेकिल्ला, राजवाडा, प्रधानांचे वाडे, देऊळ, तलाव, घोडयाच्या पागा, अंबरखाना, सदर, दारू कोठार यांची योजना असे. विस्ताराभोवती उंच तट बुरुज, प्रमुख प्रवेशद्वाराव्यतिरिक्त इतर द्वारे, चोरवाटा यांचीही व्यवस्था असे. गडाभोवती कलागऱ्याची गर्द झाडी लावून वाट बिकट करण्याचा प्रयत्न असे. भुईकोटाभोवती पाण्याचे खंदक असत. राजांच्या आज्ञापत्रात



मेणवली येथील पेशवेकालीन वैशिष्ट्यपूर्ण घाट व मंदिर





कोटकिल्ल्यांचे महत्त्व, त्यांची रचना व बांधणी, करावयाची राखण व प्रशासन, ठेवण्यात येणारी युद्धसामुग्री व भांडारे व गडावरील कारखाना याबाबत सविस्तर माहिती व आज्ञा फर्माविलेल्या आढळतात. यावरून प्रयत्नपूर्वक, योजनाबद्धपणे किल्ले बांधले गेले व त्यांचा विकास केला गेला याची प्रचीती येते.

राजगड, पुरंदर, सिंहगड, शिवनेरी, लोहगड, रायगड, प्रतापगड, पन्हाळगड हे गिरिदुर्ग तसेच मुरूड जंजिरा, सिंधुदुर्ग, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग हे जलदुर्ग व चाकण, वसई, डहाणू, शिरगाव हे भुईकोट विशेष प्रसिद्ध आहेत.

अठराव्या शतकाच्या प्रारंभास पेशवाई उदयास आली ती १८१८ साली इंग्रजी सत्ता येईपर्यन्त अस्तित्वात होती. मराठा राजवटीत राजकीय वातावरणावर युद्ध परिस्थितीचा पगडा विशेषकरून असल्यामुळे सांस्कृतिक अंगांच्या विकासाला तेवढासा वाव मिळाला नाही. परंतु पेशवाई काल हा सांस्कृतिक घडामोडींना अधिक पोषक असल्यामुळे श्रीमंत कुटुंबांनी त्यांना आश्रय व वाव दिला. परिणामी वाडा या वास्तु प्रकाराचा विकास झाला, तसेच खुंटलेल्या मंदिर-वास्तु विकासाचे पुनरुज्जीवन झाले.

**वाडे**

एक वा अनेक मोकळ्या चौकांभोवती निवासी वाड्याच्या वास्तू उभारण्याची पद्धत अस्तित्वात आली. बाहेरील अरुंद बोळाला लागूनच या वाड्यांची तटबंदी असे. प्रवेशद्वाराजवळ देवडी व वर नगारखाना असे. पहिल्या चौकाभोवती कार्यालय, पाहुण्यांच्या खोल्या अशा सार्वजनिक सोयींची व्यवस्था तर आतल्या चौकाभोवती कुटुंबासाठी स्वयंपाक घर, भांडार, जेवण्याची जागा, देवघर, दिवाणखाना, शयनगृह, आंघोळीच्या जागा अशा खाजगी व्यवहारांची सोय असे. खाजगी व सार्वजनिक जिन्यांनी वरच्या मजल्यावरील खोल्यांकडे जाता येई. खजिन्यासाठी तळघराची योजना पण असे. हे वाडे दगड किंवा विटांच्या बांधकामाचे असत व लाकडी खांब-तुळया यांनी

*पेशवाईमध्ये वाडा हा वास्तुप्रकार जन्माला आला*



शनिवारवाडा हे पेशवाईचे मुख्य राजकीय केंद्र तर होतेच परन्तु त्याची वास्तुरचनाही वैशिष्ट्यपूर्ण होती



रचनाबद्ध केलेले असत. भिंतीवरील कोनाडे, खाब, तुळया, छतावरील कलाकुसर व नक्षीकाम, रंगविलेली चित्रे ही या वाड्याची ठळक वैशिष्ट्ये. श्रीमंती वाड्यात झुंबरे, हंडी, आरसेमहाल यांनी शोभा वाढवली जाई. या वाडावास्तूचे मुख्य अंग म्हणजे मोकळे चौक होय. संरक्षण सोयीसाठी बाहेरील बोळ अरुंद असल्यामुळे हवा खेळविण्याच्या दृष्टीने या चौकाची व्यवस्था विशेष महत्त्वाची आहे. शीत कटिबंधात बाहेरून येणाऱ्याला धगधगणारी शेगडी दिलासा देते तर उष्ण कटिबंधात मोकळ्या थंड वातावरणाची व पिण्याच्या पाण्याची आवश्यकता असते या पार्श्वभूमीवर ही चौकाची योजना वैशिष्ट्यपूर्ण अशीच आहे. सर्वसाधारण पाहुणे, विशेष पाहुणे, घरातील स्त्रिया अशा अनेक गोष्टींसाठी वेगवेगळ्या चौकांची व्यवस्था असे. उतरत्या छपरांच्या या वाड्यातील चौक, बागा, कारंजी, कमानींचा विशिष्ट घाट, चित्रकलेचा वापर यावरून या वास्तूवर पर्शियन व मोगल वास्तुकलेचा परिणाम झालेला दिसतो. या काळातील पेशव्यांचा शनवारवाडा, रास्तेवाडा, फडकेवाडा, फडणीसवाडा, बावडेकरवाडा हे वाडे पुण्यात आजही पहावयास मिळतात. असे वाडे वाई, पैठण, सातारा येथेसुद्धा आहेत. वाडावास्तुपद्धती ही एक वेगळी व वैशिष्ट्यपूर्ण पद्धत म्हणून ओळखली जाते.

शिवाजीच्या काळापासून ते पेशवाईपर्यंतच्या काळात मंदिर वास्तुकलेचे पुनरुज्जीवन झालेले आढळते. कृष्णा नदीच्या तीरावर माहुली येथील शिवमंदिराचा विशेष उल्लेख केला पाहिजे. शंकू आकाराचा कळस, शिखराभोवती छोट्या वास्तुघटकांचे आडवे पट्टे, वैशिष्ट्यपूर्ण दीपमाळ, मुस्लीम घाटाच्या कमानी व उंच चौथऱ्याच्या पातळीवरून खाली पाण्याकडे धावणाऱ्या घाटाच्या पायऱ्या असे हे वातावरण आहे.

प्रवरा-गोदावरीच्या संगमाजवळ टोके येथील शिवमंदिर असेच प्रसिद्ध आहे. घाटाच्या पायऱ्यांच्या आडव्या पट्ट्यात चौकोनी दगडाच्या योजनेमुळे सकाळ ते संध्याकाळ प्रकाश-सावल्यांच्या साचेबद्ध नयनरम्य आकृत्यांनी येथल्या वातावरणाला वेगळाच उठाव येतो.

पुणे येथील तुळशी बागेतील मंदिराचा सर्वांत उंच शंकूसारखा कळस हा डौलदार आहे. सासवड येथील वटेश्वर मंदिर, कोल्हापूरजवळील ज्योतिबाचे मंदिर, तासगावचे गणेश मंदिर ही विशेष महत्त्वाची असून पर्वती व जेजुरी येथील मंदिरे टेकडीवर बांधली आहेत. पुणे येथील शनवारवाड्याजवळच्या ओंकारेश्वराच्या मंदिरावर मशिदीच्या घाटणीचा परिणाम झालेला आढळतो हे विशेष.

सातवाहन ते पेशवा या कालखंडातील मंदिरवास्तुकलेवर एक दृष्टिक्षेप टाकल्यावर लक्षात येते की मंदिराच्या वास्तु नदी, तलाव, टेकड्या किंवा महत्त्वाच्या वस्त्यांच्या ठिकाणी मोक्याच्या जागेवर बांधल्या गेल्या. वास्तुघटकांची जुळवाजुळव, त्यांचे एकमेकांचे सयुक्तिक नाते या सर्वांत एक सूत्रबद्धता आढळते व यातूनच ठराविक पद्धती निर्माण झाल्याचे लक्षात येते. आकारबद्ध अवकाशात प्रकाश छायेमुळे निर्माण झालेली सजीवता लक्षणीय आहे. वास्तूची भव्यता व डौलदारपणा विशेष परिणामकारी आहे.

निरनिराळ्या पातळीवर चौथऱ्यांनी तयार झालेले घाट, लांब पट्ट्यातील नदीच्या पात्राकडे उतरणाऱ्या पायऱ्या व पाण्याचा केलेला उपयोग यामुळे या सर्व वातावरणाच्या सौंदर्यात उठाव आणला जातो. धर्म, त्याचे आचरण व प्रसार या दृष्टिकोनातून एक विशिष्ट वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न केल्याचे आढळते. नाशिक, टोके, वाई, माहुली येथे मंदिर व घाट यांचे वातावरण अतिशय परिणामकारी आहे.

नागपूर विभागातील मंदिरावर पूर्व भारतातील ओरिसा व भूमीजा पद्धतीचा परिणाम झाल्याचे आढळते. शुक्रवारी तलावाजवळील शिवालय, केळीबाग मार्गावरील शिवमंदिर, महाल विभागातील रुक्मिणी मंदिर, हिवंग घाटावरील मल्हारमार्तंड मंदिराचा समूह यांचा नामनिर्देश करणे आवश्यक आहे.

**गेले शतक**

एकोणिसाव्या शतकात पेशवाई संपुष्टात येऊन इंग्रजांनी महाराष्ट्रात बस्तान बसविले. व्यापारी उद्दिष्टे दृढ



करण्यासाठी महाराष्ट्रातील मुंबई, रत्नागिरी येथील बंदरे त्यांना सोयीची होती. व्यापारी उद्दिष्टे सुलभ व्हावी यासाठी त्यांनी रेल्वे आदी दळणवळणाच्या सोयी, कारभारविषयक व कार्यालयीन सोयी प्रामुख्याने केल्या. कापड उद्योगाचा यांत्रिक विकास याच काळात मुंबई, नागपूर, सोलापूर या भागात झाला. या उद्योगाच्या अनुषंगाने मुंबईत गिरणगावाची वसाहत झाली. एकूण प्रशासन व व्यापाराची भरभराट यांच्या परिणामी संरक्षण व्यवस्था करणे प्राप्त होते. मुंबई, पुणे, देवळाली येथे लष्करी छावण्या प्रस्थापित झाल्या. यावेळी धर्मप्रचारार्थ मिशनऱ्यांचे कार्य सुरू झाले. या सर्व गोष्टींच्या परिणामी मुंबईमध्ये व्हिक्टोरियन पद्धतीच्या वास्तू उभारल्या गेल्या. ब्रिटिश साम्राज्याचे वैभव, दबदबा, दरारा व शिस्त या गोष्टींचा परिणाम स्थानिक लोकांवर होण्याच्या दृष्टीने या भव्य वास्तुपद्धतीचा उपयोग झाला. व्ही.टी. रेल्वे स्थानक, महापालिका इमारत, गेटवे ऑफ इंडिया हे स्मारक, चर्चच्या वास्तू, रुग्णालयाच्या वास्तू अशा अनेक वास्तू मुंबईमध्ये बांधल्या गेल्या. बॅलार्ड पियर येथील बंदरानजिक भव्य कोठारे व कार्यालयाच्या वास्तूंचा समूह, भव्य इमारती, रुंद रस्ते व कमालीच्या टापटिपीच्या वातावरणाचा भाग विशेष परिणामकारी आहे हे आजही दृष्टोत्पत्तीस येते.

या वास्तू उभारणीच्या काळात स्वदेशातून वास्तुतज्ज्ञ आणणे हे खर्चाचे होते. यासाठी मुंबईमधील सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्स या कला शिक्षण संस्थेत वास्तुकलाविषयक शिक्षणाची सोय इंग्रजांनी केली. सबंध आशिया खंडात त्या वेळची ही पहिलीच वास्तुकला शिक्षणाची सोय होती. या शिक्षण संस्थेमुळे वास्तुकला व्यवसाय प्रस्थापित होण्यास पुढे मदत झाली. ब्रिटिश वास्तुतज्ज्ञ जॉर्ज विटेट यांनी मुंबईत प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम, कावसजी जहांगीर हॉल, गेटवे ऑफ इंडियाचे स्मारक अशा व्हिक्टोरियन पद्धतीचा वास्तुकलाविष्कार केला. वास्तुतज्ज्ञ व प्राध्यापक क्लॉड बॅटली यांना भारतातील प्राचीन वास्तुकलेविषयी जबरदस्त आकर्षण होते. भारतीय विद्यार्थ्यांना हाताशी धरून त्यांनी महत्त्वाच्या वास्तू अवशेषांची भारतभर पाहणी व अभ्यास केला आणि त्यांच्या प्रत्यक्ष मोजमापांच्या आधारे पद्धतशीर आरेखनांचा संग्रह केला. वास्तुकलेचा इतिहास शिकण्याच्या दृष्टीने त्यांची ही कामगिरी महत्त्वाची व बहुमोल ठरली. याच काळात मुंबईत कालानुरूप वास्तुतज्ज्ञ व्यवसाय स्थिर झाला. इंडियन इन्स्टिटच्यूट ऑफ आर्किटेक्ट्स या अखिल भारतीय वास्तुतज्ज्ञ व्यावसायिक संघटनेची मुंबईत १९२८ साली स्थापना झाली. ब्रिटिश वास्तुतज्ज्ञांबरोबरच परळकर-डालास, पाटकर-दिवेचा, परळकर-पारपिया, बाबूराव म्हात्रे अशा अनेक वास्तुतज्ज्ञांनी आपल्या कार्याने या व्यवसायाला मुंबईत महत्त्वाचे स्थान प्राप्त करून दिले. वास्तुसंकल्पना या व्यवसायाच्या प्रमुख अंगाबरोबरच, बांधकाम प्रक्रियेतील व्यावहारिक व कायदेशीर बाजू, वास्तूंच्या खर्चाचे अंदाज अशा अनेक गोष्टींना योग्य स्वरूप दिले. या सर्व कालखंडाची स्वाभाविक परिणती म्हणजे पश्चिमेकडील विज्ञान, तंत्रविज्ञान, समर्थ संघटन व कर्तबगार प्रशासन या गोष्टींची आपल्या समाजाला ओळख झाली. तसेच वास्तुकला व्यवसायाला कालानुरूप दर्जा प्राप्त झाला.

**मुंबई हा केंद्रबिंदू**

भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लोकशाही राजकीय प्रणाली अस्तित्वात आली. भारतासारख्या अवाढव्य देशातील भिन्न भाषिक लोक, भिन्न संस्कृती व प्रादेशिक विशेषत: या सर्वांचा औद्योगिक, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक सूत्रबद्ध असा विकास साधण्याच्या दृष्टीने धोरणे आखली गेली. हा विकास साधताना विशिष्ट परिणामकारी वातावरण निर्मिती करून सामाजिक एकात्मता साधण्याचे महत्त्वाचे उद्दिष्ट साध्य करावयाचे होते. या दूरदृष्टिकोनातून पंडित नेहरूंनी युगप्रवर्तक फ्रेंच वास्तुतज्ज्ञ ली कार्बुझिए यांस भारतात बोलाविले व चंदिगड येथील वास्तुकला आविष्काराची संधी प्राप्त करून दिली आणि आधुनिक वास्तुकलेचे पर्व भारतात सुरू झाले. परिणामी चंदिगड, दिल्ली, अहमदाबाद ही शहरे आधुनिक वास्तुकला चळवळीची केंद्रे बनली. एक विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे या वास्तुकलेला सरकारी, खाजगी संस्था

*मुंबई विद्यापीठाच्या इमारतीचे आकर्षक अंतरंग*



ठाणे-बेलापूर औद्योगिक पट्ट्यातील सिमेन्स प्रकल्पाची वास्तू. वास्तुतज्ज्ञ भोंसले, खबाटा, एडेरी



किंवा व्यक्तिगत आश्रय व पाठबळ मिळाले म्हणून ही गोष्ट शक्य झाली. ह्या चळवळीची तीव्रता मुंबई व महाराष्ट्रातील इतर भागात पोहचेपर्यंत कमी झाली असली तरी आधुनिक वास्तुकलेची सूत्र-तंत्रे यांची वेगळी जाणीव वास्तुतज्ज्ञात निर्माण होण्यास तिचा महत्त्वाचा उपयोग झाला.

परदेशातून वास्तुकलाविषयक शिक्षण घेऊन आलेल्या काही तरुण भारतीय वास्तुतज्ज्ञांनी महाराष्ट्रात आधुनिक वास्तुकलेची बीजे रोवण्यास सुरुवात केली. या सुरुवातीच्या काळात प्रकर्षाने नावारूपाला आलेले वास्तुतज्ज्ञ दुर्गाशंकर बाजपेयी यांनी जहांगीर आर्ट गॅलरी, टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सचा वास्तु-समूह, अमेरिकन तेल-कंपनीसाठी कार्यालयीन इमारत व कर्मचाऱ्यांसाठी निवासी वास्तूंचा समूह व अणुकेंद्रासाठी स्विमिंग पूल रिॲक्टर अशा अनेक कालानुरूप वास्तूंची संकल्पना केली. हा सर्जनशील, नवी दृष्टी असलेला वास्तुतज्ज्ञ ऐन उमेदीत कालवश झाला हे वास्तुकला-व्यवसायाचे दुर्दैव होय. प्रविणा मेहता, वामनराव गोरे, पिलू मोदी या वास्तुतज्ज्ञांनी आपल्या विचारांनी व कार्याने आधुनिक वास्तुकलेचा पुरस्कार केला. या वास्तुतज्ज्ञांचे कार्य-विचार त्यावेळच्या अनेक वास्तुतज्ज्ञांना प्रेरणादायी ठरले. अर्थातच आधुनिक वास्तुकलाविषयक योग्य दृष्टिकोन तयार होण्यास व त्याचे परिणाम प्रकर्षाने वास्तुकलेत दिसू लागण्यात काही महत्त्वाचा अवधी निघून गेला.

मुंबई हा भारताच्या औद्योगिक, आर्थिक वाढीचा केंद्रबिंदू असल्यामुळे मुंबईची विलक्षण वेगाने असंबद्ध व विस्कळीत वाढ झाली. मुंबईत होऊ घातलेल्या औद्योगिक वसाहतींचे केंद्रीकरण, आर्थिक सुरक्षिततेसाठी महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील अविकसित भागातून होऊ घातलेले लोकांचे स्थलांतर, यामुळे निर्माण झालेला लोकसंख्येचा प्रश्न, झोपडपट्ट्या, गलिच्छ वस्त्यांचे प्रश्न अशा भयानक परिस्थितीची चाहूल त्यावेळी लागली. महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या काळात या भयानक परिस्थितीने प्रत्यक्षात मूळ धरले. त्याच्या परिणामी शहरांचे महाशहरांत व महाशहरांचे सलग लांब पट्ट्यात विस्तृतीकरण होण्याचा धोका निर्माण झाला. आज मुंबई-पुणे, मुंबई-नाशिक हे भाग त्याची जिवंत उदाहरणे आहेत. या शहरीकरणाच्या प्रक्रियेने समाजात अकार्यक्षम वृत्ती, गुन्हेगारी वृत्ती अशा सामाजिक मूल्यांना धक्का देणाऱ्या प्रवृत्ती वाढीस लागतात. मुंबई शहर हे पुढे या परिस्थितीला बळी पडले.

**नवी परिस्थिती**

महाराष्ट्र राज्य स्थापना १९६० साली झाली व महाराष्ट्राचा औद्योगिक, आर्थिक व सांस्कृतिक विकास साधण्याच्या दृष्टीने संतुलित धोरण आखण्याची व हे धोरण सातत्याने व नेटाने राबविण्याची संधी सरकारला नव्याने प्राप्त झाली.

महाराष्ट्र राज्याच्या नव्याने आखलेल्या प्रदेशाचा बराचसा पडिक व अविकसित भाग; पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, सातारा, कोल्हापूर यांसारखी नुकतीच वाढीला लागलेली शहरे व शहरीकरणाच्या विळख्यात सापडू पहाणारे मुंबई शहर अशा असमतोल औद्योगिक आर्थिक परिस्थितीचा पट महाराष्ट्र प्रशासनासमोर होता.

आधुनिक वास्तुकलेच्या निर्माण झालेल्या नव्या जाणिवेतून नगर नियोजनाबाबत सूज्ञ, सयुक्तिक व समतोल धोरण आखण्याच्या प्रक्रियेला यावेळी सुरुवात झाली. पडिक, अविकसित मोठा भाग, तेथील लोकांची आर्थिक असुरक्षितता, स्थलांतर वृत्ती या प्रश्नांची कोंडी फोडण्याच्या दृष्टिकोनातून समतोल औद्योगिक विकासाच्या धोरणाची परिणती झाली. सरकारने महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ ही मंडळे स्थापिली. मागासलेल्या भागांच्या व नुकत्याच वाढीस लागलेल्या भागांच्या संभाव्य प्रगतीची तपासणी करण्यासाठी व धोरण आखण्यासाठी महाराष्ट्र भूविकास महामंडळाची स्थापना करण्यात आली. विकसित शहरी वस्त्यांच्या नियंत्रणाची योग्य दिशा शोधण्याच्या दृष्टीने गलिच्छ वस्त्या सुधार मंडळ, शहर व औद्योगिक विकास महामंडळ व मुंबई महानगर प्रदेश विकास



पोर्तुगीज चर्च, मुंबई : धार्मिक वास्तुसंकल्पनेला नवी दिशा.
वास्तुतज्ज्ञ : चार्ल्स कोरिया



प्राधिकरण ही मंडळे कार्य करू लागली. औद्योगिक विकास व गृहनिर्माण यांची सांगड घालण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण स्थापले गेले.

औद्योगिक वसाहतीच्या वास्तू उभारणीच्या मागे सुलभ व गतिमान उत्पादनवाढीची, उत्पादन करणाऱ्याच्या सुदृढ जीवनाशी सांगड घालण्याची कल्पना अस्तित्वात आली. प्रदिस्त अवकाशाचे प्रशस्त कारखाने, आवश्यक खेळती हवा, प्रकाश यासाठी त्याची केलेली विशिष्ट रचना, यंत्रसामग्रीचे योग्य आयोजन, उत्पादन करणाऱ्यांच्या आरोग्याच्या दृष्टिकोनातून केलेल्या सोयी, वास्तूभोवतालच्या परिसरातील बागा असे उत्पादनवाढीस योग्य वातावरण तयार करण्याकडे वास्तुतज्ज्ञांचा कल होऊ लागला. औद्योगिक वसाहतीजवळच कामगारांना राहती घरे, त्यांच्यासाठी करमणूक, विश्रांतीच्या जागा अशा कल्पना वाढीस लागल्या. मुंबईमधील गोदरेज औद्योगिक वसाहत, लार्सन टूब्रो प्रकल्प, ठाणे-बेलापूर पट्ट्यातील सिमेन्स, सीबा, कॅडबरीज, जॉन्सन हे औद्योगिक समूह, नाशिक, औरंगाबाद, जळगाव, सातारा अशा अनेक ठिकाणी ह्या औद्योगिक वातावरणाचे लोण पोहोचले आहे. सहकारी तत्त्वाच्या चळवळीतून निघालेले साखर कारखाने व तत्सम उद्योगांना तसेच दुग्धउत्पादन व्यवसायाला या आधुनिक वास्तुकलेच्या सूत्रांनी एक नवीन दिशा दाखविली आहे.

मुंबईमधील लोकसंख्येचा दबाव कमी करण्याच्या उद्दिष्टातून नवीन मुंबईच्या योजनेचा जन्म झाला. मुंबई बंदरापलीकडे वाशी, बेलापूर, पनवेल व भोवतालच्या परिसरात नागरी वस्ती केंद्रांची योजना जगप्रसिद्ध वास्तुतज्ज्ञ चार्ल्स कोरिया यांनी मांडली. सरकारी कार्यालये, घाऊक व्यापार, मालाची कोठारे व तत्सम व्यवहारांचे या भागात आकर्षण निर्माण करून स्वतंत्र व स्वायत्त अशा वाढीची वसाहत वसवून तेथील मानवी जीवन अधिक सोयींनी सज्ज करण्याची ही योजना होती. नगर नियोजन शास्त्राच्या आधुनिक विचारसरणीतून या परिसराचा विकास होत असल्याचे आज दृष्टोत्पत्तीस येते. राहत्या घरांचे समूह, भोवतालच्या मोकळ्या जागा, खेळ-विश्रांती, करमणूक यांच्यासाठी परिसर, दुकानांची सोयीस्कर योजना या सर्वांना अनुरूप अशी रस्त्यांची परिसर-विकास योजना असे एक मनुष्य जीवन-व्यवहारांना पोषक वातावरण निर्माण करण्याचा हा प्रयत्न आहे.

गृहनिर्माण योजना या सर्व स्तरांतील लोकांसाठी निवाऱ्याची सोय करण्याच्या आवश्यकतेतून निर्माण होत आहेत. कमीतकमी जागेचा जास्तीत जास्त वापर, सूर्यप्रकाश, पाऊस यांच्या योग्य नियंत्रणाची तंत्रे, उघड्या गच्च्यांचा वापर अशा वास्तुविषयक अंगांचे विचार वास्तुसंकल्पनेत येऊ लागले आहेत. आकारबद्ध वास्तूंची सौंदर्याच्या दृष्टिकोनातून गुणग्राहकता वाढविण्याचे प्रयत्न होत आहेत.

मुंबईमधील इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी संस्थेचा समूह, नाथीबाई ठाकरसी विद्यापीठाचा वास्तुसमूह, मुंबई विद्यापीठ वास्तू परिसर, टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्चचे आवार, पुणे येथील नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ बँकिंग मॅनेजमेंट, राहुरी येथील कृषि विद्यापीठ अशा अनेक शिक्षण संस्थांच्या वास्तुसमूहांत पोषक वातावरण निर्माण झाले आहे.

मुंबईत पृथ्वी थिएटर प्रायोगिक रंगभूमीच्या चळवळीचे स्थान बनत आहे. नॅशनल सेंटर ऑफ परफॉर्मिंग आर्ट्‌सच्या वास्तूने अखिल भारतीय पातळीवर कलाविश्व मुंबईत आणले आहे. ठाणे येथील गडकरी रंगायतनने ठाण्यातील सांस्कृतिक वातावरणाचे पुनरुज्जीवन केले आहे.

मुंबई येथील नेहरू सेंटर व तारांगणाची वास्तू यांनी शास्त्र, खगोल शास्त्र यांविषयक ज्ञानाची कवाडे उघडली आहेत.

टाटा कॅन्सर हॉस्पिटल, जसलोक हॉस्पिटल, सरकारी रुग्णालये या वास्तूंनी आरोग्यविषयक संशोधन व चिकित्सेला प्रोत्साहन दिले आहे.

मुंबईतील नव्याने बांधलेल्या पोर्तुगीज चर्च या वास्तूने धार्मिक वास्तूच्या रचनेला नवीन दिशा दाखविली आहे.

कार्यालयांच्या इमारती सुखसोयींनी अधिक सज्ज करण्याचा विचार बळावत आहे. पुणे येथील महाराष्ट्र बँकेची इमारत, मुंबईतील तेल व नैसर्गिक वायू महामंडळाची इमारत,



विधानसभेची नवीन इमारत अशा अनेक वास्तू साकार झाल्या आहेत व होत आहेत.

वातावरण निर्माण करण्याचा हा प्रयत्न विशेषकरून मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद अशा काही ठराविक भागातच सातत्याने होत आहे. हे लोण अविकसित, मागासलेल्या भागात स्थलकालाचा विचार करून अधिक प्रमाणात पसरविण्याची आवश्यकता आहे. त्यासाठी लोकात याबाबतची जाणीव निर्माण होण्यासाठी वास्तुतज्ज्ञ व्यावसायिक संघटनेने विशेष प्रयत्न केले पाहिजेत. वास्तुकला व्यवसायाचे धंद्यात परिवर्तन करून काही शक्ती आपल्या फायद्यासाठी हे वातावरण बिघडविण्याचा प्रयत्न करीत आहेत. याबाबत या संघटनेने व महाराष्ट्र सरकारने जागरूक राहिले पाहिजे. तरुण वास्तुतज्ज्ञांच्या विचारांना व कार्याला वाव देण्यासाठी वास्तुप्रकल्प संकल्पना स्पर्धा आयोजित करणे महत्त्वाचे आहे. चंदिगड, दिल्ली व अहमदाबाद येथे तरुण वास्तुतज्ज्ञांना संधी प्राप्त करून देण्याचा धोका त्या वेळी तेथील सरकारांनी व खाजगी संस्थांनी पत्करला. परंतु त्यातूनच आधुनिक वास्तुकलाविष्कार झाला हे महत्त्वाचे आहे. समुद्र हटवून बांधकामासाठी जागा उपलब्ध करून देणे, मुंबईसारख्या शहरात उत्तुंग इमारती बांधण्यास परवानगी देणे, औद्योगिक वसाहती व निवासी वसाहती यांचे प्रदूषणाच्या दृष्टिकोनातून नियोजन करणे अशा अनेक सरकारी धोरणांचा अनुभवावरून फेरविचार होण्याची आवश्यकता आहे. झालेल्या चुकांची पुनरावृत्ती न होण्याच्या दृष्टीने सरकारने जागृत राहिले पाहिजे. विकास योजनांचे आराखडे, त्यासंबंधीचे नियम व कायदे हे योग्य वातावरण निर्मितीला पोषक असणे आवश्यक आहे. सरकार, नगरपालिका यांनी काळाची गरज ओळखून यांचा फेरविचार करणे जरुरीचे आहे. यासाठी योग्य वास्तुतज्ज्ञांचा सल्ला घेणे अपरिहार्य आहे. मोठ्या प्रमाणावर गृहनिर्माण योजना त्वरित अमलात आणल्याने त्यांचा खर्च पण कमी होतो. त्यासाठी पूर्वरचित वास्तुघटकांच्या सहाय्याने वास्तुनिर्माण करण्याच्या तंत्रांना सरकारने प्रोत्साहन दिले पाहिजे. नवीन बांधकाम साहित्य, बांधकाम तंत्रे यांचा अभ्यास व संशोधन करणाऱ्या संस्था निर्माण केल्याने आर्थिक चौकटीत बसणाऱ्या व वातावरणाशी योग्य तडजोड करू शकणाऱ्या वास्तूंच्या निर्मितीसाठी त्यांचा उपयोग होईल.

वास्तुकला ही एक चळवळ आहे. वास्तूच्या बंदिस्त अवकाशात आणि सभोवतालच्या अवकाशात माणसांचे जीवन घडते. या घडणीतून प्रेरणा उत्पन्न होतात व जीवनाचा विकास होतो. असे अवकाश निर्माण करून पोषक वातावरण निर्मिती करणे हाच वास्तुकलेचा उद्देश असतो.

आधुनिक वास्तुकलाच नव्हे तर बौद्ध-हिंदू वास्तुकलेत हे सूत्र सांभाळण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. इतिहासावरून हे स्पष्ट होते की अशा वातावरणाच्या निर्मितीसाठी म्हणजेच पर्यायाने वास्तुकलाविष्कारासाठी एखाद्या शक्तीच्या आश्रयाची व पाठबळाची आवश्यकता असते. महाराष्ट्रातील अशा शक्तींनी अधिक जागरूकतेने कार्यरत राहिले पाहिजे. महाराष्ट्र सरकारचा यात सिंहाचा वाटा असल्याने तो अधिक जबाबदारीने उचलला गेला पाहिजे. संकल्पनात्मक, गुणग्राहकताक्षम अशा वास्तुकला आविष्कारासाठी जिज्ञासू, कुशल व सर्जनशील वास्तुतज्ज्ञ अधिक संख्येने निर्माण झाले पाहिजेत व त्यासाठी कसदार वास्तुकला शिक्षणाची आवश्यकता आहे. तरुण वास्तुशास्त्रज्ञांना अशी संधी प्राप्त करून देण्यात महाराष्ट्र मागे पडणार नाही अशी अपेक्षा आहे.

कांचनजंगा : निवासी वास्तूचा आधुनिक आविष्कार. वास्तुतज्ज्ञ : चार्ल्स कोरिया



त्र्यंबकेश्वर येथील शिवमंदिर : उत्तम वास्तुकलेचा नमुना



अजिंठा लेण्यातील दोन सुंदर चित्रे

# महाराष्ट्रातील दृश्यकला

नलिनी भागवत

**पूर्वपीठिका**

महाराष्ट्रातील कलेचा ओघ प्राचीन काळापासून शतकानुशतके अखंड वाहत आला आहे. त्यात अर्थातच भोवतालच्या परिस्थितीनुसार अनेक बदल घडले. पण प्रवाह चालूच राहिला. इसवी सनपूर्व दुसऱ्या शतकातील भाजा गुंफेतील शिल्प, इसवी सनपूर्व पहिल्या शतकातील कार्ला लेणी, इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंतच्या काळातील कान्हेरी लेणी, इसवी सनाच्या आठव्या शतकातील वेरूळचे कैलास लेणे व घारापुरीची सुप्रसिद्ध लेणी, महाराष्ट्रात अनेक ठिकाणी आढळणारी प्राचीन देवालये, जगप्रसिद्ध अजिंठा गुंफांमधील इसवी सनाच्या ५०० ते ६५० या काळातील भित्तिचित्रे यांवरून प्राचीन काळातही महाराष्ट्रात उच्च दर्जाची कला विकसित झाल्याची साक्ष पटते.

याखेरीज कारागिरीच्या कलांमध्येही महाराष्ट्र फार पूर्वीपासून संपन्न आहे. फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलेल्या पैठणच्या पैठणीने अनेक राजघराण्यांतील व सरदार, जमीनदारांच्या घरांतील ललनांचे देह भूषविले. आजही ती भारतातच नव्हे तर परदेशातील रसिकांच्या कौतुकाची बाब झाली आहे. कोल्हापूरचा साज व इतर तऱ्हेतऱ्हेचे सोन्याचांदीचे दागिने, सावंतवाडीची रंगीत लाकडी खेळणी व इतर वस्तू याही प्रसिद्ध आहेत. लोककलांच्या बाबतीतही महाराष्ट्र अग्रेसर आहे. सावंतवाडी येथे पूर्वीच्या काळी तयार होणारा वर्तुळाकार आकाराचा व अलंकारिक, सुंदर चित्रे असणारा गंजिफा, रामायण महाभारतातील लोककथा रंगतदारपणे कथन करून लोकांचे मनोरंजन करणाऱ्या, पिंगुळी गावातील चित्रकथींनी लघुचित्रशैलीत रंगविलेल्या चित्रमालिका अथवा ठाण्याच्या परिसरातील ठाकूर लोकांनी त्यांच्या धार्मिक कृत्यांसाठी रंगविलेली वारली चित्रे यांतील उत्स्फूर्त आविष्कार व जोमदारपणा विस्मित करणारा आहे.

महाराष्ट्रातील कलेच्या विकासावर तत्कालीन राजकीय परिस्थितीचा सखोल परिणाम झाला. निरनिराळ्या काळातील राजकीय संकटे, लढाया, आक्रमणे यांमुळे अनेक सुंदर इमारती, कलाकृती व कारागिरीच्या वस्तू कालौघात नष्ट झाल्या. साहित्य, काव्य अगर बखरीतून त्यांच्यासंबंधीचे अनेक पुरावे सापडतात. त्यावरून व काहींच्या अवशेषांवरून त्यांच्या मूळ सौंदर्याची कल्पना येते.

इसवी सन १३१७ मध्ये देवगिरीच्या वैभवशाली साम्राज्याचा अंत अल्लाउद्दिन खिलजीने केल्यानंतर दीर्घकाळपर्यंत समर्थ आश्रय न लाभल्याने कलेचा विकास कमजोर झाला. शिवरायांनी हिंदवी स्वराज्य स्थापन केल्यानंतरही संपूर्ण मराठा सत्तेच्या काळात लढाया, उत्तरेकडील मोहिमा यांची धामधूम सतत सुरू राहिल्याने कलेच्या विकासाकडे लक्ष पुरविणे तत्कालीन राज्यकर्त्यांना अशक्य होते. या काळात कलेचा वापर मुख्यतः राजेरजवाडे, पेशवे, सरदार, जमीनदार यांचे वाडे सजविण्यासाठी तसेच दैनंदिन जीवनात वापरल्या जाणाऱ्या वस्तूंवर कलाकुसर करण्यासाठी झाला. वाड्यांच्या सजावटीसाठी काढलेल्या भित्तिचित्रांपैकी वाई, मेणवली, चांदवड येथील भित्तिचित्रे आणि अगदी अलीकडेच प्रकाशात आलेली नाशिक येथील चित्रे यांचा अंतर्भाव आहे. गोवळकोंडा व विजापूर येथे विकसित झालेल्या दख्खनी शैलीचा त्यांच्यावरील प्रभाव स्पष्ट जाणवतो. पुण्याच्या परिसरातील अनेक जुन्या वाड्यांची छते, खांब, तुळया यांवरील लाकडातील कलाकुसर, पुण्याच्या राजा केळकर

*कृष्णलीला : नाना फडणिसांच्या मेणवली येथील वाड्यातील भित्तिचित्र*



राजा रवि वर्मा यांचे प्रसिद्ध चित्र ‘ सैरंध्री ’



म्युझियममधील मस्तानी महालाचे सुंदर कलाकुसरीचे लाकडी अवशेष, कोल्हापूरजवळील निपाणी येथील निपाणीकरांच्या वाड्यातील सुंदर कोरीवकाम यावरून या कलाकुसरीच्या उच्च दर्जाची कल्पना येते. महाराष्ट्रातील मुंबई, सांगली, सातारा, औंध, कोल्हापूर, नागपूर येथील संग्रहालयांत व विशेषतः पुण्याच्या राजा केळकर संग्रहालयात आढळणाऱ्या शेकडो कलाकुसरीच्या वस्तू महाराष्ट्रातील तत्कालीन कलेची साक्ष देतात. यांत नक्षीचे धातूचे दिवे, समया, लामणदिवे, धूपदाने, पानदाने, वजऱ्या, तबके, चौफुले, भांडी, झोपाळ्याच्या कड्या, तऱ्हेतऱ्हेच्या फर्निचरचे कोरीव नमुने, कोरीव कलाकुसरीचे दरवाजे अशा अनेक वस्तू आहेत. या कलाकुसरीच्या वस्तूंमुळेच प्रामुख्याने ब्रिटिश अधिकाऱ्यांचे लक्ष येथील कलेकडे वेधले गेले. परंतु त्यांची सत्ता स्थिर होण्यापूर्वी या कलांना म्हणावे तसे उत्तेजन त्यांना देता आले नाही. ब्रिटिश सत्तेचा पाया भारतात पक्का रोवला गेल्यानंतरच महाराष्ट्रातील कलेला स्वतःचे असे स्वतंत्र रूप प्राप्त होण्यास सुरुवात झाली व त्याला कारण म्हणजे ब्रिटिश अधिकाऱ्यांची अभ्यासू वृत्ती व गुणग्राहकता.

ब्रिटिश सत्तेच्या काळात भारतात आलेले प्रवासी चित्रकार व इंग्लंडमध्ये शिकून आलेले ब्रिटिश सैन्यातील अधिकारी व त्यांच्या स्त्रिया यांच्या चित्रांचा प्रभाव हिंदी चित्रकारांवर हळूहळू पडू लागला. विशेषतः त्यांच्या ब्रिटिश रॉयल ॲकॅडमीच्या पद्धतीच्या वास्तववादी चित्रशैलीतील व्यक्तिचित्रे व निसर्गचित्रे यांचे कौतुक होऊ लागले. यामुळे नवीन होतकरू चित्रकारांमध्ये ही नवी शैली आत्मसात करण्याची इच्छा होणे साहजिकच होते. परंतु अशा शिक्षणाची सुरुवात करण्याचा मान सर्वांत प्रथम पेशव्यांकडे जात असल्याची विस्मयकारक नोंद आढळते. तीनुसार पेशवे सवाई माधवरावांच्या काळात इ.स. १७९० मध्ये अशी शाळा शनवारवाड्यात काढली गेली व काही होतकरू विद्यार्थ्यांना चित्रकला शिकविण्याचे काम तत्कालीन ब्रिटिश रेसिडेंट मॅलेट याचा सासरा वेल्स याच्याकडे सोपविले गेले. या शाळेत शिकलेल्या निवडक विद्यार्थ्यांपैकी गंगाराम तांबट हा विशेष नावारूपास आला. दुर्दैवाने ही चित्रशाळा जेमतेम ५ वर्षे चालली व वेल्स याच्या मृत्यूनंतर ती १७९५ मध्ये बंद पडली. यानंतर पुन्हा असा प्रयत्न इ.स. १८५७ पर्यंत म्हणजे सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टच्या स्थापनेपर्यंत महाराष्ट्रात झालेला दिसत नाही.

**उदयकाल**

महाराष्ट्रातील कलाकुसरीच्या वस्तू पाहून येथील होतकरू कारागिरांना या बाबतीत शिस्तबद्ध प्रशिक्षण देण्याची गरज ब्रिटिशांना जाणवू लागली. इ.स. १८५० मध्ये डॉ. हंटर यांनी भारतीय कारागिरीचे पुनरुज्जीवन करण्याच्या हेतूने मद्रास येथे पहिले तंत्रनिकेतन काढले. कलकत्ता येथेही असाच प्रयत्न १८५४ मध्ये झाला. याचाच परिणाम होऊन ३ डिसेंबर १८५२ साली 'कोरियर' मध्ये प्रसिद्ध झालेल्या लेखात मद्रास स्कूलच्या प्रदर्शनाचे कौतुक करून असेच कार्य मुंबईला करण्यासाठी सर जमशेटजी जिजिभॉय व श्री. नाना शंकरशेट यांना आवाहन केले गेले. १८४० मध्ये स्थापन झालेल्या 'बोर्ड ऑफ एज्युकेशन' व १८५१ साली हाईड पार्कमध्ये नियोजित केलेल्या प्रदर्शनासाठी 'कलाकृती निवडणारे मंडळ' या दोन्हीचे सन्माननीय सदस्य असल्यामुळे सर जमशेटजी यांना अशी गरज जाणवली व ही सूचना एकदम पटली. त्यामुळे या बाबतीत पुढाकार घेऊन आपली अशा शिक्षणासंबंधीची योजना १ लाख रुपयांच्या देणगीसह त्यांनी ब्रिटिश गव्हर्नर लॉर्ड फॉकलंड यांच्यापुढे मांडली. सरकारने याचा विचार करण्यासाठी कमिटी नेमून तिच्या सल्ल्याप्रमाणे अशी संस्था काढण्याचा निर्णय घेतला. काळजीपूर्वक विचारविनिमय झाल्यानंतर १८५७ साली एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटच्या जागेत 'सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट अँड इंडस्ट्री' ही महाराष्ट्रातील पहिली शासनाधारित कलाशाळा मुंबईत स्थापन झाली व पहिला 'एलिमेंटरी ड्रॉइंग अँड डिझायनिंग'चा वर्ग सुरू झाला. या शाळेचा उद्देश चित्र, रेखाटन, संकलपन, अलंकारिक मातीची भांडी, धातुकाम, लाकडी कोरीवकाम यांत मार्गदर्शन करून पारंपरिक कारागिरी जतन करून



चित्रकार रावबहादूर धुरंधर यांची कलाकृती : 'शिवराज्याभिषेक'



विद्यार्थी स्वावलंबी बनावा असा होता. अशा तऱ्हेने जमशेटजी यांच्या प्रयत्नाने स्थापन झालेले सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट हे पुढच्या काळातही महाराष्ट्रातील कलेच्या विकासात अत्यंत महत्त्वाचे ठरले. एवढेच नव्हे तर भारतातील चित्रशैलीला पुढील काळात वळण देण्याचे कामही ह्या संस्थेने केले असे म्हणण्यास हरकत नाही. येथून बाहेर पडलेल्या कलावंतांनी आपल्या कलाकृतींच्या द्वारे भारतभर नाव गाजविले एवढेच नव्हे तर परदेशातही वाहवा मिळविली. शिवाय येथून बाहेर पडलेल्या अनेक कलावंतांनी महाराष्ट्रभर चित्रकला संस्था काढून कलाशिक्षणाच्या प्रसाराचे महत्त्वपूर्ण कार्य केले. अशा रीतीने १९६० पर्यंत सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टच्या कलावंतांनी आपल्या कलेचा फार मोठा प्रभाव भारतातील कलाशैलीवर उमटविला.

जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधील शिक्षणक्रमावर इंग्लंडमधील रॉयल अॅकॅडमीच्या शिक्षणक्रमाचा साहजिकच प्रभाव होता. त्यामुळे वास्तववादी पद्धतीने चित्रण करण्यासाठी लागणारे अचूक रेखाटन, बारकाव्याने केलेले फिनिशिंग, छायाप्रकाशाच्या छटांचा हुबेहूब परिणाम, निसर्गातील वस्तूंच्या चित्रणाचा अभ्यास यावर भर दिला गेला. येथील सुरुवातीच्या कलाशिक्षकात जेम्स पेटन, क्रोव व टेरी यांचा समावेश होता. १८६५ साली लॉकवुड किपलिंग, हिगिन्स व ग्रिफिथ्स या तीन शिक्षकांना आणून त्यांच्याकडे अनुक्रमे 'स्कूल ऑफ आर्किटेक्चर', 'स्कूल ऑफ आर्ट अँड क्राफ्ट्स' आणि 'स्कूल ऑफ डेकोरेटिव्ह डिझाइन' हे तीन स्वतंत्र वर्ग सोपविण्यात आले. अल्पावधीतच या तीनही विभागांची भरभराट झाली. लवकरच हे सर्व वर्ग या संस्थेसाठी खास बांधलेल्या भरपूर प्रकाशाची सोय असलेल्या प्रशस्त जागेत भरू लागले. १८९० च्या सुमारास भारतीय परंपरेच्या कलावस्तू बनविण्यासाठी 'रे आर्ट वर्कशॉप' ची योजना करून ते या शाळेस जोडले गेल्यामुळे 'ड्रॉइंग अँड पेंटिंग, स्कल्पचर अँड मॉडेलिंग, आर्किटेक्चर, रे आर्ट वर्कशॉप व अप्लाइड आर्ट' या पाच विभागांसहित या संस्थेचा शिक्षणक्रम अधिक योजनाबद्ध रीतीने सुरू झाला.

रे आर्ट वर्कशॉपमध्ये शिकविण्यासाठी या देशातील कसबी कारागिरांची नेमणूक झाली. तांब्या-पितळेच्या वस्तू करणारे कारागीर, चांदीच्या वस्तू करणारे, गालिचे विणणारे विणकर, दगड, लाकूड व लोखंड यात कारागिरी करणारे कुशल कारागीर निवडून येथे नेमल्याने विद्यार्थ्यांची या विभागातील संख्या वाढली. १८९५ मध्ये 'पॉटरी वर्कशॉप' (मातीची भांडी करण्याची कला शिकविण्यासाठी) निर्माण झाले. १९०९ मध्ये त्याला 'सर जॉर्ज क्लार्क स्टुडिओज अँड टेक्निकल लॅबोरेटरीज' हा विभाग जोडला गेला. या सर्वांमुळे रे आर्ट वर्कशॉपमधून अधिकाधिक दर्जेदार कलावस्तू बनू लागल्या. इ.स. १८९९–१९०० मध्ये पॅरिस येथील चित्रप्रदर्शनात भारतीय ट्रॉफीसाठी तांब्याचे अलंकारिक दरवाजे बनविण्याचे काम येथील विद्यार्थ्यांनी केले. त्या काळात पॉटरी विभागातून बनविलेली भांडी आजही मुंबईच्या जिजामाता बागेतील संग्रहालयात आढळतात व ती तंत्र व अलंकरण यांच्या सुसंवादामुळे देखणी वाटतात. दुर्दैवाने हा पॉटरी विभाग काही तांत्रिक अडचणींमुळे पुढे बंद झाला. स्कूल ऑफ आर्किटेक्चर विद्यार्थ्यांनीही मुंबईतील क्रॉफर्ड मार्केट, व्ही.टी. स्टेशन, मुंबई युनिव्हर्सिटी यांच्या इमारतींचे अलंकरण करण्याच्या कामात भाग घेतला व मोलाची मदत केली.

इ.स. १८७२ मध्ये अजिंठ्याच्या भित्तिचित्रांच्या नकला करण्याचे काम जे. जे. स्कूल ऑफ आर्टच्या विद्यार्थ्यांवर सोपविले गेले व ते त्यांनी यशस्वीपणे पार पाडले. या नकला इंग्लंडला पाठविल्या गेल्या व तेथे त्यांचे प्रदर्शन साऊथ केंसिग्टन येथील संग्रहालयात भरून त्यांची मुक्तकंठाने प्रशंसा झाली. यामुळे अजिंठ्याच्या चित्रांबद्दल इंग्लिश लोकांत उत्सुकता निर्माण झाली.

एकदा जे. जे. स्कूल ऑफ आर्टची निर्मिती झाल्यावर तेथून बाहेर पडलेले चित्रकार व ब्रिटिश सैन्यातील अधिकारी व त्यांच्या स्त्रिया यामधील हौशी चित्रकारांच्या कलेला वाव मिळण्यासाठी एखादे चित्रकारांचे मंडळ असण्याची गरज भासू लागली आणि यातूनच १८८८ साली मुंबईच्या 'बॉम्बे आर्ट सोसायटी'ची स्थापना झाली व तिच्यातर्फे नवोदित चित्रकारांसाठी दर वर्षी

नियमित कलाप्रदर्शने भरू लागली. या संस्थेच्या आधी पुणे येथे 'फाईन आर्ट सोसायटी ऑफ वेस्टर्न इंडिया' ही संस्था अशाच प्रकारे दर वर्षी ऑगस्टमध्ये अशी कलाप्रदर्शने भरवीत असे, परंतु तिचा उद्देश मुख्यतः सैन्यातील अधिकाऱ्यांच्या कलेस उत्तेजन देण्याचा असल्यामुळे व पुण्यात मुंबईसारखी चित्रकला शिक्षण देणारी संस्था नसल्याने बॉम्बे आर्ट सोसायटीच्या प्रदर्शनांचा बोलबाला अधिक झाला व सिमला येथील फाईन आर्ट सोसायटीच्या अगर कलकत्त्याच्या फाईन आर्ट सोसायटीच्या प्रदर्शनांपेक्षा बॉम्बे आर्ट सोसायटीत सुवर्णपदक मिळविणे हे अधिक प्रतिष्ठेचे मानले जाऊ लागले व सर्व भारतातील चित्रकार मोठ्या संख्येने मुंबईतील या प्रदर्शनात भाग घेऊ लागले. अनेक राजेरजवाडे व धनिक आश्रयदात्यांनी या प्रदर्शनात अनेक बक्षिसे विविध विषयांसाठी ठेवल्याने कलाकारांना अधिकच प्रोत्साहन मिळाले व ही बक्षिसे मिळविण्यासाठी नवीन कलाकृती करण्याची अहमहमिका निर्माण झाली. थोड्याच अवधीत मुंबई शहर कलाजगतातील चळवळीचा केंद्रबिंदू ठरले. या बाबतीत सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधील शिक्षण, बॉम्बे आर्ट सोसायटीची प्रदर्शने व मुंबईतील चित्रकारांना उत्तेजन देणारे उदार आश्रयदाते यांचा वाटा प्रमुख होता.

बॉम्बे आर्ट सोसायटीची प्रदर्शने मार्चमध्ये व क्वचित फेब्रुवारीत भरत व गव्हर्नरांच्या हस्ते उद्घाटन होई. प्रदर्शनाच्या आदल्या दिवशी सायंकाळचा 'कॉनव्हर्सेशन'चा समारंभ व दुसऱ्या दिवशीचा उद्घाटनाचा समारंभ नेत्रदीपक असे. 'टाइम्स ऑफ इंडिया' अगर 'बॉम्बे क्रॉनिकल' यांसारखी प्रमुख वृत्तपत्रे या समारंभांना मोठी प्रसिद्धी कौतुकाने देत असत.

मुंबईतील कलाजगतातील या प्रदर्शनांच्या वाढत्या महत्त्वाने प्रभावित होऊन सुप्रसिद्ध चित्रकार रवि वर्मा यांनी मुंबईत वास्तव्य केले, एवढेच नव्हे तर मुंबईतील या प्रदर्शनांत नियमितपणे आपली चित्रे पाठविली. महाराष्ट्रातील स्त्रियांच्या नऊवारी पद्धतींच्या साडीच्या सौंदर्याने प्रभावित झाल्याने ही मराठी वेषभूषा आपल्या चित्रातील स्त्रियांसाठी त्यांनी प्रामुख्याने वापरली.



कै. गणपतराव म्हात्रे यांचे प्रसिद्ध शिल्प : 'देवळाला जाताना'



एस्. एल्. हळदणकर यांचे जलरंग चित्र : 'मुस्लिम यात्रेकरू'



जे. एम्. अहिवासी यांची कलाकृती : 'प्रीतिसंदेश'



सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधून बाहेर पडणारे विद्यार्थी पहिल्यापासूनच बॉम्बे आर्ट सोसायटीच्या प्रदर्शनात चमकू लागले. त्यांत प्रामुख्याने पेस्तनजी बोमनजी, पंडित श्री. दा. सातवळेकर, आबालाल रहेमान, पीठावाला, एम्. व्ही. धुरंधर, ए. एक्स्. त्रिंदाद, एल्. एन्. तासकर, ए. ए. भोंसुले, एस्. पी. आगासकर, चुडेकर, ए. एच्. मुल्लर या वास्तववादी शैलीच्या चित्रकारांचा समावेश होता. यांपैकी पेस्तनजी, पीठावाला, त्रिंदाद, भोंसुले, आगासकर यांनी व्यक्तिचित्रे व प्रसंगचित्रे रंगविली. आबालाल, सातवळेकर यांनी निसर्गचित्रे, तर धुरंधरांनी रवि वर्मा यांच्याप्रमाणे ऐतिहासिक व पौराणिक प्रसंगांवरील चित्रे रंगविली. धुरंधरांनी फिगर-ड्रॉइंग लोकप्रिय केले. तसेच तत्कालीन समाजातील चालीरीतींचे दर्शन आपल्या चित्रांतून घडविले. उत्कृष्ट उदाहरण चित्रकार म्हणूनही त्यांचे स्थान वादातीत आहे. तासकरांनी शहरांतील देखावे, नदीघाटांवरील देखावे व देवालयांची चित्रे रंगवून मनुष्याकृती व निसर्गचित्रण यांचा मिलाफ आपल्या चित्रांतून घडविला. गणपतराव म्हात्रे यांच्या 'मंदिरपथगामिनी' या शिल्पाने तर भारतीयच नव्हे तर ब्रिटिश रसिकांनाही थक्क करून सोडले. या सर्व कलाकारांच्या कलाकृतींचा दर्जा एवढा उच्च प्रतीचा होता की ब्रिटिश लोकांकडूनही त्यांची प्रशंसा झाली. १८९५ साली धुरंधरांना मिळालेले बॉम्बे आर्ट सोसायटीचे सुवर्णपदक व १९११ साली लंडनमध्ये भरलेले पीठावाला यांचे 'व्यक्तिचित्र प्रदर्शन' या दोन विशेष घटना या काळात घडल्या.

१८९९ ते १९१८ या काळात जे. जे. स्कूलमध्ये प्रिन्सिपॉल असलेल्या सेसिल बर्न्स यांच्या ब्रिटिश अस्सल पारदर्शक जलरंग पद्धतीचा मोठा प्रभाव चित्रकारांवर पडला. माधवराव परांडेकर, एस्. एल्. हळदणकर यांनी याच पद्धतीच्या जलरंगाने निसर्ग चित्रण लोकप्रिय केले. यातूनच मुंबईला एम्. आर्. आचरेकर, गाडगीळ, केतकर, चाफळकर, अंबिका धुरंधर, सांगलीत जांभळीकर व कोल्हापुरात दत्तोबा दळवी, बाबा गजबर व पुढे गणपतराव वडणगेकर, चंद्रकांत मांडरे, रा. शि. गोसावी यांनी स्वतःची अशी खास जलरंगशैली निर्माण केली. या काळात विशेषतः निसर्ग चित्रणही मोठ्या प्रमाणावर झाले. त्याचबरोबर दैनंदिन जीवनातील सुखदुःखाचे प्रसंगही चित्रित झाले. आचरेकरांची अशा विषयावरील चित्रे व शिल्पकार फडके, करमरकर, शामराव म्हात्रे, तालीम, गोरेगावकर यांच्या अशाच प्रकारच्या मानवी सुखदुःखाचे पदर उलगडून दाखविणाऱ्या शिल्पकृती निर्माण झाल्या. स्वतंत्रपणे चित्रशैली आत्मसात करणारे कोल्हापूरचे चित्रकार व शिल्पकार बाबुराव पेंटर यांचाही उल्लेख आवश्यक आहे. १९२५ साली हळदणकरांच्या 'मॉहमेडन पिलग्रिम' या चित्राने तर निसर्गदृश्य व व्यक्तिचित्र यांचा सुरेख मिलाफ घडवून आणला. या काळातील चित्रकारांनी अनेक महत्त्वाची बक्षिसे पटकावली.

या काळातील आणखी एक महत्त्वाची घटना म्हणजे १९१८ साली स्थापन झालेली 'आर्ट सोसायटी ऑफ इंडिया' ही संस्था. हिच्या स्थापनेसाठी गणपतराव म्हात्रे, माधवराव परांडेकर, पीठावाला, कृष्णराव भाई हे चित्रकार एकत्र आले. चित्रकार, शिल्पकार, वास्तुशिल्पज्ञ, छायाचित्रकार या सर्वांना एकत्र आणून कलेच्या विकासासाठी कार्य करण्याच्या हेतूने तिची निर्मिती झाली. या संस्थेनेही पुढे बॉम्बे आर्ट सोसायटीच्या बरोबरीने कलाक्षेत्रात काम केले.

१९०२ साली दिल्ली दरबारच्या प्रसंगी भरलेल्या औद्योगिक प्रदर्शनात जे. जे. स्कूल ऑफ आर्टच्या विद्यार्थ्यांनी सजविलेल्या 'इंडियन रूम' ची अनेकांनी प्रशंसा केली. या दालनात चित्र, शिल्पकृती, कलाकुसरीच्या चांदीच्या, पितळेच्या वस्तू, कोरीव फर्निचर, उठावाच्या नक्षीची भांडी, हातछपाईचे पडदे, झालरी इत्यादी वस्तू होत्या.

**भारतीय चित्रशैलीचे पुनरुज्जीवन**

वरील दिल्ली दरबाराच्या प्रदर्शनाचे उद्घाटन करताना लॉर्ड कर्झन यांनी भारतातील कलावस्तूंची तारीफ करून



एन्. एस्. वेंद्रे : विसावा, तैलचित्र, ११२×९२ सें.मी., १९८५



भारताच्या परंपरागत कलेला उत्तेजन देण्याची गरज व्यक्त केली. या वेळेपासून भारतीय कला व कारागिरी यांच्या पुनरुज्जीवनाची कल्पना आली. प्रिन्सिपाल हॅवेल यांनी लगेच याचा फायदा घेऊन कलकत्ता स्कूल ऑफ आर्टमध्ये भारतीय कलेच्या अभ्यासाचा अंतर्भाव केला. लवकरच अवनींद्रनाथ टागोरांची त्यांना साथ मिळून पुनरुज्जीवनाच्या चळवळीने जोर धरला. मुंबईत १९०८ सालच्या जे. जे. स्कूलच्या वार्षिक कलाप्रदर्शनाच्या उद्घाटनप्रसंगी बोलताना ब्रिटिश गव्हर्नर व प्रिन्सिपॉल सेसिल बर्न्स या दोघांनींही पाश्चात्य कला व भारतीय कला यांचा मिलाफ घडवून आपल्या कलेत भारतीयत्व आणण्याचे आवाहन चित्रकारांना केले. अशा रीतीने बंगाल स्कूलला समांतर अशी पुनरुज्जीवन मोहीम मुंबईच्या कला शाळेतही सुरू झाली.

१९१७ साली जे. जे. स्कूलमध्ये शिकलेल्या रविशंकर रावळ यांच्या 'बिल्वमंगल' या भारतीय शैलीच्या चित्राला मुंबईत मिळालेले सुवर्णपदक म्हणजे पुढे येणाऱ्या भारतीय शैलीच्या पुनरागमनाची नांदी ठरली. सेसिल बर्न्स यांच्यानंतर १९१८ मध्ये त्यांच्या जागी आलेल्या प्रिन्सिपॉल ग्लॅडस्टन सॉलोमन यांनी भारतीय शैलीच्या अभ्यासाचा जोरदार पुरस्कार केला. परिणामी १९१९ साली जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये भारतीय चित्रशैलीच्या अभ्यासासाठी 'म्यूरल पेंटिंग क्लास' हा स्वतंत्र वर्ग सुरू झाला. प्रिन्सिपॉल सॉलोमन यांनी पाश्चात्य शैली व भारतीय शैली यांच्या संयोगातून नवीन शैली निर्माण करण्यावर भर दिला. यावरील आपले विचार 'दि बॉम्बे रिव्हाइव्हल ऑफ इंडियन आर्ट' या त्यांच्या पुस्तकात १९२५ साली प्रसिद्ध केले. व त्याचबरोबर या म्यूरल पेंटिंग क्लासच्या विद्यार्थ्यांना सरकारकडून शिष्यवृत्त्या, पदके व बक्षिसेही या अभ्यासासाठी मिळविली. त्यामुळे भारतीय चित्रकलेच्या विद्यार्थ्यांची संख्या वाढू लागली. या वर्गाला जी. एच्. नगरकर व जगन्नाथ अहिवासी हे मार्गदर्शन करीत. या दोघांची भारतीय पद्धतीची चित्रे काढण्याची शैली भिन्न होती. नगरकर पारदर्शक जलरंगाने चित्रे रंगवीत तर अहिवासी टेंपरा रंगाने अपारदर्शक पद्धतीने रंगवीत. यामुळे विद्यार्थ्यांचे दोन स्वतंत्र गट करून या दोघांकडे सोपविले जात. अहिवासींचे एम्पायर एक्झिबिशनसाठी खास रंगविलेले 'मेसेज' हे चित्र व नगरकरांचे सुवर्णपदक मिळविणारे 'द्रौपदी स्वयंवर' ही दोन्ही चित्रे अतिशय गाजली. या दोघांकडून स्फूर्ती घेऊन नंतर अनेकांनी भारतीय अलंकारिक शैलीत चित्रे रंगविली. या खेरीज त्या काळात आर्. जी. चिमुलकर व आर्. डी. धोपेश्वरकर या जे. जे. स्कूलमधील अध्यापकांनीही आपल्या भारतीय शैलीतील चित्रांमुळे नाव गाजविले.

भारतीय शैलीत काम करणाऱ्या फारच थोड्या चित्रकारांनी अखेरपर्यंत त्याच शैलीत काम केले. असे चित्रकार म्हणजे रसिकलाल पारीख, वजुभाई भगत, रसिक रावळ व ए. ए. आलमेलकर होत. बाकीच्या अनेक चित्रकारांनी भारतीय शैलीत सुरुवात करून नंतर आपल्या शैलीत अनेक बदल करीत ती अमूर्त शैलीपर्यंत पोचविली. यात सोलेगावकर, हेब्बर, चावडा, पळशीकर, डी. जी. कुलकर्णी, सामंत, गायतोंडे, पै, रायबा हे होत. चित्रकार बेंद्रे आपल्या शैलीत अनेक बदल करीत पुन्हा भारतीय वळणाच्या शैलीवर स्थिर झाले. शिल्पकार पानसरे यांनी आपल्या शिल्पात खरेखुरे भारतीय स्वरूप आणले. त्यांची गोल व उत्थित शिल्पे उल्लेखनीय आहेत.

१९२४ साली इंग्लंडमधील वेम्बले पार्कमध्ये भरलेल्या प्रदर्शनात सर जे. जे. स्कूलच्या कलाकारांनी 'इंडियन रूम' सजविली. या दालनाच्या भिंती उंची भारतीय किनखावाने मढवून त्यावर काव्य, संगीत, शिल्प, उद्योग, शेती या विषयांवरील भारतीय शैलीची चित्रे लावली होती. रे आर्ट वर्कशॉपमध्ये बनविलेले कोरीव फर्निचर, चांदीची कलाकुसरीची भांडी, सुंदर गालिचे या दालनात मांडले होते. या इंडियन रूमचा खूपच गौरव झाला. अशीच दुसरी महत्त्वाची घटना म्हणजे जे. जे. स्कूलचे अध्यापक व विद्यार्थीवर्गाने मिळून दिल्लीच्या सेक्रेटरिएटमधील कमिटी रूममध्ये काढलेली म्यूरल चित्रे. ही चित्रे काढणाऱ्या चित्रकारांत रावबहादूर धुरंधर,



के. के. हेब्बर : 'नागमंडल', तैलचित्र, १५२ ×१२२ सें.मी., १९८५



माधव सातवळेकर : 'जयसलमेर', तैलचित्र, १०२ × ९९ सें.मी., १९८२



एम्. एफ् हुसेन : 'वाराणसी', तैलचित्र, १२८×८५ सें.मी., १९८१



जी.पी. फर्नांडिस, अहिवासी, नगरकर, भोंसुले, राणे वगैरेंचा समावेश होता. म्यूरलसाठी वेगवेगळ्या ललित कलांचे विषय निवडले गेले तर घुमटात भारतीय शैलीच्या वेगवेगळ्या आठ काळांतील प्रतिकात्मक देवता रंगविण्यात आल्या. या दोन्ही कामांची प्रशंसा होऊन जे. जे. स्कूलमधील कला शिक्षणाविषयी कुतूहल निर्माण झाले.

**आधुनिक कलायुगाचे पडसाद**

१९३४ नंतरच्या काळात पूर्वीची परंपरा झुगारून देऊन नवे नवे प्रयोग कलाशैलीत आलेले दिसतात. याला सुरुवातीस चालना देण्यास इंदूरचे तीन चित्रकार एन्. एस्. बेंद्रे, जी. एम्. सोलेगावकर व डी. जे. जोशी यांचा वाटा मोठा होता. रेखाटनापेक्षा रंग व छाया प्रकाशाच्या परिणामाला महत्त्व देऊन रंगविलेली चित्रे या चित्रकारांनी काढली. यांपैकी बेंद्रे यांचे ' व्हॅगॅबाँड ' व सोलेगावकरांचे ' महियारी ', डी. जे. जोशी यांचे ' बर्तनबझार ' ही चित्रे पाहिल्यास या परिवर्तनाची कल्पना येते. विशेषत: बेंद्रे व सोलेगावकरांनी आपल्या कलाकृतींनी हा काळ गाजविला. या काळात नव्या विचाराला चालना देण्याचे श्रेय या दोघांना मिळते. याच विचारांनी प्रभावित होऊन मुंबईचे इतर चित्रकार व्ही. ए. माळी, मनोहर जोशी, व्ही. आर्. आंबेरकर, पी. ए. धोंड, विमल गोडबोले यांनी आपल्या स्वत:च्या शैली निर्माण केल्या. मनोहर जोशींचे आपल्या चित्रांतील विविध प्रयोग, व्ही. ए. माळींची तिरप्या ब्रशच्या फटकाऱ्यांची जोमदार चित्रे व धोंड यांची सागराची चित्रे ही विशेष लक्षात घेण्याजोगी आहेत.

१९३७ ते १९४० या काळात अमृता शेरगिलच्या भारतीय समाजजीवन व पाश्चात्य तंत्र यांचा समन्वय साधणाऱ्या चित्रांनी व वॉल्टर लँगहेमर यांच्या इंप्रेशनिस्ट शैलीच्या रुंद ठळक फटकाऱ्यांनी काढलेल्या चित्रांनी मोठा प्रभाव निर्माण केला. नंतर आलेल्या चित्रकारांपैकी हेब्बर, चावडा, पळशीकर हे अमृता शेरगिलच्या चित्रांनी विशेष प्रभावित झाले तर रझा हे



कै. पाणसरे यांचे शिल्प



कै. बाबूराव पेंटर यांचे तैलचित्र 'वटपूजा'



लॅंगहेमर व बेंद्रे यांच्या चित्रांनी प्रभावित झाले.

१९४० च्या सुमारास स्वातंत्र्याच्या चळवळीबरोबरच कलाशैलीत बंडखोरीचे वारे वाहू लागले. अशी बंडखोरी दाखविणारे दोन गट निर्माण झाले. पहिला म्हणजे पी. टी. रेड्डींच्या नेतृत्वाखालील ' यंग टर्क्स ' ग्रुप. यांत मजिद, भोपळे, बाप्टिस्टा व एम्. वाय्. कुलकर्णी हेही होते. चित्ररचना व रंगलेपन यांत त्यांनी वेगवेगळे प्रयोग केले. मात्र रेड्डी यांनी ४२ च्या चळवळीत उडी घेतल्याने या गटाचे काम थांबून इतरही सभासद पांगले. यानंतर खऱ्या स्वरूपाने खळबळजनक ठरलेला व महाराष्ट्रातच काय पण भारतातील कलाशैलीला वेगळे वळण देणारा गट म्हणजे १९४७ साली स्थापन झालेला 'प्रोग्रेसिव्ह आर्टिस्ट्स ग्रुप'. के. एच्. आरा, न्यूटन सूझा, रझा, शिल्पकार सदानंद बाकरे यांनी एकत्र येऊन हा निर्माण केला. नंतर त्यात हुसेन व गाडे यांचा अंतर्भाव होऊन सहा जणांचा हा गट झाला. रुढीची बंधने तोडून कलाकार व जनता यांच्यात जवळीक साधणे हा आपला हेतू त्यांनी आपल्या निवेदनात (मॅनिफेस्टो) प्रसिद्ध करून खळबळ उडविली. भडक रंग व विरुपीकरण केलेल्या मानवाकृती, पीडित लोकांवर केलेले चित्रण यांमुळे त्यांच्या पूर्वीपेक्षा अगदी वेगळ्या भासणाऱ्या कलाकृतींमुळे कलाजगतातील सर्व लोक खडबडून जागे झाले. वास्तववादाचे उरलेसुरले अवशेषही मोडून काढण्याचे काम त्यांच्या कलाकृतींनी केले. लवकरच यांपैकी बाकरे, सूझा व रझा हे परदेशी गेले व तेथेच स्थायिक झाले. यानंतर प्रोग्रेसिव्ह गटात गायतोंडे, क्रिशन खन्ना व नंतर सामंत, हजरनीस व रायबा यांचा समावेश झाला. १९५३ च्या प्रदर्शनानंतर हा गट विस्कळीत झाला. मात्र भारतीय कलेला दिशा देण्याचे महत्त्वाचे कार्य त्याने केले.

प्रोग्रेसिव्ह ग्रुपच्या यशात रुडी व्हॉन लायडन, वॉल्टर लॅंगहेमर व श्लेसिंजर या तिघा परदेशी टीकाकारांचा मोठा वाटा होता. यांपैकी लायडन जर्मन असून बाकी दोघे ऑस्ट्रियन होते. लायडन व लॅंगहेमर हे दोघेही उत्कृष्ट चित्रकार असून



व्ही. एस्. गायतोंडे : 'चित्र', तैलचित्र, १०२×१५५ सें.मी., १९८१



कै. शंकर पळशीकर : 'माया', तैलचित्र, ४५ × ६० सें.मी., १९५८



युरोपातील कलाशैलीतील आधुनिक चळवळींची पूर्ण जाणीव त्यांना होती. या आधुनिक कलाप्रवाहाची माहिती प्रोग्रेसिव्ह ग्रुपच्या कलाकारांना देऊन त्यांच्या नव्या वाटचालीत उत्तेजन व प्रसंगी आर्थिक मदत देण्याचे कार्य या तिघांनी केले. लायडन यांच्याच पुढाकाराने (आर्टिस्ट्स सेंटर) या चित्रकारांना सहाय्य करून, कलाजगतात महत्त्वाचे कार्य करणाऱ्या केंद्राची स्थापना झाली. या काळात मुंबईतील कलाक्षेत्रात समीक्षक म्हणूनही लायडन यांनी मोठी कामगिरी बजावली.

अशा रीतीने प्रोग्रेसिव्ह ग्रुपची क्रांतिकारक चळवळ चालू असतानाच दुसऱ्या बाजूने सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधील नवे प्रिन्सिपॉल जिरार्ड यांच्यामुळे नवा दृष्टिकोन लाभलेले के. के. हेब्बर, चावडा, शंकर पळशीकर यांच्यासारखे चित्रकार भारतीय अजिंठा चित्रे अगर लघुचित्र शैलीपासून स्फूर्ती घेऊन नव्या तऱ्हेने आविष्कार करण्याची वाटचाल करीत होते. हेब्बर यांचे १९४७ साली बॉम्बे आर्ट सोसायटीचे सुवर्णपदक मिळविलेले 'टू दी मेडनहुड' अथवा पळशीकर यांचे सुवर्णपदक मिळविलेले 'सिनर्स डिव्हाइन' (१९५०) हे चित्र अथवा चावडा यांचे 'क्यू फॉर वॉटर' अथवा त्यांची इंडोनेशियामधील चित्रे यावरून या चित्रकारांची भारतीय शैलीचा संदर्भ घेऊन आपल्या शैलीत नवा आविष्कार आणण्याची धडपड दिसून येते. या तिघाही चित्रकारांचा वास्तववादी चित्रणात व विशेषत: व्यक्तिचित्रात हातखंडा असूनही ते वास्तववादापासून दूर गेले हे लक्षात घेण्याजोगे आहे. एवढेच नव्हे तर सुवर्णपदके अथवा इतर मोठी बक्षिसे मिळाल्यानंतरही व विशेषत: पळशीकरांची चित्रे, हेब्बर व चावडा यांची भारतीय नृत्यावरील चित्रे अत्यंत लोकप्रिय झाली असूनही त्यांनी आपल्या शैलीत परिवर्तन घडवून आणले. या बाबतीत पळशीकरांचे 'ओ मदर' (१९५२) व 'माया' (१९५०) ही चित्रे लक्षणीय ठरली. तंत्र व आशय या दोन्ही दृष्टीने ती वरचढ होती व विरूपीकरणाचा वापर त्यात केला होता.

१९५२ साली प्रोग्रेसिव्ह ग्रुप विस्कळीत झाल्यावर आरा व



*पिलू पोचखानवाला : 'उकल', ॲल्युमिनियम शिल्प, ३० × ९० × २३ सें.मी., १९८४*



बी. प्रभा : 'राजस्थानी कुंभारीण', तैलचित्र ११७ × १०२ सें.मी., १९८४



हेब्बर या चित्रकारांनी चावडा, पळशीकर, गायतोंडे, सामंत, डी. जी. कुलकर्णी (डिझी) अशा सात समर्थ चित्रकारांची 'बॉम्बे ग्रुप' ही संघटना निर्माण केली. नंतर त्यात बाबुराव सडवेलकरही सामील झाले. या चित्रकारांनी एकत्रित चर्चा करणे, चित्रप्रदर्शने भरविणे वगैरे कार्यक्रम सुरू केले. या सर्व चित्रकारांनी पूर्वीच युरोपची सफर केली असल्याने तिकडील कलाप्रवाहांमागील प्रेरणा व त्यांचे महत्त्व यांची योग्य जाणीव त्यांना होती. यातील बऱ्याचशा चित्रकारांनी भारतीय शैलीचा अंगीकार करून नंतर त्यांत परावर्तन करीत स्वतःची अशी स्वतंत्र शैली निर्माण केली. व त्यांतील हेब्बर सोडून बहुतेक सर्वांनी अमूर्त पद्धतीपर्यंत आपली शैली पोचविली. पळशीकर व सामंत तांत्रिक शैलीची चित्रे रंगवू लागले. डिझी हे अमूर्त शिल्पाकडे वळले तर हेब्बर सामाजिक आशय सांगणाऱ्या मनुष्याकृतींना प्राधान्य देणाऱ्या शैलीकडे वळले. प्रोग्रेसिव्ह ग्रुपप्रमाणे 'बॉम्बे ग्रुप' ही लवकरच विस्कळीत झाला. मात्र त्यांतील सर्व चित्रकार 'प्रोग्रेसिव्ह' चित्रकारांप्रमाणेच आंतरराष्ट्रीय कीर्तीचे झाले.

या सर्व कलाचळवळीत प्रामुख्याने १९५१ साली स्थापन झालेली जहांगीर आर्ट गॅलरी व मुंबईतील इतर आर्ट गॅलऱ्यांमध्ये केमोल्ड गॅलरी, पंडोल गॅलरी, ताज आर्ट गॅलरी यांचा वाटा मोठा आहे.

**हस्तमुद्रणकला**

गेल्या ५० वर्षांत हस्तमुद्रणकलेला पुन्हा एकदा महत्त्वाचे स्थान लाभले व अनेक पुढारलेल्या देशांत या प्राचीन कलेचे पुनरुज्जीवन केले गेले. १९४० मध्ये इटलीमध्ये हा विषय शिकून आलेल्या यज्ञेश्वर शुक्ल यांच्यामुळे सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये (ग्राफिक) हस्तमुद्रण विभागाचा सायंवर्ग सुरू झाला. या वर्गात एचिंग व ॲक्वाटिंट हे प्रकार शिकविले जात. या वर्गात प्रथम तयार झालेले दोन विद्यार्थी म्हणजे रसिकलाल पारीख व वसंत परब. पुढे १९६० मध्ये शुक्ल गुजराथमध्ये निघून गेले व या विभागाची जबाबदारी परब यांच्याकडे आली. त्यांनी या जुन्या तंत्राबरोबरच



*बी. विठ्ठल : 'पारदर्शक प्रेम', पंचधातु शिल्प, ९९ × १८ × १८ सें.मी., १९८४*



*प्रभाकर बर्वे : 'सात दगडांची कविता', तैल (इनॅमल),
१०७×९२ सें.मी., १९८४*



वसंत परब : ' अवकाश यान ', मुद्राचित्र, ३३ × ३९ सें.मी., १९७१



लिनोकट, वुडकट, वुडएन्ग्रेव्हिंग, सेरीग्राफ व लिथो यांच्यासाठी सामग्री जमवून हा विभाग अद्ययावत केला. तसेच पॅरिसमध्ये 'ॲटोलियर सेव्हनटीन' येथे ज्या 'इन्ताग्लिओ' तंत्राचा विशेष बोलबाला झाला होता ते तंत्र मोठ्या परिश्रमाने आत्मसात करून ते वरच्या विद्यार्थ्यांना शिकविण्यास सुरुवात केली. हे नवीन तंत्र वापरून केलेले त्यांचे 'स्पेस-शिप' हे चित्र विशेष गाजले. परब यांच्या हाताखाली या वर्गात शिकलेले पॉल कोळी, वामन चिंचोळकर, काशिनाथ साळवे, चेंदवणकर, पुजारे, ललिता लाजमी, चंदा जोगळेकर हे विद्यार्थी या क्षेत्रात पुढे आले. पॉल कोळी यांच्या देखरेखीखाली सध्या हा विभाग असून नुकतेच सुप्रसिद्ध हस्तमुद्रणकार कृष्णा रेड्डी यांच्या मार्गदर्शनाखाली महाराष्ट्रातील निवडक अध्यापकांचे शिबिर या विभागात घेतले गेले.

१९५६ साली राज्य पातळीवर सर्व दृक् कलांसाठी एकत्र प्रदर्शन भरवून उत्तम कलाकृतींना राज्य पुरस्कार देण्याची योजना सुरू झाली. यात बालकलाकारांपासून नामवंत कलाकारांपर्यंत सर्वांसाठी स्वतंत्र विभाग होते. हे प्रदर्शन 'बॉम्बे स्टेट आर्ट एक्झिबिशन' या नावाने ओळखले जाई. मुंबईच्या द्विभाषिक स्वरूपामुळे महाराष्ट्र व गुजराथमधील कलावंतांना यांत भाग घेता येत असे. या प्रदर्शनामुळे अधिकाधिक कलावंत या प्रदर्शनासाठी कलाकृती पाठवू लागले.

**कलाप्रशिक्षण व कलेद्वारा निर्मितीक्षम समाजजीवन**

प्रथम चित्रकला विषयाचा शालेय अभ्यासक्रमात समावेश झाला तो १८७९ मध्ये इंग्रजी अमदानीत आणि इंग्लंडच्या धर्तीवर. सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टच्या अखत्यारीत १८८७ साली शालेय स्तरासाठी चित्रकलेच्या प्रथम, द्वितीय व तृतीय अशा चढत्या क्रमाने परीक्षा सुरू करण्यात आल्या. पुढे त्यांचे सुसूत्रीकरण दोन परीक्षांतच करण्यात आले.

शालेय स्तरावर चित्रकला शिकवण्यासाठी प्रशिक्षित अशा कलाशिक्षकांची निकड भासल्याने १८८७ सालीच सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये कलाप्रशिक्षणाची सुरुवात झाली. नंतर त्याचा स्वतंत्र विभागही करण्यात आला.

१९६८ पर्यंत ह्या शिक्षणक्रमात सुधारणा होतच राहिली. त्यात हंसा मेहता शिक्षण समितीने १९४६ साली ह्या अभ्यासक्रमात शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र, पाठपद्धती, शालेय व्यवस्थापन ह्याबरोबरच रसग्रहण व आत्माविष्कार ह्या विषयांचाही समावेश केला. १९५० पर्यंत हा प्रशिक्षण वर्ग मुंबईतच असे. पुढे तो पुणे, धारवाड व अहमदाबाद येथेही सुरू झाला.

शालेय अभ्यासक्रमात चित्रकला हा विषय १९व्या शतकाच्या पूर्वकालापासून सक्तीचा होता तो १९७८ पर्यंत. त्यामुळे प्रशिक्षित कलाशिक्षकांची मागणी वाढत राहिली. त्यासाठी महाराष्ट्रात जवळजवळ तेरा कला महाविद्यालयांनी हा अभ्यासक्रम घेऊन कलाशिक्षक प्रशिक्षित करण्याची जबाबदारी स्वीकारली. चित्रकला ग्रेड परीक्षांना आज एक लाख पस्तीस हजार शालेय विद्यार्थी बसतात ह्यावरून शालेय स्तरावरील कलाशिक्षकांची कामगिरी लक्षात येईल. १९७० साली ह्या अभ्यासक्रमात पुन्हा मूलग्राही बदल झाले. त्यात प्रशिक्षणाची वाढती जबाबदारी व शालेय स्तरावरील विद्यार्थ्यांची वाढती गरज ह्यांची सांगड घालून Diploma in Art Education हा अभ्यासक्रम दोन वर्षांच्या कालावधीचा ठरविण्यात आला आहे.

बालचित्रकला ही आत्माविष्कारासाठी व चित्रपरीक्षा ही कला-कुसरीची गती मोजण्यासाठी. ही कोंडी फोडली ती साधना कुमार कलाविशेषांकाने. मुलांवर चांगले व सक्षम संस्कार करणाऱ्या साने गुरुजींनी सुरू केलेल्या साधना साप्ताहिकाने यदुनाथ थत्ते ह्यांच्या संपादनाखाली १९५८ पासून बालसाहित्याने व बालचित्रांनी नटलेला विशेषांक काढावयास सुरुवात केली तेव्हा मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण ह्यांनी मुलांसाठी निमशासकीय बक्षिसे ठेवून त्यास उत्तेजन दिले होते. त्यामुळे खेडचापाडचांतील मुलामुलींना मुक्ताविष्काराचे नवे व प्रभावी माध्यम महाराष्ट्रात उपलब्ध झाले.

समाजजीवनातील एकूण अनास्था, एकांगी दृष्टी व प्रतिगामी



किंवा गतकाळातील वृथाभिमानाची कास घालवण्यासाठी स्वतंत्र प्रज्ञा (Vision) आणि सृजनात्म प्रकृति (Creativity) कशी देता येईल, त्यासाठी कला माध्यमांचा चित्र, शिल्प, कथा, काव्य, नाट्य, संगीत, नृत्य व भाव ह्यांचा कसा वापर करता येईल, त्यातून नवा दृक्प्रत्यय (Visual Perception) कसा देता येईल व ह्यातून बहुगुणात्मक, संवेदनाशील, पृथगात्म व निर्मितीक्षम शक्ती आणि सर्वंकष दृष्टी कशी देता येईल ह्यासाठी चित्रकार यशवंत चौधरी ह्यांनी प्रयोगशील समाज विचारवंत, साहित्यिक, संगीतकार, नाटककार, नर्तक, मानसशास्त्रज्ञ, चित्रकार व शिल्पकार ह्यांच्या मदतीने १९६२ ते १९६५ पर्यंत बाल कलाशिबिरे घेऊन तरल प्रकृती बालकांबरोबर जे प्रयोग केले ते साधना कुमार अंकातून समाजापुढे व शिक्षणतज्ज्ञांपुढे ठेवले. सृजनात्म भावमनास मारक अशी चित्रस्पर्धाही थांबविली. त्यामुळे साधना कुमार कलाविशेषांकाने १९६३ पासून शेवटपर्यंत दिल्लीच्या शंकर्स वीकली विशेषांकाच्या पुढे खूप मोठी झेप घेतली होती.

ह्यासाठी उभारलेल्या बालबोधपीठ व आंतरभारती ह्या महाराष्ट्रातील समाजसेवी संघटनांनी हा सृजनात्म शिक्षण विचार बाल सृजन शिबिरे, बाल सृजन जत्रा, बाल मेळावे, बाल महोत्सव व बाल सृजन केंद्रे ह्या उपक्रमांनी भारतीय पातळीवर पाँडिचरीपासून दिल्लीपर्यंत पसरवून भारतीय समाजजीवनात रुजविला आहे. हे घडले ते इथे महाराष्ट्रात. मराठी मूलभूत विचारांची हीही एक अटकेपार मजल आहे.

**जाहिरात व जनसंवादासाठी कला**

औद्योगिक क्रांतीची लाट भारतात पसरू लागली तशी इंग्रजी अमदानीतच जाहिरात, जनसंपर्क व माहिती प्रसारण ह्या क्षेत्रांत कलावंतांची गरज वाढू लागली. त्यासाठी लागणाऱ्या तांत्रिक व इतर शास्त्रांची माहिती कलावंताला असणे आवश्यक होते. म्हणून प्रा. व्ही. एन्. आडारकर ह्यांच्या अधिपत्याखाली सुरू झालेल्या 'कमर्शियल आर्ट' ह्या विभागाची पुढे व्याप्ती वाढू लागली. स्वातंत्र्यानंतर पुढे त्या विभागाचे 'सर जे. जे. इन्स्टिट्यूट ऑफ





*बाल सृजन मेळावा : मुले चित्रे काढताना व मातीची शिल्पे करताना*




*'नवसमाज निर्मितीसाठी शिक्षण' : यशवंत चौधरी यांचे प्रभावी भित्तिचित्र*



अप्लाईड आर्ट ' ह्या स्वतंत्र शिक्षण संस्थेत रूपांतर झाले.

नवीन विषय व नवीन शिक्षक ह्यामुळे ह्या शिक्षणक्रमात फार बदल व सुधारणा होत राहिल्या. त्यांत प्रा. व्ही. एन्. आडारकर ह्यांचा व त्यांचा पहिला सहकारी वर्ग प्रा. पी. डी. अभ्यंकर, व्ही. एन्. रानडे, महाजन, धैर्यवान, काणे ह्यांचा मोठा वाटा आहे. त्यांच्यानंतर ज्या नव्या अध्यापकांनी त्यात भर टाकली त्यांना हरिभाऊ हणमंते, दामू केंकरे यांनी नेतृत्व दिले.

या काळात जाहिरात क्षेत्रातील ज्या मातब्बर व्यावसायिकांनी अभ्यासक्रमास विचारबळ दिले त्यात टाइम्स ऑफ इंडियाचे लँग हॅमर, दासगुप्ता, उमेशराव, सर्मा, वाघुलकर, मनोहर जोशी व इतर व्यावसायिकही होते. राज्य शासनाला माहिती प्रसारणासाठी लागणाऱ्या कलेतील गरजा ह्या संस्थेकडून भागविल्या जात. दिल्लीत भरणाऱ्या स्वातंत्र्य सोहळ्यातील चित्ररथ (Floats), हिमालय प्रदर्शन, भारत दर्शन प्रदर्शनापासून ते राष्ट्रीय एकात्मता, दारूबंदी, रक्तदान, हुंडा-विरोध, नेत्रदान, कुटुंबनियोजन इत्यादी समाजविषयक क्षेत्रांत कला विद्यार्थ्यांनी आपल्या कलादृष्टीची जेवढी भर घातली तेवढी व्यावसायिक क्षेत्रानेही टाकलेली नाही हा मुद्दा विशेष महत्त्वाचा मानावा लागेल.

केवळ ' व्यापारासाठी कला ' (Commercial Art) हा जुना गैरसमज ह्यामुळे दूर केला गेला व त्याचे जागी आता ' संवादासाठी कला ' (Communication Design) म्हणून ह्या कलेस स्थान मिळाले आहे.

ह्या संस्थेतून शिक्षण घेऊन अनेक व्यावसायिक कलावंत आज भारतभर पसरले असले तरी जाहिरात क्षेत्र एक उद्योग म्हणून वाढवण्यात त्यांचा वाटा मोठा आहे.

प्रसिद्ध कलावंत नागेन्द्र परमार, वसंत कुरे, हसनताज ह्यांच्या पिढीनंतर भारतीय मर्यादा ओलांडून आपापल्या विशेष क्षेत्रात आंतरराष्ट्रीय पातळीवर पारितोषिके व ख्याती मिळविणारे वरेच व्यावसायिक कलावंत आज दिसतात. त्यात ग्राफिक क्षेत्रात भाई पत्की व रॉबी डिसिल्वा, इंडस्ट्रियल डिझाइन (पॅकेजिंग व कॉर्पोरेट आयडेंटिटी) ह्या क्षेत्रात यशवंत चौधरी व प्रॉडक्ट



























*' स्त्री वंदनीय आहे ' हे दर्शविणाऱ्या जाहिरातीसाठी प्रभावी संकल्पन*

डिझाईन ह्यात सुधाकर नाडकर्णी, अक्षरलेखन कलेत र. कृ. जोशी, मेडिकल सिंबॉल क्षेत्रात एस्. एस्. साठे, अक्षरमुद्रण कलेत रमेश संझगिरी तसेच जाहिरात कलाक्षेत्रात अरुण कोल्हटकर, सुदर्शन धीर, पन्ना जैन व जाहिरात शास्त्र लेखनात डॉ. जी. एम्. रेगे ही नावे अग्रक्रमाने घेता येतील. ह्याच अभ्यासक्रमावर चाललेल्या पुणे, नागपूर, औरंगाबाद येथील शिक्षण संस्थांनीही अनेक व्यावसायिक कलावंत ह्या क्षेत्रात पाठवले. नव्या पिढीतील नव्या उमेदीने पुढे येणाऱ्यांत रवि परांजपे, श्याम जोशी, रघुवीर तळाशीलकर अरुण, काळे, विरू हिरेमठ, समीर खानझोडे, सुभाष अवचट ह्यांची गणना होईल. ही साखळी सारखी पुढे जात आहे.

उद्योगांची भरभराट, नवीन आव्हाने, नवे विषय, नवे तंत्रज्ञान ह्यामुळे ह्या कला शिक्षणाच्या व्याप्तीसाठी अनेकविध प्रयोग होत राहिले. व्यावसायिक क्षेत्रातील नव्या मातब्बरांनी – टी. एस्. मणि, मनु देसाई ह्यांनी त्यात वाटा उचलला. त्याचाही इष्ट परिणाम येथे दिसू लागला.

कलाविद्यार्थी अधिकाधिक सृजनक्षम करणे हा कलाशिक्षणाचा केंद्रबिंदू. जीवन, कलामूल्य व माध्यम ह्यांच्या संदर्भात तो निश्चित करणे ही काळाची गरज होती. संवेदनाची प्रकृती व सृजनाची प्रक्रिया ह्यांचे समृद्ध संकरण दृक्प्रत्ययात (Visual and Formal Perceptions) कसे करता येईल व संवेदनात्म, रूपगात्म, कलागुणात्म व सृजनात्म असे विविध पैलू द्विमिती, त्रिमिती व इतर माध्यमांतून कसे देता येतील ह्यासाठी चित्रकार व कलाशिक्षण तज्ज्ञ यशवंत चौधरी ह्यांनी १९६६–६७ व १९६७–६८ साली काही प्रयोग हाती घेतले. त्यांना यश येथेच मिळाले. केवळ अप्लाइड आर्टसाठीच नव्हे तर रेखाकला, शिल्पकला, वास्तुकला, वस्तुशिल्पकला आणि इतर सर्वच कलाक्षेत्रांपुढील नव्या आव्हानांसाठी आवश्यक असलेला पाया देण्याची ह्या प्रयोगसत्रांची क्षमता आंबेरकर समितीने ओळखली व स्वीकारली. तिने सुचविलेल्या सुधारित कलाशिक्षण अभ्यासक्रमात 'मूलग्राही शिक्षण-सत्र' म्हणून ती १९७० पासून राष्ट्रीय पातळीवर राबविली जात आहे.

*जाहिरातीसाठी छायाचित्रकलेचा परिणामकारक उपयोग : छायाचित्रकार मितर बेदी*






*माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने चौथ्या कृषि प्रदर्शनाकरिता तयार केलेले बोधचिन्ह : चित्रकार प्रकाश पाटील*




स्व. आबालाल रहमान यांची प्रसिद्ध कलाकृती : ' रानडुकराची शिकार '



ह्या अभ्यासक्रमात इतर विषयांचाही समावेश केला गेला त्यात अक्षरमुद्रणकला, इंटिरियर डेकोरेशन (सजावट), औद्योगिक छायाचित्रण हे विषय होते.

जाहिरात छायाचित्रणास आर्. आर्. प्रभु ह्यांनी सुरुवात केली. त्यास मितर बेदी ह्यांनी औद्योगिक छायाचित्रणाची जोड देऊन ही कला आंतरराष्ट्रीय पातळीवर उंच नेली. विलास भेंडे व मधु गडकरी ह्यांनी जाहिरात क्षेत्र आपल्या गुणांनी गाजवले तर सुरेश सेठ ह्यांनी दृक्‌श्राव्य माध्यमांनी.

औद्योगिक क्षेत्रातील कलाविषयक क्षितिजांची व्याप्ती वाढली. त्यात वास्तुशिल्प (इंडस्ट्रियल डिझाईन) अंगबळ धरू लागले. म्हणून पंचवीस वर्षांपूर्वी हा विषय ह्या संस्थेत शिकविला जावा हा आग्रह धरला होता. तो त्यांनी जर्मनीतून ह्या विषयाचे विशेष शिक्षण घेऊन आलेले सुधाकर नाडकर्णी ह्यांच्या सहाय्याने भारतीय औद्योगिक तंत्र संस्था (Indian Institute of Technology), मुंबई येथे सुरू केला. आज ती संस्था आपल्या शिक्षणगुणांनी जगभर वाखाणली जाते. भारतीय इंडस्ट्रियल डिझायनर्सचे अध्यक्ष यशवंत चौधरी व सुधाकर नाडकर्णी ह्यांच्या अभ्यासगटाने भारतीय स्तरावर 'भारतीय डिझाईन प्रतिष्ठान' स्थापण्यासाठी आपला अभ्यासपूर्ण अहवाल भारत सरकारला दिला आहे. भारत सरकार त्या दृष्टीने पाऊल उचलीत आहे. ह्या नव्या प्रतिष्ठानाच्या कार्याची दिशा व व्याप्ती भारतातील औद्योगिक क्षेत्राला एक महत्त्वपूर्ण व मूलग्राही पाया देणार आहे. अप्लाइड आर्टबरोबरच इंडस्ट्रियल डिझाईन हाही अभ्यासक्रम या संस्थेने घ्यावा यासाठी प्रयत्न चालू आहेत.

एकूण ह्या कलाक्षेत्राने ५० वर्षांच्या काळात फार मोठी झेप घेतली आहे व फार मोठी आव्हाने महाराष्ट्राच्या भूमीवर झेलली जाणार आहेत.

स्वातंत्र्योत्तर काळात व्ही. एस्. अडुरकर हे पहिले हिंदी डायरेक्टर जे. जे. स्कूल ऑफ आर्टवर आले. १९५७ साली जे. जे. स्कूल ऑफ आर्टची शंभरी मोठ्या दिमाखात साजरी झाली. १९५८ साली आर्किटेक्चर व उपयोजित कला (अप्लाइड आर्ट) हे विभाग जे. जे. स्कूल ऑफ आर्टपासून अलग होऊन त्यांच्या स्वतंत्र संस्था निर्माण झाल्या व त्यांची नावे अनुक्रमे 'सर जे. जे. कॉलेज ऑफ आर्किटेक्चर' व 'सर जे. जे. इन्स्टिटच्यूट ऑफ अप्लाइड आर्ट अशी ठेवली गेली व सर जे. जे. स्कूलमध्ये पेंटिंग, स्कल्पचर, टीचर्स ट्रेनिंग व आर्ट अँड क्राफ्ट्स असे चार विभाग झाले.

**१९६० नंतरचा कलाविकास**

१९६० साली महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली. यानंतर नव्या महाराष्ट्र सरकारकडून कलेच्या विकासाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे निर्णय घेतले गेले. पहिली गोष्ट म्हणजे राज्यपातळीवर भरणारे कलाप्रदर्शन महाराष्ट्रातील कलावंतांपुरते मर्यादित झाले. दुसरी महत्त्वपूर्ण गोष्ट म्हणजे कलाविषयक धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी १९६५ साली कला संचालनालयाची स्थापना होऊन व्ही. एन्. आडारकर यांची पहिले कला संचालक म्हणून नियुक्ती झाली. त्यांच्या कारकिर्दीत कलाशिक्षणाच्या दृष्टीने घेतलेला महत्त्वाचा निर्णय म्हणजे कलाशिक्षणाचा पुनर्विचार करण्यासाठी निर्माण झालेली व आंबेरकर कमिटी या नावाने ओळखली जाणारी 'आर्ट रिव्ह्यू कमिटी'. या कमिटीत व्ही. आर्. आंबेरकर, माधव सातवळेकर, व्ही. एन्. आडारकर, पी. ए. धोंड यांचा समावेश होता. या कमिटीने कलाशिक्षणाच्या बाबतीत महत्त्वाच्या शिफारशी केल्या. त्या अमलात आणण्याचे महत्त्वपूर्ण कार्य नंतरचे कला संचालक माधव सातवळेकर यांनी केले.

तसे पाहता १९६६-६७ सालीच अप्लाइड आर्ट ह्या संस्थेत संवेदनशील व सर्जनात्मक गुणांचा पाया सर्वच कलाशिक्षणात कसा आणता येईल ह्याचा महत्त्वपूर्ण प्रयोग यशवंत चौधरी ह्यांनी मनु देसाई, प्रा. हणमंते व देसाई ह्यांच्या मदतीने हाती घेतला होता. त्या प्रयोगातील निष्कर्ष आंबेरकर समितीला कलाशिक्षणाला नवीन वळण देण्यात सहाय्यभूत ठरले.

१९६९ मध्ये प्रा. गजानन भागवत व प्रा. ए. डी. देसाई



पैठण शैली ही महाराष्ट्राची चित्रशैली. पौराणिक कथा सांगताना ही चित्रे श्रोत्यांना दाखविली जात. सावंतवाडीजवळील पिंगुळी या खेड्यातील 'चित्रकथी' ही चित्रे अजूनही कथा सांगण्यासाठी वापरतात



यांच्या देखरेखीखाली जे. जे. स्कूल ऑफ आर्ट व इन्स्टिटयूट ऑफ अप्लाइड आर्ट येथे हा नवा मूलभूत अभ्यासक्रम सुरू केला व १९७० मध्ये सर्व महाराष्ट्रभर अंमलात आणला गेला. यासाठी निवडक कलाशिक्षकांसाठी उन्हाळ्याच्या सुटीत प्रशिक्षण शिबिरे घेतली गेली. या नवीन अभ्यासक्रमात कलेचा इतिहास, हस्तमुद्रित कलेची मूलतत्त्वे, द्विमित व त्रिमित संकल्पन, रेखाटन, रंग यांचाही समावेश होता. या नवीन अभ्यासक्रमाने कलाशिक्षणाला वेगळे वळण दिले. याखेरीज हायस्कूलमधील कलाशिक्षकांसाठीही अशी शिबिरे घेतली गेली. विद्यार्थ्यांसाठी कला संचालनालयाकडून १२ निवडक चित्रांचा संग्रह प्रसिद्ध केला. कलास्वादासाठी तीन व्याख्यानसत्रे घेतली गेली. त्यात निसीम एझिकेल, प्रा. पाटणकर व ज्ञानेश्वर नाडकर्णी ह्यांनी महत्त्वपूर्ण सहाय्य केले. यानंतर कला संचालक बाबुराव सडवेलकर ह्यांच्या मार्गदर्शनाने महाराष्ट्रातील पूर्वीच्या नामवंत चित्रकारांच्या चित्रांचे निवडक नमुने प्रसिद्ध केले, पारंपरिक कारागिरी करणाऱ्या सर्व प्रांतांतील कारागिरांची शिबिरे एकत्र भरविली व त्यांच्या काम करण्याच्या पद्धतीचा कलाविद्यार्थ्यांना परिचय करून दिला. तसेच लोककला व जुन्या भित्तिचित्रांचा अभ्यास व नकला करण्याची योजना राबविली जात आहे. तसेच नामवंत कलावंतांच्या कलाकृतींचे प्रदर्शन दिल्लीत भरवून महाराष्ट्राच्या कलेची माहिती परप्रांतीय रसिकांना करून देण्याचे कार्य केले जात आहे.

या काळातील कलाशिक्षणातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रा. हृणमंते व प्रा. शांतिनाथ आरवाडे हे अधिष्ठाता असताना १९८१ पासून अनुक्रमे सर जे. जे. इन्स्टिटयूट ऑफ अप्लाइड आर्ट व सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट ही मुंबई विद्यापीठाला जोडली जाऊन त्यांना महाविद्यालयाचा दर्जा प्राप्त झाला व तेथे पदवी अभ्यासक्रमाची सुरुवात उपयोजित कला, रेखा व रंगकला आणि शिल्पकला या विभागांत झाली असून लवकरच इतरही विभागांत ती सुरू होईल. याखेरीज कलाशिक्षणासाठी स्वतंत्र कला विद्यापीठ स्थापन करण्याचा स्वागतार्ह निर्णयही महाराष्ट्र सरकारने घोषित केला असून नजिकच्या काळात याविषयी





*गंजिफा : दशावतारांच्या व इतर पौराणिक कथा असलेल्या या गोल पत्त्यांच्या सहाय्याने पूर्वी खेळत असत. सावंतवाडीचे कारागीरच फक्त आता गंजिफा तयार करतात.*



पावले उचलली जातील असा रंग दिसतो.

विदर्भातील कलावंतांनी महाराष्ट्राच्या कलापरंपरेला साजेल असे कार्य केले आहे. यांत बापूसाहेब आठवले यांचा मोठा वाटा आहे. नागपूर स्कूल ऑफ आर्ट स्थापन करून त्यांनी विदर्भातील कलाशिक्षणाचा प्रारंभ केला. त्यांनी रझा, बी. प्रभा, भाऊ समर्थ, गोस्वामी, डिखोळे यांच्यासारखे कलावंत निर्माण केले. प्रा. वसंत परब यांनी नागपुरातील चित्रकला महाविद्यालयाचे अधिष्ठाता असताना नागपूरमध्ये काही कलात्मक कार्यक्रम योजले. १९७२ मध्ये सुप्रसिद्ध साहित्यिक ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या प्रेरणेने विदर्भ आर्ट सोसायटीची स्थापना त्यांनी केली. बापूसाहेब आठवले या संस्थेचे बरीच वर्षे अध्यक्ष होते. ही संस्था नियमितपणे भारतीय स्तरावरील प्रदर्शने आयोजित करते. शांतिनिकेतन येथे विद्यादान करून नागपुरात स्थायिक झालेल्या सुप्रसिद्ध चित्रकार विनायक मसोजी यांच्या नावे नागपूर महापालिकेने १९८० मध्ये यशवंत स्टेडियम येथे आर्ट गॅलरी निर्माण केली व तिचे संचालन विदर्भ आर्ट सोसायटीकडे दिले. १९७५ साली नागपूर येथे संपन्न झालेल्या पहिल्या विश्व हिंदी संमेलनाच्या वेळी भारताचा सांस्कृतिक इतिहास चित्रित करणारे भव्य प्रदर्शन योजिले गेले. याचे संयोजन प्रा. वसंत परब यांनी केले. तसेच आमदार निवासावर विदर्भ, मराठवाडा, पश्चिम महाराष्ट्र, कोंकण या महाराष्ट्राच्या विभागांचे वैशिष्टचपूर्ण चित्रण असणारे एक भव्य सिरॅमिक भित्तिचित्र प्रा. वसंत परब यांच्या मार्गदर्शनाखाली चित्रकला महाविद्यालयाच्या प्राध्यापकांनी (वर्मा, भिंगारदिवे, बोरसे व साऊरकर यांनी) तयार केले. महाराष्ट्रात कलेचा पदवी अभ्यासक्रम प्रथम नागपूर येथे सुरू झाला. आज तेथे नागपूर विद्यापीठातर्फे पदव्युत्तर अभ्यासक्रमाची सोय झाली आहे. प्रा. परब अधिष्ठाता असताना औरंगाबाद कला विद्यालयही मराठवाडा विद्यापीठास जोडले जाऊन तेथे पदवी अभ्यासक्रम १९८१ मध्ये सुरू झाला.

महाराष्ट्रातील कलावंतही आज कलाजगतात आघाडीवर आहेत. बॉम्बे ग्रुपनंतर आलेल्या कलाकारांत जहांगीर साबावाला, बद्रीनारायण, अकबर पदमसी, तय्यब मेहता हे चित्रकार व कै. ए. एम्. दाविएरवाला, पिलू पोचखानवाला यांनी भारतातच नव्हे तर परदेशांतही नाव मिळविले. याखेरीज मन्साराम, नलिनी मलानी, पटवर्धन, आडिवरेकर, वाघेला, प्रभाकर बर्वे, हरीश राऊत, रायबा, कोलते हे चित्रकार व सोनवडेकर, बी. विठ्ठल, रवींद्र मेस्त्री हे शिल्पकार आघाडीवर आहेत. महिला चित्रकारात अंबिका धुरंधर, प्रेमा पाठारे, बी. प्रभा, प्रफुल्ला डहाणूकर यांचा उल्लेख आवश्यक आहे.

याखेरीज पारंपरिक कारागिरीच्या कला व लोककला यांना उत्तेजन देण्याच्या महाराष्ट्र सरकारच्या धोरणानुसार सावंतवाडीच्या लाकडी वस्तू तयार करण्याचा उद्योग व पैठणीचे उत्पादन शिस्तबद्ध करण्यासाठी शासनाने अनुदान देऊन कारागिरांना प्रोत्साहन दिले आहे. वारली कलाकारांची चित्रे सरकारी संग्रहासाठी खरेदी करून त्यांच्या चित्रांचे प्रदर्शनही भरविले. आणखी एक स्वागतार्ह घटना म्हणजे दिल्लीच्या सुप्रसिद्ध ' नॅशनल गॅलरी ऑफ मॉडर्न आर्ट ' या संग्रहालयाची शाखा मुंबईत सुरू करण्यासाठी मुंबईच्या कावसजी जहांगीर हॉलचे हस्तांतर शासनाचे मुख्य सचिव श्री. राम प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली नुकतेच संपन्न झाले. या संग्रहालयासाठी महाराष्ट्रातील नामवंत कलाकारांच्या कलाकृतींचा संग्रह करण्याचे काम चालू आहे.

*राष्ट्रपति सुवर्णपदक विजेता वारली चित्रकार जिव्या सोमा भिंतीवर चित्र रंगवताना*

# महाराष्ट्राची हातमाग परंपरा

**रमेश औंधकर**

भारत जगाच्या पाठीवर त्याच्या परंपरागत हस्तकौशल्यासाठी, त्यातल्या त्यात हातमाग विणकलेसाठी, फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. आजही जगाच्या बाजारपेठेत भारतीय हातमाग वस्त्रांना जबरदस्त मागणी आहे. हातमाग विणकलेत भारतातील प्रत्येक शहराचे व प्रांताचे वेगळे असे वैशिष्टच आहे.

महाराष्ट्राचाही या हातमाग विणकलेत स्वतःचा असा स्वतंत्र ठसा जनमानसावर आहे. महाराष्ट्राच्या निरनिराळया शहरांतून विणल्या जाणाऱ्या वस्त्रांना त्या त्या शहरांची नावे प्राप्त झाली आहेत. जसे पैठणची पैठणी, उमरेडची करवतकाठी, नारायणगावची नारायणपेठी, नागपुरी रास्म, राजापुरी पंचे, पंढरपुरी घोंगडी इत्यादी. या सर्व वस्त्रांमध्ये पैठणीचा डौल काही वेगळाच ! त्यामुळेच तिला प्राचीन काळापासून अमाप प्रसिद्धी मिळालेली आहे. पैठणीचे सर्व नक्षीकाम हातांनीच, इतर कोणत्याही यांत्रिक मदतीशिवाय केले जाते. त्यामुळेच एक साधारण पैठणी विणायला दोनएक महिने वेळ सहज लागतो, तर अद्वितीय पैठणीसाठी वर्षभराचा काळही अपुरा पडेल. आधुनिक कालमानानुसार ग्राहकांच्या आवडीनिवडी बदलल्यामुळे आणि परदेशी वस्त्रांचे आकर्षण वाढल्यामुळे गेल्या काही दशकांपासून पैठणीला वाईट दिवस सुरू झाले. पण महाराष्ट्र सरकारच्या लघुउद्योग विकास महामंडळाने सध्या या पैठणीचे पुनरुज्जीवन हाती घेतल्याने पैठणीला पूर्वीची नसली तरी काही अंशी बरी अवस्था प्राप्त होण्याची शक्यता वाढली आहे. या महामंडळाने पैठणमध्ये पैठणीच्या विकासासाठी एक स्वतंत्र प्रकल्प उभारला असून त्या प्रकल्पांतर्गत पैठणी विणण्याचे प्रशिक्षण, पैठणी विणण्याची प्रात्यक्षिके, पैठणीचा प्रचार व विक्री असे सर्वांगीण विकासाचे प्रयत्न चालू केले आहेत. गेल्या फेब्रुवारीत (१९८५) महामंडळाने जागतिक व्यापार केंद्रात भरविलेल्या पैठणींच्या प्रदर्शन व प्रात्यक्षिक शिबिरास ग्राहकांनी प्रचंड प्रतिसाद दिला आणि असंख्य पैठणींसाठी आपल्या मागण्या नोंदविल्या.

पैठणीचा इतिहास व तिच्या नावाची उत्पत्ती रंजक आहे. पैठणी हे नाव पैठण या शहरावरून या वस्त्राला मिळाले पण पैठण हे प्रतिष्ठान या मूळ नावाचे अपभ्रंशित रूप आहे. प्रनिष्ठान या अतिप्राचीन (३००–२०० खिरस्तपूर्व) व त्या काळात वैभवाने नटलेल्या व भरभराटीस आलेल्या, गोदावरी तीरी वसलेल्या शहराने पैठणीला जन्म दिला, वाढवले व नावारूपाला आणले. पूर्वीच्या काळची पैठणी आणि आताची पैठणी यात कालपरत्वे अनेक बदल झाले. पूर्वीच्या पैठणीच्या किनारीवर पदराप्रमाणेच हातांनी विणलेली नक्षी असायची. आताच्या पैठणीत ही जागा यांत्रिक मदतीने विणल्या जाणाऱ्या नक्षीने घेतली आहे. याकरिता इंदूरच्या फरसपेठी किनारीचा उपयोग प्रामुख्याने केलेला आढळतो. थोडक्यात सध्याचे पैठणीचे स्वरूप संकरित आहे. पैठणीच्या पदरावरील व किनारीवरील नक्षीकरिता अनेक नैसर्गिक आकार प्रामुख्याने वापरलेले आढळतात. त्यांत पाने, फुले, पक्षी व प्राणी यांचा समावेश आहे. क्वचितप्रसंगी मानवी आकार पूर्वीच्या काळच्या पैठणीत कृष्णलीला या विषयानुसार वापरलेले आढळतात. कारण पैठणीचे बहुतेक विणकर कृष्णभक्त होते. नक्षीतील नैसर्गिक आकारांवर अजिंठा येथील भित्तिचित्रांचा स्पष्ट प्रभाव जाणवतो. या परंपरागत नक्षीची नावे त्या त्या फुलावरून अथवा पक्ष्यावरून पडलेली आहेत. जसे रुईफूल, कोयरीवेल, अनारवेल, आसवली, बांगडी मोर, तोता मैना, हुमा परींदा आणि बेहस्ती परींदा (स्वर्गीय पक्षी).

*पैठणी हे महाराष्ट्राचे खास वैशिष्टच आहे. भरजरी, बुट्टेदार पैठणीचा नमुना*



पैठणी विणणारा निष्णात कारागीर काम करीत असताना

पैठणीच्या किनारीचा व पदराचा रंग नेहमीच अतिशय आकर्षक व विरोधी रंगसंगतीचा उपयोग करून ठेवला जातो. या रंगसंगतीची परंपरागत नावे मनोरंजक आहेत. जसे काळी चंद्रकळा (काळा), उडदानी (करडा), पोफळी (पित्रळा), निळी गुंजी (निळा), मोरपंखी (हिरवा व निळा यांचे मिश्रण), फिरोझा (पांढरा, लाल व पिवळसर हिरव्याचे मिश्रण). साधारणपणे पूर्वी पैठणी ही रेशमाचीच विणली जात असे. पण नंतर सुती पैठण्याही विणल्या गेल्या. पूर्वी फक्त सोन्याची व चांदीची खरी जर नक्षीकरिता वापरली जात असे. हल्ली मात्र ही जर तकलादू असते. किनारीवरील व पदरावरील नक्षी विणण्याकरिता लहान लहान तिल्यांचा वापर केला जातो. रंगसंगती व नक्षीप्रमाणे या तिल्यांची संख्या एका किनारीसाठी ५ ते १५ व पदरासाठी १०० ते ४०० पर्यंत असू शकते.

पैठणीनंतर औरंगाबादच्या हिमरू वस्त्रांचा क्रमांक परंपरागततेच्या, कलाकुसरीच्या व आकर्षकतेच्या कसोटीवर इतर वस्त्रांपेक्षा बराच वरचा लागतो. पैठणी हे वस्त्र स्त्रीचे अंगवस्त्र आहे तर हिमरू हे पुरुषांनी वापरावयाचे वस्त्र आहे. मोगलांच्या अमदानीत शेरवानीकरिता व जाकिटांकरिता फक्त हिमरू हे वस्त्रच त्यांच्या राजदरबारातील सरदार व दरकदारांनी वापरले. मोगलांनंतर हैद्राबादच्या निजामांनी हिमरू या वस्त्रकलेला राजाश्रय दिला.

हिमरू हे वस्त्र सुती आणि रेशमी धाग्यांचे सुंदर मिश्रण आहे. यात ताण्यासाठी (उभे धागे) रेशमांचा वापर केला जातो तर बाण्यासाठी (आडवे धागे) सुती धाग्यांचा वापर केला जातो. नक्षीला उठावही पूर्णपणे आडव्या धाग्यांमुळे येतो. नक्षीमध्ये फुले, वेली, पाने, कळचा या आकारांचा उपयोग सहज पण आकर्षक रीत्या केलेला पहावयास मिळतो. हल्ली हे हिमरू वस्त्र येवला या गावी विणले जाते परंतु त्यातून जुन्या काळातील हिमरू वस्त्राची गोडी व श्रीमंती काळानुसार गायब झालेली आहे. पूर्वीच्या काळी शुद्ध रेशीम, खरी जर यांचा मुक्त वापर केलेला असे.



दिल्लीतील राष्ट्रपति भवनातील एक दिवाणखाना पूर्णपणे हिमरू वस्त्रांनीच सजविलेला आहे.

हिमरू खालोखाल नागपूर जिल्ह्यातील उमरेड गावच्या करवतीकाठी साडी व उपरण्यांचा क्रमांक लावावा लागेल, तो त्यांच्या विशिष्ट प्रकारच्या किनारीवरील विणीमुळे. किनारीचा धागा व साडीच्या मधल्या भागाचा धागा यांना एकमेकात अडकवून करवतीच्या दातरीसारखी नक्षी तयार केली जाते व त्यामुळेच या वस्त्रप्रकारात ठाशीव व आकर्षक लाल रंगाची किनार व साडीचा मधला भाग शुभ्र ठेवण्यात कारागीर यशस्वी होतो. साडीची किनार लाल अथवा लाल रंगाच्या गडद वा फिकट छटा वापरूनच केलेली असते. किनारीवर वापरल्या जाणाऱ्या नक्षीची नावे पारंपरिक व मनोरंजक आहेत. गोमी, बुगडी, रुद्राक्ष, रुईफूल, तुळशी, ठीकरी इत्यादी. या साडीच्या पदरांचे कर्नाटकातील इरकलीच्या टोप पदराशी बरेचसे साधर्म्य आहे.

या करवती साडीच्या क्लिष्ट व वेळखाऊ विणीमुळे या साडीचे उत्पादन जवळजवळ थांबले आहे. उमरेड गावात आता फक्त एक किंवा दोन मागांवर विणकाम होते, तेही फक्त उपरण्यांचेच. त्यांचा उपयोग फक्त घरगुती देवादिकांच्या वस्त्रप्रावरणासाठी केला जातो. प्रस्तुत लेखकाने विणकर सेवा केंद्रात नोकरी करीत असताना केंद्राच्या धोरणाप्रमाणे या करवतीकाठी साडीच्या पुनरुज्जीवनासाठी अनेक प्रयत्न केले. या बाबतीत मुंबईच्या विणकर सेवा केंद्राचे निर्देशक श्री. राम केवटे यांचे प्रयत्नही उल्लेखनीय आहेत. त्यांच्या प्रयत्नांमुळेच करवतीकाठी साडी काहीशा भ्रष्ट स्वरूपात का होईना सध्या उत्पादित केली जात आहे.

महाराष्ट्र-कर्नाटक सीमेवर व महाराष्ट्रातही खण हा प्रकार खड्यातील स्त्रियांमध्ये लोकप्रिय वस्त्रप्रकार आहे. शहरातील आधुनिक तरुणींमध्येही खण वापरण्याची आवड अधूनमधून पहावयास मिळते. त्याला कारण खणाची विशिष्ट रंगसंगती व त्यावरील परंपरागत समृद्ध नक्षी हे होय.



पैठणीचा काठ असा आकार घेत जातो



पैठणीचे विणकाम सुरू असताना ती अशी दिसते



चोळखण हा प्रकार सीमा भागातील सोलापूर जिल्ह्यातील मैंदरगी या गावी सध्या मोठ्या प्रमाणात विणला जातो. या वस्त्रप्रकारात किनारीवर करवती साडीप्रमाणेच नक्षी असते व तीच नक्षी मधल्या भागातही सगळीकडे विरोधी रंगसंगतीत विणलेली असते. चोळखणाची किनार ही लाल रंगाचीच पहावयास मिळते. फक्त लाल रंगाच्या गडद व फिकेपणात फरक झालेला आढळतो. खणाच्या मधल्या भागासाठीही गडद रंगच लोकप्रिय आहेत. त्यात गडद निळा, गडद हिरवा, काळा, गडद लाल इत्यादींचा समावेश आहे. नक्षी नेहमीच फिकट पिवळा, निळा व पांढऱ्या रंगाची असते. खण हा वस्त्रप्रकार आहे त्यापेक्षा आणखी लोकप्रियही होऊ शकतो.

साडी हा प्रकार महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागात थोड्याफार बदलाने विणला जातो. त्यातल्या त्यात सोलापूरचा विणकर हा आधुनिक आवडीनिवडींचे धोरण समोर ठेवून नेहमीच साडीच्या रंगसंगती, आराखडे व नक्षी यामध्ये बदल करणारा, नवीन तंत्रांना आत्मसात करणारा आहे, त्यामुळे सोलापूर साडीत नेहमीच नाविन्य पहावयास मिळते. तोच प्रकार सोलापूर चादरीच्या बाबतीतही आहे. सोलापूर चादरीला तशी जुनी किंवा थोर परंपरा नाही. गेल्या तीन दशकात सोलापूर चादर नावारूपास आली आहे. सोलापूर चादरीवरील नक्षी सर्वसमावेशक आहे, भौमितिक आकारांपासून ते अलंकारिक आकारांपर्यंत सर्व प्रकारचे आकार हे सोलापूर विणकर चादरीकरिता मुक्त हस्ताने वापरतात. त्यामुळेच सोलापूर चादरीची मोठ्या प्रमाणात निर्यातही होत आहे. याशिवायही इतर अनेक वस्त्र प्रकार महाराष्ट्रातील निरनिराळ्या भागात विणले जातात. त्यात पंढरपूरची घोंगडी, अचलपूरची सतरंजी व नेवार पट्टी यांचा समावेश आहे. सहकारी चळवळ या क्षेत्रातही असल्यामुळे काही सोसायट्या पॉलिएस्टर वस्त्रेही विणतात तसेच टॉवेल्स व इतर पोशाखाकरिता लागणारे कापडही आता उत्पादित केले जात आहे.



परदेशातही लोकप्रिय झालेली वारली चित्रकला

# महाराष्ट्र संगीत

**अशोक दा. रानडे**

कोणत्याही विकसित समाजात मुख्यत: चार प्रकारचा संगीत व्यवहार होत असतो आणि यानुसार संगीत चार कोटींचे असते. कला संगीत (वा शास्त्रोक्त संगीत), जनप्रिय संगीत, लोकसंगीत आणि आदिम संगीत. पैकी कला संगीत आणि लोकसंगीत यांचा आढावा संक्षेपाने घ्यावयाचा आहे.

**महाराष्ट्र : कोणता व केव्हापासून**

विशिष्ट प्रादेशिक संस्कृतीच्या जडणघडणीचा मागोवा घ्यायचा म्हटले की जाणवणारी पहिली अडचण म्हणजे संबंधित प्रदेशाच्या सीमारेषांची निश्चिती साधणे. विचारात घेण्याचा कालखंड जितका दीर्घ तितक्या सीमारेषा वारंवार बदललेल्या आढळतात. वांशिक निकष लावावयाचा म्हटले तर नैसर्गिक उत्पात, राजकीय घडामोडी इत्यादींमुळे लोकसमूह येत-जात राहिल्याचे आढळून येते. याशिवाय इतिहासपूर्व काळापर्यंत धाव घेतली तर बहुतेक वेळा खुद्द भूखंडाच्या आकारमानात बदल झालेला दिसतो. महाराष्ट्र म्हणजे कोणता निश्चित भूप्रदेश हा प्रश्न कल्पनेहून अधिक त्रासदायक ठरू शकतो. अशा परिस्थितीत आजच्या सीमारेषा आणि त्यामुळे सिद्ध झालेले भौगोलिक मानचित्र समोर ठेवून विचार पुढे नेणे सोयीचे ठरते. नाहीतरी सांस्कृतिक बाबतीत प्रादेशिक सीमा ओलांडूनच व्यवहार सिद्ध होत असतो. तेव्हा काटेकोरपणे आखलेल्या सीमारेषांचे वास्तव, विवेचनाला माफक आधार पुरविण्यापुरते वापरावे हेच खरे.

प्रदेशमर्यादांच्या निश्चितीइतकीच महत्त्वाची दुसरी अडचण म्हणजे कालमर्यादा निश्चित करण्याची. आपण महाराष्ट्र आहोत असे महाराष्ट्राला नेमक्या कोणत्या कालापासून वाटू लागले ? या प्रश्नास ठामपणे उत्तर देणे अवघड आहे. प्रादेशिक अस्मिता काही एकदम निर्माण होत नाही. अनेकांगी आणि दीर्घकालीन प्रक्रियांचे प्रादेशिक अस्मिता हे एक फलित होय आणि ते नजरेत भरण्याइतपत ठळक व्हायला बराच काळ लोटावा लागतो. भाषा, प्रादेशिकता, कला, धर्म, सामाजिकता इत्यादी अनेक अंगांच्या घटनेत एक वेळ अशी येते की या सर्वांचे मिळून एकसंध एकक तयार झाले आहे अशी प्रतीति येऊ लागते. महाराष्ट्रापुरते पहायचे तर अशी घटना इ.स. १००० च्या आगेमागे झाली असावी असे धरून चालायला हरकत नाही. अशा प्रकारे प्रादेशिक आणि कालिक मर्यादांची चौकट तयार झाल्यावर सिद्ध होणाऱ्या महाराष्ट्रात संगीताचा वापर व वावर कसा होत आला ते पाहणे सुलभ आहे.

**थोडसे ऐतिहासिक**

फारशा प्राचीन भूतकाळात बुडी न मारण्याचे ठरविले तरीसुद्धा महाराष्ट्राच्या संदर्भात 'गाथा सप्तशती' या हाल राजाच्या वाङ्मयकृतीकडे लक्ष देऊन ऐतिहासिक दृष्टिक्षेप टाकणे उपकारक ठरेल. मराठी भाषेचे पूर्वरूप म्हणता येईल अशा अपभ्रंश भाषेत या गाथा असून इ.स. १५० च्या आगेमागे महाराष्ट्रातले सामान्य जनजीवन कसे होते याची कल्पना सप्तशतीमध्ये संकलित झालेल्या गाथांवरून येऊ शकते.

आपल्या विषयापुरते बोलावयाचे तर असे आढळते की, तत्कालीन महाराष्ट्रात दुंदुभी, मृदंग, नगारा, वीणा, बासरी इत्यादी वाद्ये प्रचारात होती. व्यावसायिक म्हणून गायन-वादन-नर्तन करणाऱ्यांचे समूह अस्तित्वात होते. भरघोस पिके आल्यावर शेतकरी 'भलरी' गीतसदृश गीतांच्या लकेरी घेत होता आणि पत्नी गात असता पतीने साथ पुरवावी इतपत स्थान संगीताला

*महाराष्ट्राचे एक थोर गायक पं. विष्णु दिगंबर पलुस्कर*



दांपत्यजीवनात होते. महत्त्वाचे निष्कर्ष असे की, नागर आणि ग्रामीण म्हणून वर्णन करता येतील असे निरनिराळे संगीतप्रवाह तत्कालीन संस्कृतीत वाहते होते, शिवाय हौशी आणि व्यावसायिक अशा दोन्ही पातळ्यांवर संगीत व्यवहार आकाराला येत होता. संस्कृतिशास्त्राचे एक महत्त्वाचे सूत्र असे की, एकूण संगीत व्यवहाराची समृद्धता संगीतकोटींच्या विविधतेवर अवलंबून असते. तेव्हा संगीतकोटी विविध व प्रयोगकर्ते विपुल आहेत असे आढळले तर सांगीतिकदृष्टचा संस्कृती संपन्न असल्याचा निष्कर्ष काढणे अतिशयोक्तीचे ठरत नाही. गाथा सप्तशतीच्या काळी संगीताची भरभराट होती असे विधान म्हणूनच करता येते.

महाराष्ट्रातल्या संगीतजीवनावर प्रकाश टाकणारा यानंतरचा ग्रांथिक पुरावा गाथासप्तशतीनंतर जवळजवळ १२ व्या शतकापर्यंत मिळत नाही. पण निराळ्या प्रकारचा आणि भक्कम असा आधार लाभतो तो अजंठ्याची भित्तीचित्रे आणि वेरूळची लेणी यांमधून. भित्तीचित्रांचा कालखंड ख्रिस्तपूर्व २०० ते इ.स. ७०० असा मानला जातो तर वेरूळच्या लेण्यांना आपले रूप लाभले इ.स. ४०० ते इ.स. १२०० च्या दरम्यान. मुद्दा असा की, दोहोंच्या संयुक्त आधाराने इ.स. १२०० पर्यंतच्या महाराष्ट्रीय संगीत





जीवनाविषयी विश्वसनीय अंदाज बांधायला हरकत नाही.

वाद्यांपैकी शंख, तुतारी, ढोलक, उभे पटह ही वाद्ये वारंवार आढळतात. पण अधिक महत्त्वाची बाब म्हणजे वाद्यांच्या वापराचे (म्हणजेच संगीताच्या वापराचे) प्रसंग जास्त विविध असतात. उदाहरणार्थ स्तुपाकडे मिरवणुकीने जाणारा भक्तसमूह, समारंभपूर्वक दान करणारा राजा, राज्याभिषेक, भटक्या गायकांचा प्रयोग यांसारखे प्रसंग संगीताविष्कारास पुरेसे निमित्त ठरतात. अजंठा-वेरूळ आकाराला येताना कलाकारांवर धार्मिक प्रेरणांचे नियंत्रण होते आणि या प्रकारच्या नियंत्रणामुळे आशय, विषय इत्यादींवर बऱ्याच मर्यादा पडत असतात हे लक्षात घेता चित्रित-शिल्पित झाले आहे त्यापेक्षा तत्कालीन संगीतजीवन बरेच अधिक विविध व व्यापक असणार हे उघड आहे.

यादवपूर्व म्हणून ज्याचे वर्णन करता येईल अशा यानंतरच्या कालखंडात राजा सोमेश्वराने रचलेल्या मानसोल्लास वा अभिलषितार्थ चिंतामणी (इ. ११२९-३१) हा कोशात्मक ग्रंथ उपयुक्त ठरतो. वादन तंत्रांचे तपशील, 'देशी' संगीतांचे संदर्भ, भरतादि पूर्वाचार्यांच्या अधिकारी विवेचनाचा ठाम निर्वाळा, अनेक संगीतप्रकारांचा निर्देश वगैरेवरून असे ध्यानात येते की ह्या काळची महाराष्ट्रातली संगीत परंपरा बरीच व्यापक आणि गुंतागुंतीची झाली होती. विशेष महत्त्वपूर्ण बाब अशी की परंपरा चालत आलेल्या शास्त्रोक्त संगीताइतक्याच अनेक 'देशी' संगीतधारा प्रभावी ठरू लागल्यामुळे एक प्रमाण भाषा व अनेक बोली या प्रकारचे चित्र झपाट्याने बदलू लागले होते. आज प्रतीत होणाऱ्या "दोन शास्त्रोक्त संगीताच्या पद्धती, अनेक देशी संगीत परंपरा" या रंगरूपाची आरंभिक अवस्था १२ व्या शतकापासून प्रतीत होऊ लागली.

मानसोल्लासानंतर सुमारे शंभर वर्षांनी यादव राजाच्या पदरी करणाधिप या उच्च पदावर असलेल्या शार्ङ्गदेवाने संगीत रत्नाकर हा मानग्रंथ लिहिला. स्वतःचे वर्णन 'निःशंक शार्ङ्गदेव' असे करणाऱ्या ग्रंथकाराने मानसोल्लासात आढळणाऱ्या बहुतेक प्रवृत्तींना ठामपणे व सूक्ष्मविस्तृत पद्धतीने नोंदवावे याचे नवल वाटायला





नको. अतिशय बोलकी घटना ही की आज हिंदुस्थानी व दाक्षिणात्य अशा दोन्ही पद्धतीचे पारंपरिक उपासक रत्नाकराचा प्रमाणमान ग्रंथ म्हणून उल्लेख करतात. दोन्ही पद्धतींना आपला वाटावा अशा स्वरूपाचा हा शेवटचा ग्रंथ असावा. कारण संस्कृति-संघर्ष संगीत बदलून टाकण्याइतका तीव्र होत होता, प्रादेशिक आवाज जोरदारपणे उमटत होते —भारताचा सांस्कृतिक नकाशा आमूलाग्र बदलणार असल्याच्या खुणा सर्वत्र दिसत होत्या. म्हणूनच 'पूर्व प्रसिद्ध' व 'अधुना प्रसिद्ध' असे स्पष्ट संगीतभेद शार्ङ्गदेव नोंदवत होता; कोकण, महाराष्ट्र-गुर्जरी इत्यादी प्रादेशिक निर्देश होत होते; ओवी, धवल (ढवळे), गाथा यांसारख्या खास मराठी छंदांचे रूपवर्णन करण्यात येत होते. आपला चेहरा-मोहरा बदलून टाकणाऱ्या महाराष्ट्राने बदलाचा स्पष्ट इशारा दिला होता —संगीतातून त्याची जागरूक दखल शार्ङ्गदेवाने घेतली होती.





शार्ङ्गदेवानंतर शंभरावर वर्षांनी हिंदुस्थानी संगीतक्षितिजावर एक धूमकेतूसारखे वादग्रस्त व्यक्तिमत्व उगवले—हजरत अमीर खुसरौ याचे (१२५३-१३२५). भारतीय संगीतात आमूलाग्र बदल केला इथपासून ते त्याने केवळ आहे त्यावर हुषार बदलाचा ठसा उमटविला इथपर्यंत सर्व प्रकारच्या भूमिका त्याच्या कार्याविषयी घेतल्या जातात. परंतु त्याला बाजूला ठेवूनही महाराष्ट्राचे तत्कालीन संगीतजीवन तपासणे शक्य आहे. पं. दामोदर (मृत्यू १२७८) हा महानुभावी संत व आद्य वारकरी संत नामदेव (इ. स. १२७०-१३५०) या दोघांची साक्ष या संदर्भात पुरेशी ठरते. दामोदर पंडित स्वत: प्रभावी कलाकार असून त्याच्या साठ चौपद्या कल्याण, रामकली इ. रागात होत्या अशी माहिती मिळते. संत नामदेवाचे देशभ्रमण आणि शिखांच्या ग्रंथसाहेबात, पवित्र धर्मग्रंथात समाविष्ट झालेल्या रचनांचे (६१ रचना १२ रागात) रूप पाहता महाराष्ट्राने आपले वजन उत्तरी अंगाने वाहणाऱ्या संगीत परंपरेच्या प्रवाहात टाकले होते असे म्हणता येते.

या घटनेकडे काहीसे बारकाईने पाहिले पाहिजे. उत्तर-दक्षिण अक्षावर पाहिल्यास महाराष्ट्र हे मध्यराष्ट्र असल्याचे सहज ध्यानात येईल. बहुधा त्यामुळे असावे पण उत्तरेकडून येणाऱ्या नव्या संस्कृतीचे आक्रमक वा प्रसारक अनेकदा महाराष्ट्रापर्यंत पोचले आणि तिथेच थांबले. नवव्या शतकापासून येणारे सूफी धर्मप्रचारक असोत वा तेराव्या शतकापासून पुढे निकराने सरसावणारे इस्लामचे अनुयायी असोत ते महाराष्ट्रात स्थिरावले. याशिवाय खिलजी, तुघलक आणि दख्खनी बहामनींच्या कडव्या कारभाराला तीव्र हिंदू जबाब म्हणून उभे ठाकणारे विजयनगरचे राज्य (१३३०) हे महाराष्ट्राच्या दक्षिणेस उभे राहिले हेही ध्यानात घेण्यासारखे. मुद्दा असा की उत्तरेस निखालस मुस्लिम प्रभाव तर दक्षिणेस नि:संदिग्ध हिंदू प्रवृत्तीचा तळ असे ध्रुवीकरण मध्ययुगीन भारतात झाल्याकारणाने महाराष्ट्राचे सांगीतिक स्वरूप संमिश्र राहिले. पण त्याने झुकते माप टाकले ते मात्र (निदान कला संगीतात) उत्तरी वळणाच्या संगीतात. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर असे म्हणता येईल की महाराष्ट्र हिंदुस्थानात मोडू लागला. म्हणूनच सोळाव्या शतकातल्या 'पासोडी' प्रसिद्ध दासोपंतांच्या (१५५१-१६१५) गीतांवर जी रागनामे दिसतात त्यात हुसेनी, काफी अशी इतकेच नव्हे तर मारू व गौड या रागांच्या संदर्भावर दासोपंत या रागांचा प्रचार कुठे आहे हे सांगताना स्पष्ट उल्लेख करतात 'दक्षिण साला'!

थोडेसे मागे जाऊन मध्ययुगीन लोकसंगीताकडे ध्यान द्यायला हवे. या संदर्भात वारकरी पंथाच्या कामगिरीने लक्ष वेधले जाणे अपरिहार्य आहे. भारतभर फोफावलेल्या भक्तीपंथीय चळवळीचे हे एक अंग आहे आणि म्हणूनच वारकरी पंथाने संगीताचा मुबलक वापर केल्याचे नवल मानायला नको. संत नामदेवाने रूढ केलेल्या कीर्तन व भजनाची परंपरा दृढमूल होत होत सोळाव्या शतकापर्यंतच्या काळात या पंथाने चाली व चलने, अभंग, विराण्या, गौळणी, भारुडे, ओवी यांसारखे रचनांचे साचे वापरण्याचे असे पक्के मार्ग खेळविले की महाराष्ट्राच्या सांगीतिक साक्षरतेत झपाट्याने वाढ झाली. वारकरी पंथाने सामूहिकतेवर भर दिला असल्याने संगीताने या काळात समाजाला व्यापून टाकले. संतांनी अर्थातच संगीत एक साधन म्हणून वापरले. पण तरीही या कामगिरीचे महत्त्व कमी होत नाही. संगीत हा एक क्रियायोग आहे आणि अधिकाधिक लोक संगीताच्या प्रत्यक्ष प्रयोगाशी निगडित होणे सामाजिक सांगीतिकतेच्या दृष्टीने अर्थपूर्ण ठरते. संतकवींच्या कार्यामुळे एका अनन्यसाधारण अव्याहतपणे समाज संगीताने भारला राहिला. संगीताचे ठसे मराठी समाजमनात खोलवर उमटले. शिवाय धार्मिक आचार विचारांच्या यंत्रणेशी संगीताची निरगाठ घातली असल्याने कुलपरंपरेने संगीताचे आविष्कारही पुढेपुढे पोचविले गेले. जवळजवळ तीन शतकांवरच्या कालात राजकीय अस्थिरता, नैसर्गिक उत्पात इत्यादींमुळे महाराष्ट्रात संगीताला राजाश्रय वगैरे मिळाला नसणार! पण ही कमतरता संतकवींच्या कार्यामुळे जाणवू नये इतकी त्याची व्याप्ती व खोली होती. वास्तविक पाहता एकंदर संगीत व्यवहारापैकी फार थोडा भाग कलासंगीताने व्यापलेला असतो. सामाजिक दृष्ट्या व



सांस्कृतिक परिप्रेक्षेने पाहता आदिम, लोक व जनप्रिय या संगीतकोटींच्या बहुलतेमुळे व विविधतेमुळेच संगीत व्यवहाराचा इमला भव्य परिमाणांचा वाटू लागतो.

अर्थात कलासंगीताच्या आढळाचा तत्कालीन पुरावा अगदीच नाही असे नाही. दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाच्या (१५८०-१६२६) किताबेनौरस या ग्रंथात तो पुरेसा मिळतो. विजापूर आजच्या कर्नाटकात असले तरीही हा पुरावा नोंदण्यासारखा आहे. महाराष्ट्राच्या हिंदुस्थानी संगीत परंपरेवर यामुळे थोडासा प्रकाश पडतो.

इब्राहीमने आपल्या पुस्तकात समाविष्ट केलेल्या रचना तपासल्या असता पुढील निष्कर्ष निघतात :

(१) रूढ संगीतावर पर्शियन प्रभाव जाणवू लागला होता. नौरोझ, हाजिज इ. रागनामे वा 'मुकाम' सारख्या संगीत शास्त्रीय संज्ञा पर्शियन व भारतीय संगीताच्या तत्कालीन देवाणघेवाणीच्या निदर्शक होत.

(२) धृपद या प्राचीन हिंदुस्थानी संगीत प्रकारातील रचना चार भागांच्या तर १८ व्या शतकापासून बहराला आलेल्या ख्याल या प्रकारच्या रचनात दोन भाग असतात. इब्राहीम शाहने दिलेल्या रचनात तीन भाग आहेत. एका दृष्टीने अखंड, प्रवाही परंपरेत बदल घडताना निरनिराळ्या अवस्था कशा दिसू शकतात याचे हे उदाहरण म्हणता येईल.



(३) रचना (५९) रागात (१७) आहेत आणि विशेष म्हणजे त्यांची भाषा ब्रजभाषा आहे. आजच्या हिंदुस्थानी संगीत परंपरेतील रचना मुख्यत्वेकरून याच बोलीत असतात हे लक्षणीय होय.

(४) रागमाला चिजांना प्रथमतः इब्राहीम शाहने स्फूर्ती दिली. हिंदुस्थानी संगीत परंपरेच्या या वैशिष्ट्याचे मूळ दक्षिणी घराण्यात आहे हे ध्यानात घेतले पाहिजे.

मुद्दा असा की महाराष्ट्राच्या परिसरात कला संगीत होते आणि सोळाव्या शतकातले त्याचे रूप निखालसपणे हिंदुस्थानी परंपरेचे होते.



इब्राहीम शाहच्या निधनानंतर चारच वर्षांत शिवाजीचा जन्म झाला (१६३०) आणि पन्नास वर्षांच्या काळात आजच्या महाराष्ट्राच्या एक-पंचमांश भागात मराठी राज्य फुलले. या कालखंडात खुद्द छत्रपतींच्या दरबारी कला संगीत पुढारल्याचा पुरावा नाही. शिवकालातला समजला जाणाऱ्या अज्ञानदासाचा पोवाडाही तत्कालीन नसावा असे संशोधकांचे मत आहे. पण पोवाडा या प्रकारची शिवकालात बढत झाली असणे शक्य आहे. समर्थ रामदासांमुळे समर्थ संप्रदायी कीर्तनाने मूळ धरले. शिवाय श्लोक म्हणण्याची एक खास धाटणीही समर्थांनी रूढ केली. संगीतात्म कथनाने युक्त असा हरिकथा प्रकार फळफळला असावा. कारण हरिकथाकारांना व्यंकोजीच्या दाक्षिणात्य दरबारातही चांगली मागणी होती. याच काळात तुकाराम महाराजांसारख्या संताने वारकरी चळवळ अगदी कळसाला पोचविली होती. तेव्हा भजन, कीर्तन नीटपणे निनादत होते हे निश्चित. रामदासांच्या कोशात्मक दासबोधात गुरूंच्या तपशीलवार गणनेत 'गायनगुरु' होता. पण इतकेच! याउलट त्यांच्या 'डफगाणे' या रचनेत वाद्यांची जी यादी आहे तीत बहुतेक 'लोक' धाटणीच्या वाद्यांचा समावेश आहे. समर्थांनी प्रबंध, ताल इत्यादी संज्ञा वापरल्या आहेत. गायनीकळा धन्य म्हटली आहे हेही खरे. पण शिवकाळात शिवाजीच्या महाराष्ट्रात लोक व भक्ती हेच संगीत प्रकार नाव घेण्याइतक्या दिमाखाने मिरवत होते. शिवपुत्र संभाजी व शिवपिता शहाजी यांच्या दरबारात कलांना अधिक वाव होता. पण तरीही महाराष्ट्र-जीवनातल्या धामधुमीमुळे असो वा इतर कोणत्या कारणांमुळे असो कला संगीतधारा क्षीण होती.

छत्रपती शिवाजीच्या निधनानंतरचा ब्रिटिशपूर्व (म्हणजे १८२० पर्यंतचा) कालखंड मराठा कालखंड म्हणून ओळखला जातो. राजा शिवाजीच्या वंशजाच्या नावे त्यांच्या पंतप्रधानांनी भारतभर मराठी झेंडा फडकविला तो याच काळात आणि अपरिहार्य सांस्कृतिक देवाणघेवाण घडून मराठी संस्कृतीस नवे धुमारे फुटले तेही याच कालखंडात शिवाजी राजांच्या







डोक्यावर मोरपिसांची टोपी घालून गाणी म्हणत फिरणारा 'वासुदेव'

नातवाने शाहू महाराजाने (१६८२-१७४९) आपल्या पदरी कलावंत बाळगले होते आणि आपल्या सरदारांना उत्तरेहून नर्तकी आणण्याची आज्ञा दिली होती. त्यांच्या तिसऱ्या पेशव्याने— नानासाहेबाने (१७२१-१७६१) कर्नाटकातील स्वारीत पुरंदरे सरदारांना एक पत्र लिहिले त्यात दक्षिणेचे राजे गाणे जाणतात असा गौरवपूर्ण उल्लेख आहे (१७५३). उत्तरेकडून धन व दक्षिणेतून संस्कृती आणून पुण्यात त्यांचा संगम घडवावा अशी त्याची मनीषा होती. काही काळ पेशवेपद भोगलेल्या राघोबाला (१७३४-१७८३) कलासक्ती अधिक प्रमाणात होती. तानसेनाच्या वंशजाने गाणे-बजावणे केल्यानिमित्त झालेला खर्च त्याने नोंदला आहे. सवाई माधवराव (१७७४-१७९५) या आणखी एका अल्पकालीन पेशव्याच्या दरबारी व्यंकट नरसी ही गाणारीण व भवई गुजराथी हा कलाकार होता तर प्रमुख कारभारी नाना फडणवीस यांनी उत्तरेतून दोन सतारी मागविल्या होत्या. मध्वमुनीश्वर (मृ. १७३१) या कवीने लोक मोठ्या चवीने 'ख्याल, टप्पे' पसंत करतात याचा काहीशा नाखुषीने आपल्या पदात उल्लेख केला आहे.

एकंदरीने पेशवे वा मराठा कालखंडात धृपद-धमार, ख्याल, टप्पे इत्यादी संगीतप्रकार; सारंगी, सतार, पखवाज इत्यादी वाद्ये; लावणी, पोवाडा, कीर्तन, भजन, पद, भारूड इत्यादी लोकाविष्कार रूढ होते. नारदीय पठडीचे (म्हणजे पूर्वरंगी निरुपण व उत्तररंगी आख्यान) कीर्तन व बैठकीची लावणी हे दोन्ही आविष्कार तर उत्तर पेशवाईच्या देणग्या होत. बैठकीची लावणी हा हिंदुस्थानी ठुमरीचा—अभिनययुक्त व माफक नृत्ययुक्त—गायनशैलीचा मराठी भाषिक अवतार होय हे सहज ध्यानात येते. गणेशोत्सव व श्रावणीची दक्षिणा इत्यादी प्रसंगी हरिकथाकार, कीर्तनकार यांची गर्दी असे. पेशवे, सरदार-दरकदार व शेठ-सावकार या आश्रयदात्यांच्या छत्राखाली संगीत नांदत होते. एक आदिम संगीत सोडता बाकी तिन्ही संगीत कोटींचा पेशवाईत मुबलक आढळ होतो असे म्हणण्यास हरकत नाही.



**ब्रिटिश कालखंड**

१८२० ते १९४७ पर्यंतचा कालखंड हा ब्रिटिश कालखंड होय. उद्यम-शास्त्र-विज्ञानयुगाचा आरंभ, दळणवळणाची साधने, परकी संस्कृतींचा संघर्षात्मक परिचय अशा सांस्कृतिक बदलाच्या दृष्टीने अपार महत्त्वाच्या घटना इतक्या वेगाने व मोठ्या प्रमाणात महाराष्ट्रात पूर्वी कोणत्याच कालखंडात घडल्या नव्हत्या. अजूनही या घटनांच्या झपाट्याचा पूर्ण अन्वयार्थ मराठी मनाला लागलेला नसावा असे मानण्यास जागा आहे. अशा परिस्थितीत काही ठोस शीर्षकांखाली संगीत संबद्ध घटना नोंदवाव्यात व निष्कर्षांचे केवळ सूचन करावे हे अधिक संयुक्तिक वाटते.

संगीतजीवनाच्या दृष्टीने पाहता पुढील शीर्षकांखाली मराठी जीवनाचे संबंधित वास्तव तपासणे जरूरीचे आहे :

(१) आश्रयदाते
(२) अध्ययन-अध्यापन
(३) संगीत क्षितिजांचा विस्तार
(४) नवीन संगीत प्रकार
(५) वाद्यसंगीत
(६) औपपत्तिक अभ्यास
(७) नवीन संपर्क माध्यमे व साधने

**(१) आश्रयदाते**

१९४७ पर्यंत राजेरजवाडे आणि सरदार-दरकदार हे संगीतकारांना आश्रय देण्याची भूमिका बजावत राहिले. पेशवाई बुडाल्यानंतर पेशव्यांचे सरदार (शिंदे-होळकर-पवार-भोसले-गायकवाड वगैरे आणि इतर लहान मोठे) ब्रिटिश अमदानीतले संस्थानिक होते. यांच्या ‘ दरबारी ’ कलावंतांना, कारागिरांना खास नेमणुका असत. याशिवाय महाराष्ट्रातील प्रमुख देवस्थानांतही संगीतकारांना आश्रय असे. देवद्वारी ‘ सेवा ’ आणि राजदरबारी ‘ हाजरी ’ देणे असे कलाकारांच्या जबाबदारीचे वर्णन करता येईल. या संदर्भात पुढील तपशील ध्यानात घेण्यासारखा आहे :



*गाणी गाऊन ग्रामीण जनतेचे मनोरंजन करीत फिरणारे गोंधळी*



दे=देवस्थान (इतरत्र संस्थानाचे) नाव, कलाकार

| | | |
|---|---|---|
| (क) | चिंचवड (दे) | मोरया गोसावी |
| (ख) | सातारा | सखारामबुवा मिरची, वारस अली |
| (ग) | पुणे (दे) | अष्टेकर बुवा |
| (घ) | सांगली | सखारामबुवा काशीकर भैय्या साहेब |
| (च) | इचलकरंजी | रावजीबुवा गोगटे<br>बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर. |
| (छ) | मिरज | बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर<br>(१८८८ पर्यंत). |
| (ज) | कुरुंदवाड | उस्ताद रहिमत खाँ |
| (झ) | कोल्हापूर | उस्ताद अल्लादियाँ खाँ |
| (ट) | बावडे | केशवबुवा गोगटे |
| (ठ) | औंध | गुंडूबुवा इंगळे<br>अंतुबुवा जोशी |
| (ड) | जमखिंडी | महादेवबुवा गोखले. |

याशिवाय फलटण, भोर, अक्कलकोट, जत, जव्हार इत्यादी ठिकाणीही नेमणुका होत्या.





दरबारी नेमणूक करण्याशिवाय दुसऱ्याही एका मार्गाने कलाकारांना मिळणारा आश्रय सिद्ध होई. आपली तयारी झाली असे कलाकाराला वाटले की तो (गुरूच्या परवानगीने आपले नशीब अजमाविण्यास बाहेर पडे व ठिकठिकाणी गाणे-वजावणे ऐकवी. कालांतराने कमाई घेऊन घरी परतणे व पुन्हा अशा मुलुखगिरीस बाहेर पडणे असा क्रम राही. दौऱ्यात कलाकारांची थांबण्याची ठिकाणे कोणती होती ते पाहिल्यास संस्थानांची बहुसंख्या सहज ध्यानात येते. उदाहरणार्थ पं. विष्णु दिगंबर वयाच्या २५ व्या वर्षी इचलकरंजी-मिरज सोडून बाहेर पडल (१८९६). दौऱ्याची ठिकाणे पुढीलप्रमाणे :

सातारा-बडोदे-काठेवाड-राजकोट-ग्वाल्हेर-अलीगढ-मथुरा-दिल्ली-जालंधर-अमृतसर-लाहोर-काश्मीर-रावळपिंडी-भरतपूर-बिकानेर-जोधपूर-मॉंटगोमरी-लाहोर-जैसलमेर-उदयपूर-मुंबई.

उस्ताद अब्दुल करीम खाँ, उस्ताद अल्लादियाँ खाँ वा पं. रामकृष्णबुवा वझे यांच्यासारख्या इतर अनेकांच्या दौऱ्याचे आलेख काढले असता राजेरजवाड्यांचे आश्रयदातृत्व ध्यानात येईल.

याशिवाय १८८५ पासून महाराष्ट्रात भरभराटीस आलेल्या प्रमुख संगीत नाटक मंडळ्यांमध्ये गवई तालीम द्यायला वा चाली द्यायला महिनोनमहिने राहत. या मंडळ्यांचा हात आखडता नसे. खेरीज काही वेळा गवई गायनमास्तर म्हणून नोकरी पत्करताना दिसत. (उदा. पं. भास्करबुवा बखले यांनी धारवाडला ट्रेनिंग कॉलेजमध्ये नोकरी केली—१९०५ ते १९०८ पर्यंत). पण हे क्वचितच घडे. काही प्रमुख संगीत नाटक मंडळ्या व त्यांच्याशी संलग्न संगीतकार पाहण्यासारखे आहेत :

| मंडळी | गुरु |
|---|---|
| डोंगरे संगीत मंडळी (स्थापना १८८१) | पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर |
| पाटणकर संगीत मंडळी (स्था. १८९१) | उस्ताद निस्सार हुसेन खाँ |
| गंधर्व संगीत मंडळी (स्था. १९१३) .. | पं. भास्करबुवा बखले |
| ललितकलादर्श (स्था १९०८) .. | पं. रामकृष्णबुवा वझे |
| बलवंत संगीत मंडळी (स्था. १९१८) | पं. रामकृष्णबुवा वझे |

याशिवाय संगीत नाटक मंडळ्यांत कसलेले गायक नट—गवई म्हणून मैफली मारणारे—नोकरीला असत हे निराळेच.

श्रीमंती गोषातून बाहेर काढून आपले कलाविष्कार आम जनतेच्या आश्रयाला नेण्याचे जे काही महत्त्वाचे प्रयत्न झाले त्यात पं. विष्णु दिगंबर यांचा वाटा मोठा होता. उदाहरणार्थ, १८९६-९७ साली राजकोट येथे त्यांनी तिकीटे लावून कार्यक्रम केला. अशा तऱ्हेने आम जनतेचा आश्रय मिळविण्याचा हा पहिला प्रयत्न होय.

अशा रीतीने मिळणारा श्रोतृवृंद सरमिसळ असणार हे ध्यानात घेऊन पंडितजींनी कार्यक्रमाचे स्वरूप बदलले. जाहीर कार्यक्रमाची आधी जाहिरात होई व त्यात कार्यक्रमाचे वर्णन जलसा म्हणून केलेले असे. बहुधा प्रार्थना, मँडोलिन वाद्यांची जुगलबंदी, व्हॉयलीनवादन, मुलांचे नृत्य, पिरामिडच्या कसरती, मृदंगवादन, हार्मोनियमवादन, वाद्यवृंद, संगीत धुनांवरचे ड्रिल व शेवटी पंडितजींचे गाणे असा जलशाचा मेनू असे. काळाची गरज अशी होती हे उघड आहे. कारण मैफलीपेक्षा विविध मनोरंजन व मग शास्त्रोक्त गाणे हाच साचा इतर गवईसुद्धा वापरीत. उदाहरणार्थ उस्ताद अब्दुल करीम खाँच्या जलशात लहान मुलाने 'नोटेशन' करून दाखविणे ते कुत्र्याने संगीतास प्रतिसाद देणे या गोष्टी (खाँसाहेबांच्या गाण्याआधी) होत.

आश्रयदात्यांत झालेल्या बदलामुळे त्यांना आकर्षून घेण्यासाठी दोन मान्यवर कलाकारांचे गायन इत्यादी एकाच थिएटरात एकाच दिवशी मध्यंतरापूर्वी व नंतर ठेवणे अशी योजना राही. उदाहरणार्थ अल्लादिया खाँ व रहिमत खाँ यांचे गाणे एकाच मंचावर कोल्हापूरमध्ये १९०३ साली तर अब्दुल करीम खाँ व रहिमत खाँ यांचे गायन १९०९ साली पुण्यात आयोजित झाले होते.

संगीत परिषदांचे आयोजन हाही बदलत्या आश्रयदात्यांना संगीतकारांनी दिलेला प्रतिसाद होय. परिषदा भरविण्यासाठी राजेरजवाड्यांकडून भरघोस मदत असली तरी लक्ष्य आम जनता हे होते. देवादिकांच्या उत्सवातही गाणी-बजावणी होत पण एक भाग म्हणून. संगीत परिषदा संगीतासाठी असत. पं. वि.ना.



*भारतीय संगीतावरील अभ्यास, साहित्य निर्मिती व संशोधन या क्षेत्रात अतुलनीय कामगिरी केल्यामुळे हिंदुस्थानी संगीताचे पाणिनी म्हणून ओळखले जाणारे पं. भातखंडे*



भातखंडे यांनी १९१६ ते १९२४ या कालखंडात चार तर पं. विष्णु दिगंबरांनी १९१८ ते १९२२ या कालखंडात पाच परिषदा भरविल्या. भारताच्या विविध भागांत परिषदा भरविल्या असल्याने बहुसंख्य, बहुविध व बहुभाषिकांची यात गुंतवणूक झाली.

आश्रयदाता हाच जाणकारही असावा हे खात्रीने कसे घडावे? आणखी एक युक्ती म्हणजे जाणकारांनी एकत्र येऊन आपल्याला हवे त्या कलाकाराचे गाणे करावे, ही संगीत मंडळांची सुरुवात. अनौपचारिक रीत्या १९१२ ते १९१४ च्या सुमारास अशा प्रकारे मंडळी (मुंबईकर) एकत्र आली व त्यांनी उस्ताद अल्लादिया खाँ यांची तीन गाणी केली. औपचारिक प्रकारे सुरुवात होऊन चाललेले संगीत मंडळ 'बॉम्बे म्युझिक सर्कल' हे मोतीराम पै इत्यादींच्या प्रेरणेने मुंबईत १९३० मध्ये स्थापिले गेले.

## (२) अध्ययन-अध्यापन

संगीत शिक्षण पूर्णपणे गुरुकुल पद्धतीवर अवलंबून न ठेवता शाळा, अभ्यासक्रम, परीक्षा, पदवी या साच्यात ते बसविण्याचे कार्य मौलाबक्ष यांनी बडोद्यात १८७५ च्या सुमारास सुरू केले होते. याहूनही भरघोस प्रयत्न पं. विष्णु दिगंबर यांनी लाहोरला (१९०१) व मग मुंबईला (१९०८) संगीत विद्यालय स्थापून चालू ठेवला. त्यांच्या शिष्य-प्रशिष्यांनी हाच प्रघात जारी ठेवून भारतभर शिक्षण संस्थांचे जाळे पसरविले.

संगीत लेखन पद्धती, अभ्यासक्रमानुसार संगीताची पाठ्यपुस्तके, चिजांचे संग्रह इत्यादी अभ्यास साहित्यही निर्माण होऊ लागले. या संदर्भात पं. भातखंडे यांची कामगिरी अतुलनीय आहे. संगीत पद्धतीचे चार भाग व हिंदुस्थानी क्रमिक पुस्तक मालिकेचे सहा भाग इतकीच कामगिरी दमछाक होण्यास पुरेशी आहे. पण याशिवाय इतिहासपर लेखन इत्यादी करून पं. भातखंड्यांनी हिंदुस्थानी संगीताचे पाणिनी ही पदवी सार्थ ठरविली. शिवाय संगीत शिक्षणासाठी मॅरिस कॉलेजची स्थापना त्यांच्याच प्रयत्नाने लखनौ येथे १९२६ मध्ये झाली. संगीत शास्त्राची पुनर्रचना करणारे लिखाण पं. भातखंड्यांनी मराठीत केले तर आम जनतेत संगीत प्रसार व्हावा म्हणणाऱ्या पं. विष्णु दिगंबरांनी हिंदी भाषेवर भर दिला. आपापल्या कार्याच्या स्वरूपानुसार त्यांनी केलेली निवड बरोबरच म्हटली पाहिजे.

## (३) संगीत क्षितिजांचा विस्तार

भारतीय संगीताकडे एरव्ही न झुकलेले समाज तिकडे झुकतील यासाठीही ब्रिटिश कालखंडात बरेच वेधक प्रयत्न झाले. या संदर्भात काही महत्त्वाचा तपशील पुढीलप्रमाणे:

(अ) जवळजवळ सर्व संस्थानिकांनी घोषवाद्यसमूह तयार करण्याची धडपड केली. त्यांना वाजविण्यास सुलभ अशा भारतीय संगीतावर आधारित रचना केल्या. आवश्यक म्हणून संगीत लेखनपद्धती तयार करण्याचे प्रयत्न तर मौलाबक्ष, भातखंडे, विष्णु दिगंबर, अब्दुल करीम खाँ प्रभृतींनी चालविलेच होते.

(ब) पं. भातखंड्यांनी आपल्या कार्यासाठी पारशी समाजाचा आश्रय सतत मिळविला हे उल्लेखनीय आहे. व्यवस्थितपणा, इंग्रजी विद्येशी परिचय या गुणांमुळे पं. भातखंडे अधिक सहजपणे स्वीकारणे या समाजास शक्य झाले असावे.

इकडे पं. विष्णु दिगंबरांच्या विद्यालयात भाटिया, बोहरी, मारवाडी समाजही संगीत शिक्षणार्थ वळत होता. याशिवाय पंडितजींनी प्रो. स्क्रिझी यांच्याकडे प्रा. बा. र. देवधर यांना पाश्चात्य संगीताच्या शिक्षणासाठी व एका इटालियन व्हायोलीनवादकाकडे श्री. धुंडिराज पलुस्कर यांना व्हायोलीनवादनाच्या शिक्षणासाठी पाठविले. प्रो. स्क्रिझी यांच्या पिआनोवादनाचा कार्यक्रमही त्यांनी आपण योजलेल्या संगीतपरिषदेत सादर केला (१९२१).

पाश्चात्य आणि नवशिक्षित यांना इंग्रजीतून भारतीय संगीताची माहिती देणे इतकेच नव्हे तर त्याची महत्ता पटविणे या हेतूने अनेक प्रयत्न कॅ. विलर्ड, कॅ. डे, विल्यम जोन्ससारख्या विद्याविभूषितांनी केले आहेत. पण खुद्द भारतीयांनी केलेले या तऱ्हेचे प्रयत्नही वेधक आहेत. महाराष्ट्रापुरते पाहिल्यास पुढील घटना लक्ष वेधून घेतात:



संगीत कलानिधी मा. कृष्णराव फुलंब्रीकर यांची मैफल



१८८४ मध्ये श्री. म. मो. कुंट यांनी पुण्याला कौन्सिल हॉलमध्ये गव्हर्नरांच्या उपस्थितीत भारतीय संगीतावर १० चित्रांसह व्याख्यान दिले.

पूना गायन समाज (पुणे व मद्रास) या संस्थेच्या चालकाने – बलवंत त्र्यंबक सहस्त्रबुद्धे या गृहस्थाने – वरील संस्था १८७४ मध्ये पुण्याला स्थापिली. कार्यक्रम आखणे, त्यांचे इंग्रजीत वृत्तांत छापून घेणे, त्यावरची पुस्तके प्रकाशित करणे व शिवाय खोडसाळ पाश्चात्य वृत्तपत्रांना बोचक उत्तरे लिहिणे असा धडाकेबंद कार्यक्रम या व्यक्ती/संस्थेने चालविला होता. पेशाच्या निमित्ताने मद्रासला गेल्यावर १८८७ च्या सुमारास तिथेही समाजाची शाखा उघडून त्यांनी कार्यक्रम चालू ठेवले.

नाटककार देवलांचे बंधू कृ. व. देवल आणि ई. क्लेमंट्स (आय्.सी.एस्.) यांनी 'द फिल्हार्मोनिक सोसायटी ऑफ वेस्टर्न इंडिया' ही संस्था स्थापिली (१९१२). भारतीय संगीत पद्धतीवर संशोधन, राग इत्यादींचे पाश्चात्य स्वरलिपीत लेखन व प्रकाशन असा कार्यक्रम दोघांनी चालवला. भारतीय स्वरांतरे मोजमापात कशी नेमकी आहेत हे दाखविणारे प्रयोग व वाद्ये सिद्ध केली. सर्व व्यवहार इंग्रजीत करण्याचा परिणाम भारतीय संगीतव्यवहाराची क्षितिजे रुंदावण्यात झाला. पं. भातखंडेचांच्या पहिल्या संगीत परिषदेतही (१९१६ वडोदे) आपला निबंध व प्रयोग त्यांनी सादर केला होता.

खुद्द भातखंडेचांनी परिषदेचा व्यवहार इंग्रजीत केला हे लक्षणीय ! (यावर पं. विष्णु दिगंबरांनी आक्षेपही घेतला होता.)

१९०५–०६ मध्ये पंचम जॉर्जच्या पंजाब दौऱ्यात पं. विष्णु दिगंबर भारतीय संगीत ऐकवतात हाही प्रयत्न नोंदण्यासारखा होय.

## (४) नवे संगीत प्रकार

कलेच्या वाटचालीतील चैतन्याचे एक गमक म्हणजे नवीन कलांच्या प्रकारांची रुजवात होणे वा जुन्यांच्या सादरीकरणात फरक पडणे. या दोन्ही प्रकारांची भर ब्रिटिश कालखंडात पडली असे आढळते.

(अ) आपल्या जलशाच्या सादरीकरणात पं. विष्णु दिगंबरांनी वाद्यवृंद व जुगलबंदी हे नेहमीचे घटक म्हणून सामील केले होते. याशिवाय संगीत कसरतीसारखा प्रकारही!

(ब) १८८५ पासून १९३१ पर्यंत जोमाने व पुढे थांबत आणि वळणावळणाने वाहणारा मराठी नाट्यसंगीताचा प्रवाह ही महाराष्ट्राची खास सांगीतिक कमाई आहे.

(क) १९३०–३१ पासून काव्यपठण-काव्यगायन या अवस्थांमधून काव्य व संगीत यांच्या संयोगातून भावगीत गायन जन्माला आले. १९५५ पर्यंत भावगीताची भरभराट झाली. जी. एन्. जोशी, जे. एल्. रानडे, गजानन वाटवे, सुधीर फडके इत्यादी अनेकांनी भावगीत गायनात भर घातली.

(ड) ब्रिटिशपूर्व काळातही महाराष्ट्रात ख्यालगायकी होती. पण एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत ख्यालगायकीच्या संदर्भात महत्त्वाच्या मानल्या जाणाऱ्या सर्व घराण्यांनी महाराष्ट्रात आपापली पीठे स्थापावीत अशी परिस्थिती निर्माण झालेली होती. पुढील तपशील पहा :

| कलाकार | वास्तव्य |
|---|---|
| पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर<br>ग्वाल्हेर घराणे | मुंबई, मिरज, इचलकरंजी |
| उस्ताद अब्दुल करीम खाँ<br>किराणा घराणे | मुंबई, मिरज |
| उस्ताद विलायत हुसेन खाँ<br>उस्ताद खादीम हुसेन खाँ<br>आग्रा घराणे | मुंबई |
| उस्ताद अल्लादिया खाँ<br>जयपूर घराणे | कोल्हापूर, मुंबई |
| पं. महादेवबुवा गोखले<br>गोखले घराणे | जमखिंडी, कोल्हापूर |
| उस्ताद नजीर खाँ<br>भेंडीबाजार घराणे | मुंबई |





श्रीमती हिराबाई बडोदेकर यांची सुरेल बैठक




श्रीमती मोगुबाई कुर्डीकर व किशोरी आमोणकर यांची मैफल



महाराष्ट्रातील सर्वांत लोकप्रिय कला : तमाशा

(इ) प्रस्तुत कालखंडात ग्वाल्हेर घराण्यातील गायकांनी 'अष्टपदी' या प्राचीन पण प्रचारातून गेलेल्या गीत प्रकाराचे पुनरुज्जीवन केले. ग्वाल्हेर घराण्याचे महाराष्ट्रस्थित गायकही अष्टपद्यांचे गायन करीत.

(फ) नवीन संगीत प्रकारांचा विचार करताना १८९८ पासून सुरू झालेल्या गणेशोत्सव, शिवाजी उत्सव यांत सादर होणाऱ्या मेळ्यांतील गीतांचा विसर पडून चालणार नाही. तत्कालीन प्रसंग आणि व्यक्ती यांना सामाजिक मनाने दिलेला सांगीतिक प्रतिसाद म्हणजे मेळ्यातील गाणी होत. जनप्रिय संगीत म्हणून ओळखल्या जाणाऱ्या संगीत कोटीत मेळ्यातील गीतांचा समावेश होतो. प्रभातफेरी व तत्सम गाणी स्वातंत्र्य संघर्षाच्या कालखंडात असंख्य लोक गात. पं. विष्णु दिगंबर तर रामधून व वंदे मातरम् यांचे गायन कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या प्रसंगी नियमाने करीत असत. या संदर्भातली काही उदाहरणे नोंदण्यासारखी आहेत:

- Δ स्वदेशी प्रचारार्थ निघालेल्या मिरवणुकीतल्या गर्दीला शांत करण्यासाठी पं. विष्णु दिगंबर गीत गातात, 'और कितने दिन ज्ञानहीन रहोगे भारतवासी' (१९०४).
- Δ म. गांधींच्या विनंतीवरून अहमदाबादच्या कॉंग्रेस अधिवेशनात जमावाला शांत करण्यासाठी पं. विष्णु दिगंबर रामधून म्हणतात.
- Δ स्वदेशी चळवळ भरावर असताना १९३० मध्ये उस्ताद मंजीखॉंनी ब्लॅवॅट्स्की लॉजमध्ये स्वरचित गीत म्हटले, 'चरखे के करामत से लेंगे स्वराज्य लेंगे'.

(ग) भक्ती संगीतधारा वाहत राहिली इतकेच नव्हे तर काही बाबतीत तिचे स्वरूप जास्त सुबद्ध झाले. काही नवीन प्रकारांचाही आविर्भाव झाला.

जोग महाराजांनी १९२०च्या सुमारास वारकरी पंथाची सर्वांगीण पुनर्रचना केली. उपासना पद्धतीतील भजन-कीर्तनादी अंगांतही बदल झाला व आज प्रचलित असलेली शिस्तबद्ध, सामूहिक आविष्काराची पठडी कायम झाली.

नारायण वामन टिळक १८९५ मध्ये खिरस्ती झाले व त्यांनी उपासनेसाठी अभंग इत्यादी रूढ साचे व कीर्तन परंपरा राबविली.



याखेरीज पाश्चात्य चालीत बसविलेली पण मराठी भाषेतील अशी सुमारे ३०० गीते १८५५ च्या सुमारास धर्मांतरित ख्रिस्ती समाजात महाराष्ट्रात रूढ होती. सांगीतिक दृष्टचा ही वाव वेधक यात शंका नाही. प्रार्थना समाजाच्या स्थापनेनंतर संगीत दृष्टचा महाराष्ट्रात नवीन धारा सुरू झाल्याचे आढळत नाही.

चक्री भजनासारखा शास्त्रोक्त संगीताने जास्त संस्कारित झालेला भक्तिसंगीत प्रकार मुंबईत १९३० च्या आसपास आकाराला आला.

लोकसंगीताबाबत प्रस्तुत कालखंडातली महत्त्वाची तथ्ये पुढीलप्रमाणे :

पोवाडा हा प्रकार त्या मानाने पाहता बऱ्याच जोमदारपणे वाढत राहिला. १९२८ मध्ये उपलब्ध असलेल्या सुमारे ३०० पोवाड्यांपैकी जवळजवळ १५० ब्रिटिश काळातले होते.

लोकसंगीताशी लोकनाट्य फारसे फटकून नसते हे ध्यानात घेता 'वगनाट्याचा' प्रस्तुत कालखंडात झालेला उगम महत्त्वाचा मानला पाहिजे. सुमारे १८५० च्या सुमारास होळीचा सार्वजनिक उत्सव वा रस्त्यावर तमाशे करणे यांसारख्या आविष्कारांवर बंदी आली. तमाशाला 'थिएटर' गरजेचे वाटू लागले. बैठकीची आणि फडाची लावणी याशिवाय कथा, गायन व अभिनय ह्या सर्वांना कवेत घेणारे 'वग' नाट्यप्रचारात येण्यासाठी अनेक घटना घडाव्या लागल्या आणि त्या ब्रिटिश कालखंडात शक्य झाल्या.

१९३१ नंतर बोलपटांच्या माध्यमातून निर्माण झालेला संगीताचा आविष्कार हा एका वेगळ्याच ताकदीचा ठरला. वाद्यवृंद, ध्वनिपरिणाम, प्ले बॅक वगैरेंच्या विशेष कामगिरीमुळे बोलपट/चित्रपटसंगीत विलक्षण प्रभावी ठरले. अनेक स्वररचनाकार, अनेक गायक-गायिका आणि कवी यांचा हातभार लागलेले चित्रपटसंगीत प्रसाराच्या दृष्टीने फार व्यापक राहिले व आजही हे सामर्थ्य कमी झालेले नाही.

**(५) वाद्य संगीत**

वाद्य संगीतातली घराणी गायनातील घराण्याइतकी



*तमाशातील नृत्यांगना*



सुस्पष्टतेने नोंदली गेली नसली तरी त्यांचे अस्तित्व नाकारता येत नाही.

देवळांतून गुरव मंडळी तबला वा पखवाज वाजवत असत. सनई वादकही भरपूर आढळत.

त्याचप्रमाणे तबला व पखवाज वादनाकडे वळलेले इतरही लोक आढळत. इंदूरमधील पानसे घराण्याचे अनेक शिष्य महाराष्ट्रात नाव कमावून होते. भजनकीर्तनाबरोबर साथ पखवाज करत असे हे लक्षात घेता महाराष्ट्रातील ही परंपरा जुनी असणार हे उघड आहे. दुर्दैवाने ह्या परंपरेचा इतिहास अजून पद्धतशीरपणे नोंदला गेलेला नाही.

महाराष्ट्रात व्हायोलीन १९व्या शतकाच्या अखेरीस रुजले असावे. पं. गजाननराव जोशी (जन्म १९१०) यांनी गतकरी पद्धतीने व्हायोलीन वाजवून या वाद्यास मंचप्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

१८९६–९८ च्या सुमारास पं. विष्णु दिगंबरांनी तबला-तरंग या वाद्यसंगीताविष्काराचा आरंभ केला असे उल्लेख अनेकांनी केले आहेत. जलतरंग हे वाद्य महाराष्ट्रात थोडेफार वावरले. त्याचप्रमाणे दिलरुबा व बट्टाबीन या वाद्यांचे झाले. ब्रिटिश कालखंडात थोडाफार वापर असलेली ही वाद्ये आज अस्तंगत झालेली दिसतात. तंबुरी, उभी बांसरी, सुरसोटा, सुंद्री या वाद्यांचा प्रचार कमीकमी होत आला. याउलट आडवा हार्मोनियम, ऑर्गन-स्वरांची पायपेटी, अंजिरी घाटाच्या भोपळ्याचे तंबोरे, दोन तुंब्यांच्या सतारी, व्हायोलीन वगैरे वाद्ये सरसकट दिसू लागली.

बोलपटांच्या आगमनानंतर पिआनो, क्लॅरिनेट, मेंडोलिन, गिटार, बँजो, टिंपनी ड्रम्स् इत्यादी अनेक वाद्ये नवीनपणे सामोरी आली. पं. विष्णु दिगंबरांनी ८ फूट उंचीची सारंगी बनविण्याचा प्रयत्न केला. नवीन व तरीही भारतीय वाटावीत अशी वाद्ये बनविण्याचे प्रयत्न कमी झाले व झाले ते तितकेसे रुजले नाहीत.

लोकसंगीतात पायपेटीचे स्थान पक्के झाले. १८८५ च्या सुमारास पायपेटी कीर्तनाच्या द्वारे महाराष्ट्रात आली व रुजली. मळसूत्रे लावलेली ढोलकी (दोरीने कसलेल्या ढोलकीऐवजी) सोडल्यास तुणतुण, हलगी, डफ इत्यादी लोकवाद्ये आपला संच सांभाळून राहिली. भजनी मंडळींनीही पेटी घेतली पण पखवाज, टाळ, मंजिऱ्या इत्यादी वाजत्या ठेवल्या.

### (६) औपपत्तिक अभ्यास

संगीताच्या व्याकरणी संशोधनाबाबत ब्रिटिश कालखंडात महाराष्ट्राने चांगलीच आघाडी मारली. संस्कृत ग्रंथांच्या आवृत्त्या व भाषांतरित संहिता, चीजांचे संग्रह, सतार, तबला, पखवाज, हार्मोनियम यांच्या वादनासाठी तयार केलेली पाठ्यपुस्तके, संगीतेतिहास, कलाकारांची चरित्रे, आठवणी इत्यादी विविध अंगांनी मराठीत लिखाण झाले. पैकी बहुतेक संदर्भात पं. वि. ना. भातखंडे यांचे कार्य पायाभूत ठरते. त्यांच्याच खांद्यावर उभे राहून इतरांनी काम केले असे म्हटले तर वावगे ठरणार नाही.

एकंदरीने पाहता औपपत्तिक विचारात दोन प्रवाह दिसून आले. एकाचा भर राहिला प्राचीन संस्कृत ग्रंथानुसार आजचे संगीत चालू आहे हे सिद्ध करण्यावर. वर्तमान संगीताला लागू पडेल असा औपपत्तिक विचार पुन्हा नव्याने मांडला पाहिजे असा दुसरा पक्ष राहिला. दुसऱ्या पक्षाचे नेतृत्व पं. भातखंडे यांचेकडे राहिले असे म्हणावयास हरकत नाही. १९१० मध्ये वकिली सोडून त्यांनी आपल्याला संगीत संशोधनास वाहून घेतले. हिंदुस्थानी संगीत पद्धती (४ भाग) आणि क्रमिक पुस्तक मालिका (६ भाग) आणि इतरही बरेच लेखन असा हा भातखंड्यांचा लेखनसंसार. १९१० ते १९३६ या काळात त्यांनी पुढील अनेक वर्षे करीत राहता येईल अशा कामगिरीचा नकाशा मांडला.

सौंदर्यशास्त्र, तत्त्वज्ञान, पदार्थविज्ञान वगैरे विचारशाखांच्या अंगाने औपपत्तिक विचाराची घडण होऊ शकते. पण या तऱ्हेच्या विचारासाठी इतर विषयांच्या अभ्यासकांनी संगीताकडे व संगीतकारांनी इतर विषयांकडे वळणे जरुरीचे असत. दोन्ही अंगांनी १९३० नंतरच्या काळात लिखाण नजरेत भरण्यासारखे होऊ लागले. १८५७ मध्ये पहिले विद्यापीठ निघाले हे पाहता त्याचा वेग फारसा निराशाजनक नाही असे म्हटले पाहिजे.



कुमार गंधर्व बैठकीत गात असताना



## (७) नवीन संपर्क माध्यमे व साधने

ब्रिटिश कालखंडात संपर्क माध्यमात व साधनात झपाट्याने आणि मूलगामी बदल झाला. संगीत ग्रहण, प्रयोग, शिक्षण इत्यादी सर्व अंगांवर त्याचा परिणाम झाला.

ध्वनिमुद्रण व ध्वनिमुद्रिका यांची कामगिरी संगीत दृष्टचा फारच व्यापक व दीर्घकालीन राहिली. परंतु विशेषत: १९२० च्या आसपास नाट्यसंगीताच्या ध्वनिमुद्रिका निघू लागल्या व त्या लोकप्रियही झाल्या. त्या सुमारास देशभक्तीपर गीतांची लाट आली आणि या लाटेने महाराष्ट्र व्यापला. कलाकार, प्रकार आणि प्रसंग यांची विविधता ध्वनिमुद्रित संगीतात प्रस्तुत कालखंडात इतकी आढळते की त्यामुळे एक प्रकारे अचंबा वाटतो. लोकसंगीत ते शास्त्रोक्त संगीत, वाद्यसंगीत ते पुढाऱ्यांचे आवाज, देशी भाषा ते इंग्रजी गाणी असे सर्व प्रकार ध्वनिमुद्रिकांनी स्वीकारल्याकारणाने महाराष्ट्रातील जनतेच्या कानात संगीत पेरले गेले हे निर्विवाद. या संदर्भात पुढील घटना––कालसूची ध्यानात घेण्यासारखी आहे :

| | | |
|---|---|---|
| मेणावरचे ध्वनिमुद्रण | .. | १९०१ |
| नाट्यगीतांच्या ध्वनिमुद्रिका | .. | १९२० |
| रहिमत खाँच्या ध्वनिमुद्रिका | .. | १९२० |
| स्वस्त फोनोग्राफ उपलब्ध (जपानी, प्रत्येकी रुपये १५) | .. | १९२८ |
| आकाशवाणीची सुरुवात | .. | १९२८ |
| चित्रपट बोलपट होतो | .. | १९३१ |
| चित्रपटगीताची ध्वनिमुद्रिका | .. | १९३४ |

आकाशवाणी हे माध्यम सुरू झाल्यावर सांगीतिक देणे-घेणे वाढत गेले. (केशवराव भोळ्यांसारख्या संगीत दिग्दर्शकाने लाहोर रेडिओवरचे गीत ऐकून 'पाहू रे किती वाट' हे प्रख्यात चित्रगीत आपण तयार केले असे नमूद केले आहे ! ) वास्तविक पाहता सर्व जनतासंपर्क माध्यमे एकमेकाला प्रतिसाद देत देत वाढत असतात आणि संगीत-नृत्य-नाट्यादी प्रयोगकलांवर होणारे त्यांचे परिणाम संकलित असतात. ह्या क्रियाप्रतिक्रियांचे आलेख नीटपणे समोर आणणे आवश्यक असले तरी अवघड आहे. स्वातंत्र्यपूर्व कालातील ह्या माध्यमांच्या बाबतीतल्या काही घटना पुढे नोंदविल्या आहेत त्यावरून हे लक्षात यावे :

Δ इंद्रसभा चित्रपट प्रकाशित, यात ७१ गाणी (१९३१)
Δ प्रभातची स्थापना व त्याबरोबर टेंबे, भोळे, मा. कृष्णराव इत्यादी मराठी संगीत दिग्दर्शकांचा प्रभावी प्रवेश (१९३१)
Δ 'संत तुकाराम' या चित्रपटास आंतरराष्ट्रीय सन्मान (१९३६)
Δ वाराणशीची एक कंपनी 'वंदे मातरम्'ची ध्वनिमुद्रिका काढते (१९३६)
Δ इंडियन स्टेट ब्रॉडकास्टिंग सर्व्हिस Indian State Broadcasting Service ला ऑल इंडिया रेडिओ म्हणण्यास सुरुवात (१९३६)
Δ वाडियानिर्मित नौजवान (१९३७) मध्ये गाणी नाहीत म्हणून प्रेक्षकांकडून निषेध. गाणी का नाहीत हे सांगणारा एक ट्रेलर तयार करण्यात आला
Δ ऑल इंडिया रेडिओची केंद्रे फक्त ९ व परवाने ६८०. सामूहिक श्रवणाचा प्रचार अर्थपूर्ण (१९३७)
Δ रेडिओच्या कार्यावरचा फिल्डेनचा महत्त्वपूर्ण अहवाल (१९४०). बुखारी संचालकपद घेतात. हार्मोनियमवर बंदी. वझेबुवा इत्यादींचे खास व वारंवार कार्यक्रम
Δ वाडियांनी तयार केलेले संगीतकारांवरचे लघुपट दाखविण्यास थिएटर मालकांचा नकार (१९४२)
Δ विक्रमादित्य संगीत परिषद, मुंबई (१९४४). अल्लादिया खाँ यांचे शेवटचे गाणे.

नावानिशी कामगिरीचा तपशील मांडण्याचा उत्तम मार्ग सोडून स्वातंत्र्यपूर्व कालातील सांगीतिक घडामोडींचा मागोवा घेण्यासाठी महाराष्ट्रात घडलेल्या काही घटनांच्या आधारे प्रवृत्तींवर लक्ष केंद्रित केले. हा दुय्यम मार्ग खरा. पण विहंगमावलोकन



करण्यासाठी उपकारक. कारण व्यक्तिप्रधान विवेचनात भोवतालच्या एकूण परिस्थितीने व्यक्ती शक्य होत असतात, घडत असतात याचा अनेकदा विसर पडतो. स्वातंत्र्यानंतरचा कालखंड हा फार जवळचा आणि शिवाय जास्त गुंतागुंतीचा. त्यात आणि धावता आढावा घ्यायचा या अडचणीतून मार्ग काढण्यासाठी विवेचन निरनिराळ्या मार्गांनी केले पाहिजे.

**स्वातंत्र्योत्तर महाराष्ट्र**

१९४७ नंतर महाराष्ट्राने अनेक बाबतीत आपला सांगीतिक ठसा उमटविला. शासनाने सांस्कृतिक क्षेत्र आपले मानल्याने बऱ्याच नवीन उपक्रमांना स्थान मिळाले. सर्व प्रयत्नांना इष्ट ते व अपेक्षित फळ आले नाही हे खरे, पण तरीही या प्रयत्नांचे महत्त्व कमी होत नाही हे उघड आहे. संगीत संबंधित बाबींचा ओझरता निर्देश करावयाचा तर पुढील तपशील वेधक वाटेल :

Δ सांस्कृतिक कार्य संचालनालय चालू झाल्यापासून परिषदा, महोत्सव, स्पर्धा, आंतरप्रांतीय देवाणघेवाण यांचा प्रतिवर्षी धडाका उडतो! एक आदिम संगीत सोडल्यास सर्व प्रकारच्या संगीतास आश्रय मिळत असल्याकारणाने आवाका मोठा राहिल्यास नवल नाही. प्रशिक्षण शिबिरे, पारितोषिके यांसारख्या उपक्रमांतून नविनांना प्रोत्साहन व जुन्यांना सन्मान मिळतो. एकंदरीने कार्यक्रम महत्त्वाकांक्षी राहतो.

साहित्य-संस्कृति मंडळाच्या स्थापनेबरोबर पुस्तक प्रकाशने, संशोधन प्रकल्पांना मदत यांसारख्या विद्वत् परंपरेत बसणाऱ्या कामांना वाहिलेली संस्था उपलब्ध झाली. संगीताबाबत बोलावयाचे तर रसग्रहण, तात्त्विक चर्चा, चरित्रे, भाषांतरे, सटीप आवृत्त्या इत्यादी अनेक प्रकारे लिखाण प्रसिद्ध झाले आहे. मंडळाच्या या तऱ्हेच्या कार्यामुळे सर्वार्थाने व्यापारी प्रकाशन संस्थांवर अवलंबून राहण्याची पाळी लेखकांवर येत नाही.

Δ १९६२ पासून ट्रायबल रीसर्च इन्स्टिटयूट कार्य करू लागल्याने दीर्घ काळ पूर्णत: दुर्लक्षित राहिलेला संस्कृति गट अभ्यासविषय झाला. या संस्थेच्या कार्यास सांस्कृतिक अंग कमी असले तरी गोळा होणाऱ्या माहितीच्या आधारे सांगीतिक, सांस्कृतिक महत्त्वाचे कार्य करणे शक्य आहे इतके नक्की.

Δ महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती स्थापन होऊन लोकसाहित्याच्या विविध अंगांवर लक्ष केंद्रित करणारी ३० वर पुस्तके आजपर्यंत प्रकाशित झाली आहेत. लोकसाहित्यात लोकसंगीत मोडते हे ध्यानात घेता हा पूर्ण प्रयत्न कौतुकाचा म्हटला पाहिजे.

**इतर संस्था**

स्वातंत्र्योत्तर काळात बिनसरकारी संस्थांचे कार्यही अनेक क्षेत्रांत आणि विविध ठिकाणी चालू राहिले. उदाहरणार्थ :

Δ अखिल भारतीय गांधर्व विद्यालय मंडळातर्फे संगीत कला विहार हे संगीतास वाहिलेले मासिक १९४७ पासून हिंदी-मराठी मध्ये सुरू करण्यात आले. आजपर्यंत ते चालू आहे. मंडळातर्फे संगीत विषयाच्या परीक्षा घेऊन पदव्याही देण्यात येतात.

Δ महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ या संस्थेने इतर विषयांबरोबर संगीतावरही उच्च पातळीवरची पुस्तके प्रसिद्ध केली.

Δ तमाशा कला कलावंत विकास मंदिर ही १९७८ साली स्थापन झालेली संस्था व आधीची तमाशा कला परिषद यांनी लोककलाविष्काराकडे व कलाकारांकडे खास लक्ष देण्याचा चंग बांधला आहे. शिक्षण, विमा, औषधपाण्याची व्यवस्था, मानवेतन इत्यादी सर्व आघाड्यांवर कार्य चालू आहे हे लक्षणीय होय.

Δ इंडियन नॅशनल थिएटरसारख्या नाट्यास वाहिलेल्या संस्थेने लोकसाहित्य संशोधनासाठी खास विभाग उघडला असून लोककलांचे कार्यक्रम वा त्यावर आधारित नाट्यप्रयोग, लोकसाहित्याचे संकलन असे विविध कार्य चालू आहे.

Δ १९६९ च्या आसपास स्थापन झालेल्या नॅशनल सेंटर फॉर द परफॉर्मिंग आर्ट्स व मुंबई विद्यापीठ संगीत विभाग यांनी



संगीतास व्यापक चौकटीत पाहून कार्यक्रम, शिक्षण इत्यादी चळवळी चालू ठेवल्या.

**माध्यमांची वाढती सत्ता**

स्वातंत्र्योत्तर काळात माध्यमांना खूपच वाव मिळाला. रेडिओ, चित्रपट, वर्तमानपत्रे, ध्वनिमुद्रिका ते १९७० नंतर दूरचित्रवाणी, व्हिडिओ असा हा संसार वाढता राहिला. माध्यमांच्या संकलित प्रभावाचे द्योतक म्हणता येतील अशा काही घटना नोंदविता येतील :

- Δ १९४९ मध्ये संगीत शिक्षणाच्या पाहणीसाठी नेमलेल्या शासकीय समितीने चित्रपटसंगीताच्या घातक व वाढत्या प्रभावाबद्दल चिंता व्यक्त केली.
- Δ १९५० पासून चित्रपटसंगीतासाठी पार्श्वगायन सर्रास वापरात आले. लता मंगेशकर ही महागायिका २५ वर्षांवर गात राहिली व २५,००० वर गाणी तिने ध्वनिमुद्रित केली. यात माध्यमाचा वाटा मोठा.
- Δ चुंबकीय ध्वनिफीत भारतात वापरात येऊ लागली (१९५० पासून).
- Δ भारतीय नभोवाणीवरून चित्रपट संगीतास बंदी. १९५२ पासून कलाकारांची परीक्षा घेणारे मंडळ स्थापन झाले. सिलोन नभोवाणीने लघुलहरी प्रक्षेपण सुरू करून भारतास भारतीय चित्रपट संगीत पुरविण्यास लगेच सुरुवात केली.
- Δ 'मुन्ना' हा अब्बास यांचा चित्रपट—एकही गाणे नसलेला (१९५४).
- Δ १९५८ मध्ये लाँग प्लेइंग ध्वनिमुद्रिकांचा प्रचार सुरू.

**हौशी कलाकारांत वाढ**

स्वातंत्र्योत्तर काळात हौशी कलाकारांत खूपच वाढ झाली. हौशी याचा अर्थ ज्यांचा उदरनिर्वाह संगीतविद्येवर अवलंबून नाही असे कलाकार. या कलाकारांनी नोकरी व व्यवसाय करता करता गायन वा वादनाचे शिक्षण घेतले. जुन्या पद्धतीने गुरुकुल पद्धतीने शिकणे वा गायन-वादन वर्गात शिकणे या दोहोंच्या दरम्यान म्हणता येईल अशा पद्धतीने वरील कलाकारांनी आपले शिक्षण चालविले. आकाशवाणीवरचे व दूरचित्रवाणीवरचे कार्यक्रम, ध्वनिमुद्रणे वा लहानमोठे सार्वजनिक कार्यक्रम यांतून हे कलाकार नजरेसमोर येतात. अशांची जंत्री देणे जवळजवळ अशक्य आहे. पण ख्याल, ठुमरी, धृपद-धमार, तराण, टप्पे, भावगीते, नाट्यपदे इत्यादी सर्व गायन प्रकार पुष्कळशा क्षमतेने सादर करण्यात वरील कलाकार यशस्वी झाले आहेत.

गायनाखेरीज महाराष्ट्राने तबलावादनात चांगले लक्ष दिले आहे. दिल्ली, बनारस इत्यादी प्रमुख घराणी महाराष्ट्रात रुजली आहेत. सतारही वाजती आहे. त्या मानाने सारंगीकडे पाहिजे तितके लक्ष दिलेले दिसत नाही. पण असे जवळजवळ भारतभर सर्वत्र झाले आहे. सरोद थोडेफार वाजते आहे. एकंदरीने पाहता वाद्यसंगीताकडे महाराष्ट्राने कमी लक्ष दिले आहे असे दिसते.

लोकसंगीताबाबत बोलावयाचे तर त्यावर मुख्यत: चित्रपटाने मात केली आहे. म्हणजे असे की चित्रपटात जे लोकसंगीत म्हणून वावरते त्याची नक्कल मूळ लोकसंगीत करू लागले आहे. लोकसंगीताच्या चाली, नृत्ये, त्यातील वाद्ये व काव्ये आणि त्याबरोबरचा अभिनय या सर्वांवर चित्रपट लोकसंगीताची छाप पडलेली दिसते. बैठकीची वा अदाकारीची लावणी जवळजवळ भूतकाळात जमा झाली आहे. जुने साहित्य माहित असलेले तमासगीरही हाताच्या बोटावर मोजण्याइतके राहिले आहेत. पारंपरिक लोककलाकार शिक्षण घेऊन पेशा बदलतात वा चित्रपट इत्यादी माध्यमातून उदरनिर्वाह करू पाहतात. एका दृष्टीने पाहिले तर या सर्व घटना नैसर्गिक म्हटल्या पाहिजेत.

एकंदरीने धावता आढावा घेतल्यावर महाराष्ट्राचे संगीतप्रेम नकली नाही असे ठामपणे म्हणता येते. त्याचप्रमाणे ते बरेचसे समावेशक आहे असेही. मुंबईसारख्या महानगरात सिंधी, पारशी असे समाज आहेत. त्यांचे स्वत:चे संगीत आहे. पण त्याकडे महाराष्ट्राचे लक्ष गेलेले दिसत नाही. प्रचार व अभ्यास, रक्षण व संशोधन इत्यादी अनेक आघाड्यांवर झालेली कामगिरी बऱ्या दर्जाची आहे. मागे पाहिल्यावर समाधान वाटावे व पुढे पाहताना आशा वाटावी असे हे चित्र आहे.

*पुढील पानावर : वेरूळच्या लेण्यातील गंधर्वाचे सुंदर शिल्प*



ज्ञानदेवमहाराजांची समाधी, आळंदी

# मराठी साहित्य

सरोजिनी वैद्य

१९३८ मध्ये स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांच्या अध्यक्षतेखाली मुंबईत अखिल भारतीय साहित्यसंमेलन भरले. या संमेलनात एकभाषी मराठी राज्य व्हावे अशी मागणी करण्यात आली. पुढे १९४६ मध्ये कादंबरीकार ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या अध्यक्षतेखाली बेळगावात झालेल्या संमेलनात साहित्यिकांनी संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा ठराव मंजूर केला. ह्यानंतर ही मागणी प्रत्यक्षात यावी यासाठी दीर्घकाळ चळवळ झाली आणि बावीस वर्षांच्या कालावधीनंतर १ मे १९६० रोजी संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाला. ह्याच वर्षी मराठी साहित्यसंमेलन ठाण्याला प्रा. रा. श्री. जोग यांच्या अध्यक्षतेखाली झाले. अध्यक्षीय भाषणात प्रा. जोगांनी संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीबद्दल आनंद व्यक्त करून दोन अपेक्षा व्यक्त केल्या. पहिली अपेक्षा वादग्रस्त सीमाभागाचा प्रश्न लवकरात लवकर सोडविण्याबद्दलची तर दुसरी मराठी भाषेचा वापर सर्व थरांतील शिक्षणासाठी आणि दैनंदिन व नैमित्तिक अशा सर्व व्यवहारात करण्यासंबंधीची होती. आजही या दोन्ही अपेक्षा पूर्ण झालेल्या नसल्या तरी एकभाषिक राज्याची झालेली निर्मिती मराठी साहित्याच्या क्षेत्रात विशेष चलनवलन निर्माण करण्याला कारणीभूत झालेली आहे असे दिसते. मराठीच्या अनेक बोलीभाषांचा आणि भाषिक लकबींचा परस्परांना झालेला परिचय ही त्यातील अगदी प्राथमिक गोष्ट आहे. ह्यावर आधारलेली भाषेद्वारे होणारी जीवनस्थितीची ओळख परस्परांबद्दलच्या समजुतीला, सांस्कृतिक विकासाला आणि स्पर्धेला पोषक ठरण्याची प्रक्रिया सुरू झालेली आहे हे आपण दैनंदिन जीवनात अनुभवत आहोतच.

**विपुल**

आज मराठी साहित्याचे विश्व कोणकोणत्या गोष्टींनी गजबजलेले आहे ह्याची थोडीशी कल्पना आपल्याला 'ललित' किंवा 'साहित्यसूची' सारख्या साहित्याशी कला आणि व्यवसाय या दोन्ही नात्यांनी निगडित असलेल्या मासिकांच्या वरवर चाळण्यातूनही सहजपणे येऊ शकते. दर महिन्याला पुष्कळ रंजनपर साहित्य बाजारात येत असते. त्याला आणि शैक्षणिक अभ्यासक्रमाशी संबंधित साहित्याला विशेष चांगली मागणी नेहमीच असते. याउलट आज कविता संग्रह जरी पूर्वीपेक्षा जास्त प्रकाशित होत असले तरी त्यांचे प्रकाशन हा वराचसा हौसेचाच मामला आहे. हौस दोन्ही बाजूंची! विपुल संख्येने निर्माण होणाऱ्या कवींची आणि काव्यप्रकाराच्या प्रतिष्ठेची समज असणाऱ्या काही प्रकाशकांचीही! मासिकांतून येणाऱ्या जाहिरातींतील अनेक पुस्तके त्यांच्या सणसणीत किंमतीमुळे रसिकांना आपल्या आवाक्यातील वाटत नाहीत, परंतु त्यावरही सवलतींच्या अनेक योजना जाहीर झालेल्या दिसतात. अनेक बुक क्लब्स, छोटी मोठी ग्रंथालये, प्रकाशनपूर्व सवलती इत्यादींद्वारे लेखक वाचकांची गाठभेट कशीबशी होत आहे. प्रतींची संख्या वाढत नाही म्हणून अधिक किंमत व किंमत अधिक म्हणून संख्या कमी हे त्रांगडे अजून सुटलेले नाही. त्यासाठी वाचक मेळावे, वाचकांच्या चळवळी उभ्या राहतात. अनेक चोखंदळ वाचक त्यांना आवडलेली पुस्तके संपादकांना कळवितात तेव्हा मानमान्यता, पारितोषिके यांच्या दिशेने त्या पुस्तकांची वाटचाल सुरू होते. मिळणारी पारितोषिके शंभरापासून दहा हजारांपेक्षाही अधिक रकमेची, काही सरकारी, काही खाजगी व्यक्ती आणि संस्थांची असतात व ती मोठ्या समारंभाने दिली जातात. त्यासाठी अनेकदा विविध



साहित्यप्रकारांच्या स्पर्धा जाहीर होतात. वर्षभरात त्या प्रकारांची स्वतंत्र छोटी साहित्यसंमेलने प्रदेशानुसार, तालुका-जिल्ह्यानुसार भरलेली असतात. एकेका लेखकाच्या विपुल निर्मितीतून निवडक साहित्य प्रकाशित करण्याच्या योजना आढळतात. अनेक ठिकाणी पुस्तकांच्या यात्राजत्रा भरतात. निर्माण झालेले विश्वकोश आणि सूची साहित्य अभ्यासकांना साह्यभूत होते. प्रकाशकांच्या मुलाखतींतून मागणी पुरवठ्याचे व नव्या संकल्पांचे अंदाज प्रगट होतात. पाककला, आरोग्य, लैंगिक जीवन आदी विषयांवरील अर्धशास्त्रीय माहितीपूर्ण पुस्तकांना असलेल्या मागणीतून त्या विषयांवरील जुन्या पुस्तकांचेही पुनर्मुद्रण होते. वृत्तपत्रांच्या साप्ताहिक आवृत्त्या नवनवीन पुस्तकांची परीक्षणे छापतात. धार्मिक साहित्याची परंपरा अजून स्थिरपणाने तशीच चालू आहे, हेही त्यामधील दररोजच्या जाहिरातीवरून लक्षात येते. पुस्तकांच्या आशयाइतकेच त्यांची छपाई, मांडणी यांनाही महत्त्व आहे, हे ओळखणारे मराठी प्रकाशक दिल्लीहून अखिल भारतीय पातळीवरची पारितोषिके घेऊन येतात. अधूनमधून नवनवीन अनियतकालिके बंडखोर भूमिकेतून निघतात. दिवाळीच्या आसपास दिवाळी अंकांचे भरघोस पीक येते. त्यांच्यातून त्या वर्षीचे 'अक्षर साहित्य' वेगळे निघते. उत्तम अंकांना सन्मान लाभतात. साहित्य विश्वातील चैतन्याची लक्षात येणारी ही किंचितशी झलक एखादा प्रकाशक विदेशात स्थायिक झालेल्या मराठी लेखकांच्या कथांचा संग्रह विदेशात जाऊन प्रसिद्ध करतो तेव्हा किंवा कोणत्यातरी देशी परदेशी प्रतिष्ठानाची शिष्यवृत्ती मिळवून एखादा लेखक परदेशाची यात्रा करून येतो तेव्हा थोडी विशेष आनंदाने विस्मितही करते. पण या प्रकारच्या गजबजलेल्या देखाव्यावर समाधान मानण्याची वृत्ती नसणाऱ्या अनेक लेखक-वाचक-प्रकाशक-समीक्षकांना एकूण साहित्य क्षेत्रांतर्गत परिस्थितीवरचे विश्लेषक भाष्य करणे भागच असते. कालमानाबरोबर वाढणारी संख्या व वैविध्यपूर्णता एवढेच काही विकासाचे गमक नसते; म्हणून आज साहित्यातील कोणते प्रकार पूर्वीच्या तुलनेने संपन्न वाटतात? दर्जेदार, वैचारिक आणि वाङ्मयीन नियतकालिके अजूनही मराठीत स्वतःच्या पायावर का उभी राहत नाहीत? आहे ही स्थिती सुधारण्यासाठी समाजाने व शासनाने आणखी काय काय करावयास हवे? ह्या सर्व बऱ्यावाईट वस्तुस्थितीशी संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीचे नेमके नाते कितपत जुळले आहे? असे अनेकविध प्रश्न त्यांना विचारावेसे वाटतात व ते सोडविण्याच्या प्रयत्नात गेल्या वीस-पंचवीस वर्षांतील वाङ्मय क्षेत्रातील जे वास्तव त्यांच्यासमोर उभे राहते ते सर्वसाधारणपणे पुढीलप्रमाणे असते :

*सुप्रसिद्ध संस्कृत कवि कालीदास याने रामटेक येथील पर्वतावर (तेव्हाचा रामगिरी) 'मेघदूत' हे महाकाव्य लिहिले. या महाकवीच्या स्मरणार्थ रामटेक येथे उभारलेले सुंदर स्मारक*

**कक्षा वाढल्या**

गेल्या पंचवीस वर्षांत पूर्वीच्या तुलनेने शाळा, महाविद्यालये आणि विद्यापीठे जशी वाढलेली आहेत, तशीच त्यांची कार्यक्षेत्रेही विविध ज्ञानशाखांमध्ये आणि शहरांबरोबर ग्रामीण भागांतही विस्तारलेली आहेत. ह्याचा परिणाम थोडा वाचकवर्ग वाढण्यावर जसा झाला आहे तसाच वेगवेगळ्या जाती जमातीमधील व पेशांमधील लेखक पुढे येण्यातही झाला आहे. डॉ. आंबेडकरांच्या दलितोद्धाराच्या चळवळीइतकेच व्यापक शिक्षणप्रसाराला आजच्या दलित साहित्य निर्मितीचे श्रेय आपल्याला द्यावे लागते. स्वतःच्या बोलीभाषेत स्वतःचे अनुभव कथन करणाऱ्या दलित लेखकांनी मराठी साहित्याच्या मध्यमवर्गीय कक्षा विस्तृत केल्या आहेत आणि भाषिक आविष्कारात संपन्नता आणली आहे हे निर्विवाद आहे. दलितांच्या जीवनातील अनेकविध गोष्टींच्या अभावाची कारणे भारतीय समाज व्यवस्थेशी आणि परंपरेशी निगडित असल्यामुळे दलित साहित्यातील तीव्र बंडखोरीची आणि विद्रोहाची भावना जरी स्वाभाविक असली तरी ती कितपत स्वाभाविकपणे कलात्मकतेने प्रगट होते आहे ह्यावरही समीक्षकांचे लक्ष आहेच. आपली सामाजिक चळवळ प्रखर करण्याचे एक साधन म्हणून लेखनाकडे पाहणारा दलित लेखक आपले वैचारिक-भावनिक प्रतिक्रियाविश्व विशिष्ट राजकीय विचारसरणीशी बांधून टाकतो तेव्हा त्याचा त्याच्या गुणवत्तेवर प्रतिकूल परिणाम होताना आढळतो म्हणून एकीकडे जशी खंत व्यक्त केली जाते तशीच दुसरीकडे



नेमकी त्याच कारणासाठी त्या लेखकाला उचलून धरण्याची अहमहमिकाही सुरू झालेली आढळते! सर्वसामान्य दलितांना आपल्या उद्रेकी स्वरूपाच्या जाणिवा व्यक्त करायला काव्य-कथा हे साहित्यप्रकार जवळचे वाटतात. समग्र तपशीलवार अनुभव कथनासाठी आठवणी, दैनंदिनी, आत्मचरित्रे यांकडे वळावेसे वाटते. उपरा, बलुतं, आठवणींचे पक्षी, देवाचे गोठणे इत्यादी. पण नाटक आणि कादंबरी हे विस्तृत व वस्तुनिष्ठ वृत्तीची अपेक्षा करणारे साहित्यप्रकार मात्र अजूनही त्यांच्या आवाक्यात आलेले नाहीत. दलितांची कविता त्यांच्या चळवळीतील एक शस्त्र म्हणून अवतरते तेव्हा ती स्वाभाविकपणेच समूहाची-आम्हीची भाषा बोलते आणि कधी अवास्तव पद्धतीने आक्रमक वा आशावादीही होते. व्यक्तित्वाच्या वैशिष्ट्यांसह प्रगटणारी स्वतःची जोरकस भाववृत्ती घेऊन येणारी त्यांपैकी काही कवींची कविता (ढसाळ, मेश्राम, मनोहर आदी) स्वतंत्रपणे तर महत्त्वाची असतेच, पण ती रसिकाला आजवरच्या मराठी कवितेच्या स्वरूपालाही अंतर्मुखतेने न्याहाळायला लावते. दलित कवितेप्रमाणेच दलित आत्मकथांतील तपशिलांनी संवेदनाशील वाचकांना स्वतःकडे बघण्याचे एक वेगळे परिमाण उपलब्ध करून दिले आहे. अलीकडे स्वतः दलित लेखकही आपल्या अनुभवांकडे अनेक अंगांनी आणि थोड्याशा अलिप्तपणाने पाहण्याची गरज दलित संमेलनातून मांडत आहेत. हा एक विकासाचा पुढचा टप्पा म्हणावा लागेल. औरंगाबादच्या अस्मितादर्शासारखी सातत्याने कार्यशील राहिलेली मासिके ह्या वाटचालीतील अनेक प्रक्रियांना महत्त्वाची चालना देण्यास कारणीभूत झालेली आहेत.

**स्त्रियांचे लेखन**

दलित साहित्याप्रमाणे गेल्या पंचवीस वर्षांत वैपुल्याने आणि वैशिष्ट्यांसह प्रगटले आहे ते स्त्रियांचे लेखन! हा देखील वाढलेल्या स्त्रीशिक्षणाचा आणि त्यायोगे थोड्याबहुत लाभलेल्या व्यक्तिस्वातंत्र्याचा व अभिव्यक्तीच्या स्वातंत्र्याचा परिणाम आहे. पूर्वीसारखे त्यांचे अनुभवविश्व आज केवळ कौटुंबिक



जीवनापुरते मर्यादित राहिलेले नाही. पण कुटुंब जीवनातील भावसत्ये प्रगट करताना दिसणारी त्यांची नेहमीची सांकेतिकता अद्याप पुरेशी नष्टही झालेली नाही. किंबहुना सर्व वाङ्मयप्रकारांत लिहिणाऱ्या स्त्रियांची संख्या जेवढी वाढली तेवढी त्यांच्यातील सर्वसाधारण गुणवत्ता मात्र वाढलेली नाही. अनेक लेखिका (अनेक पुरुषांप्रमाणेच) वाचकांच्या करमणुकीची जबाबदारी स्वीकारून भावुक, नाटकी आणि नखरेल लिहिण्याच्या मागे आहेत व त्यांना मोठ्या प्रमाणात भेटलेला त्यांचा चाहता वाचकवर्ग त्यांची साहित्यविषयक समजूत बरोबर असल्याचा विश्वास त्यांच्या ठिकाणी निर्माण करतो आहे. तथापि स्त्रियांच्या लेखनाबद्दल चिंता व्यक्त करणाऱ्या समीक्षकांनासुद्धा काही निवडक स्त्रियांचीच कथा, काव्य, आत्मचरित्र आणि ललित गद्याच्या क्षेत्रातील कामगिरी त्या त्या वाङ्मयप्रकारातील एक मानदंड म्हणूनही स्वीकारावीशी वाटलेली आहे. आज स्त्रियांची प्रसिद्ध होणारी आत्मचरित्रे आपापले वास्तव जीवनानुभव मोठ्या धीटपणाने शब्दांकित करीत आहेत. ती कळतनकळत निरनिराळे मुखवटे चढवून सहसा लिहिली गेलेली नाहीत. त्यांच्या लेखनातील मन:पूर्वकता हेच त्यांचे विशेष बळ आहे आणि काही दडपणांतून वा संकुचित परीघातून आपले जग न्याहाळणे ही त्यांची मर्यादा आहे. अलीकडच्या काळातील अनेक कलावंत स्त्रियांची आत्मचरित्रे ह्या गुणदोषांची साक्ष जाणकाराला पटवतात. इरावती कर्वे, दुर्गा भागवत यांनी संशोधनाच्या व ललित गद्याच्या क्षेत्रात, तर इंदिरा संत, कमल देसाई, गौरी देशपांडे आदींनी कविता, कथा, दीर्घकथा ह्या क्षेत्रांत संपादन केलेले यश व्यापक साहित्यक्षेत्रातही सन्मानास पात्र ठरावे असेच आहे. या लेखिका आपल्याला जाणवलेले सूक्ष्म, तरल, आंतरिक वास्तव ज्या दमदार पद्धतीने व हळुवार काव्यात्मकतेने व्यक्त करतात त्याने अनेक नव्या चांगल्या लेखिका प्रभावित झालेल्या आहेत. रामायण-महाभारतातील कौटुंबिक-सामाजिक जीवनावरोबरच आपल्या भोवतीच्या अत्याधुनिक जीवनातील गुंतागुंतीच्या भावविश्वापर्यंतचा मोठा टप्पा या दर्जेदार लेखिकांच्या आटोक्यात आलेला दिसतो. हे दृश्य उदयोन्मुख लेखिकांच्या मनात विशेष आत्मविश्वास निर्माण करणारे आहे.

सामाजिक परिस्थितीशी संलग्न अशा या दोन घटकांचा प्रारंभी विचार केल्यानंतर मराठी साहित्यातील निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांतील घडामोडींकडे दृष्टिक्षेप टाकल्यास जे दृश्य दिसते तेही गुणवत्तेच्या संदर्भात काहीसे संमिश्रच आहे. १९६० नंतरचा काळ हा तत्पूर्वीच्या नवकथा, नवकविता, नवकादंबरी यांच्या उत्कर्षानंतरच्या उतरणीचा काळ आहे. १९४५ ते १९६५ मध्ये मर्ढेकरयुग त्याच्या ऐन बहरात होते. त्याने ते सुरू होण्यापूर्वीच्या काळातील लेखकांवरही प्रभाव पाडलेला होता. साहित्यविषयक नवी जाण लेखक-वाचकांच्या मनात निर्माण केली होती. परंतु लवकर निर्जीव साचेबंदपणा देऊन मर्ढेकरांच्या कलावादाची, रूपवादाची अर्धी-कच्ची मीमांसा कानावर पडलेले लेखक-वाचक-समीक्षक आवर्तात फिरू लागले आणि नवेपणातील चैतन्य ओसरत चालले. समीक्षा व्यवहारात प्रत्यक्ष कलाकृतीपेक्षा कलास्वरूपशास्त्राचा तात्त्विक विचार (तोही कित्येकदा अशास्त्रीय पद्धतीने) अधिक होऊ लागला आणि व्यापक समकालीन जीवनाशी, समकालीन साहित्याशी व समकालीन समीक्षेशी जाणकार वाचकाचेही नाते विरल होत चालले. हे संमिश्र चित्र प्रत्येक साहित्यप्रकाराच्या विहंगमावलोकनात लक्षात येते.

**कादंबरीतील दोन प्रवाह**

मराठी कादंबरीच्या आधुनिक काळातील सव्वाशे वर्षांच्या इतिहासात मुख्यत: दोन प्रवाह स्पष्टपणाने दिसत आले आहेत. 'यमुनापर्यटन' या मराठीतील पहिल्या कादंबरीपासून व्यक्ती व समाज यांच्या परस्पर संबंधांतून निर्माण होणारे, अस्वस्थ करणारे वास्तव कादंबरीविश्वात प्रगटलेले आपल्याला दिसते. हा एक प्रवाह आहे. कधी हे पूर्णपणाने कादंबरीचा कलात्मक आकार धारण करू शकलेले नसले तरी साहित्याचे महत्त्व जीवनानुभवांच्या



कसदार व प्रामाणिक आविष्काराशी निगडित करणाऱ्या मंडळींना हे लेखन महत्त्वाचे वाटलेले आहे. दुसरा प्रवाह 'यमुनापर्यटन'च्या जवळजवळ समकालीनच असणाऱ्या 'मुक्तामाले'पासूनच सुरू झाला असून आजच्या समकालीन, अद्‌भूतरम्य वाङ्‌मयीन संकेतांनी व्यापलेल्या लिखाणापर्यंत तो चालत आलेला आहे. मधल्या वाटचालीत आपल्याला या दोन्ही प्रवाहांतर्गत अनेक वेगवेगळे असे नमुने आढळतात. तसेच दोन्हींच्या मिश्रणांचेही विविध आविष्कार कादंबरीच्या इतिहासात दिसतात. गेल्या पंचवीस वर्षांत या दोन्ही प्रवृत्तींनी जे वळण घेतले ते काहीसे वैशिष्ट्यपूर्णच म्हणता येईल. वास्तवाचा मागोवा घेणाऱ्यांनी वैविध्यपूर्ण प्रादेशिक कादंबरीची तर अद्‌भूतरम्यतेची ओढ असणाऱ्या लेखकांनी ऐतिहासिक, पौराणिक वा सामाजिक आशयावर अधिष्ठित असणाऱ्या चरित्रात्मक कादंबरीची कास धरलेली आहे. बळी, रथचक्र, पडघवली, बनगरवाडी आदींपासून सुरू असणाऱ्या अनागरी परंपरेत नंतरच्या काळात फकीरा, पाचोळा, माणूस, धग, गोतावळा, टारफुला यांसारख्या महत्त्वाच्या कलाकृतींची ज्याप्रमाणे भर पडली आहे त्याप्रमाणेच नागरी भौगोलिक स्थितीशी निगडित असणाऱ्या महानगराच्या आसपासचे अनुभवविश्व प्रगट करणाऱ्या आधुनिक जीवनाचा वेध घेणाऱ्या कादंबऱ्यांचीही भर पडलेली आहे (वैतागवाडी, चक्र, लव्हाळी, माहीमची खाडी, मुंबई दिनांक, सिंहासन, कॅलिडोस्कोप, अरे संसार संसार). कोसला, रेणू, अवलोकिता, काळोखाचे अंग ह्या या प्रकारातील कादंबऱ्या कधी अधिक मानसिक तर कधी काव्यात्म अंगाने प्रगटल्या आहेत. त्यांतील तात्त्विक सूचकता चर्चेचा गहन विषय अजूनही आहे. १९६० च्या आसपासची पंचवीस-तीस वर्षांतील ही निर्मिती आजचे नागर-अनागर जीवन आणि साहित्य यांच्यामधील अंतर कमी करणारी आहे.
तर दुसऱ्या प्रकारातील चरित्रात्मक कादंबरी हे अंतर कायम राखण्याच्या भूमिकेलाच विशेष महत्त्व देणारी आहे. गतकालातील व्यक्तींचे जीवन पाहताना कादंबरीकार तो काळ, परिस्थिती, व्यक्ती यांच्या परस्पर संबंधांच्या खोलात फार न जाता आकर्षक पद्धतीच्या चरित्रकथनावर भर देत आहेत. म्हणून तुलनेने हे लेखक पलायनवादीही मानले जातात. गतेतिहासाचे हे नाट्यात्मक दर्शन बहुसंख्य मराठी वाचकांना फार भारावून टाकत असून त्यांच्या अस्मितेला खतपाणी घालणारे आहे असे त्यांना वाटते (स्वामी, ययाती, मृत्युंजय, आनंदी गोपाळ, झेप, शहेनशहा इत्यादी). वाङ्‌मयीन नवेपणाची जाणीव पहिल्या लेखनात विविध प्रकारे दिसते. अनुभवांकडे बघण्याची लेखकांची दृष्टी, त्यांनी केलेला भाषेचा वापर, कादंबऱ्यांतील अनेक घटकांची रचना व सुचविलेले जीवनचिंतन त्यांच्या वाचकांनाही संस्काररूपाने विकसित करते. या दृष्टीने कोसला या भालचंद्र नेमाडे यांच्या कादंबरीने इतिहासच घडविला असे म्हणावयास हवे. एकूण विविध जातीजमातींचे विविध प्रदेशांतील विविध थरांतून आलेले कादंबरीकार या काळात लिहिते झाल्यामुळे मराठी समाजाचे अधिक व्यापक दर्शन या काळात कादंबरीत झाले असेही म्हणता येईल. कादंबरी हा या काळातील अत्यंत लोकप्रिय साहित्यप्रकार या प्रकारे संमिश्र चित्र प्रगट करतो.

**कथा**

या काळातील मराठी कथा १९४५ ते १९६० मधील उत्कर्षावस्थेचा अधूनमधून थोडा प्रत्यय देणारी जशी आहे तशीच काही नवे उन्मेष व्यक्त करणारीही आहे. नवकथेने अनुभव हा कथेचा आत्मा समजून अनुभव घेणारे लेखकांचे मन त्याहून वेगळे नाही हे अभिव्यक्तीबाबत गृहीत धरले होते. तिच्यातील अंतर्मुखता केवळ चिंतन मननातून नव्हे तर कथेच्या सर्व घटकांमधून (भाषा, प्रसंग, मांडणी आदी) प्रत्ययाला येत होती. गाडगीळ, गोखले, भावे, माडगूळकर, मोकाशी, शांताराम, पाटील, मिरासदार इत्यादी तिचे मानकरी शहरी आणि ग्रामीण जीवनानुभवांचे गंभीर व विनोदी दृष्टिकोनातून चित्रण करीत होते. माणसाच्या स्थिर व गतिमान मन:स्थितीला विविध मार्गांनी शब्दबद्ध करण्याची त्यांची धडपड पुष्कळच यशस्वी ठरलेली होती. मनाचे अंधारे तळकोपरे धुंडाळताना त्यांचे माणसावरचे प्रेमही व्यक्त होत होते. परंतु

*राम गणेश गडकरी : महाराष्ट्राच्या नाट्य क्षितिजावर अल्प काळ चमकून गेलेल्या या थोर नाटककाराची जन्मशताब्दी महाराष्ट्रात नुकतीच साजरी झाली*



नवकथेच्या नंतरच्या शहरी जीवनाचे चित्रण करणाऱ्या नव्या तरुण लेखकांना जीवनविषयक अलिप्ततेने व अश्रद्धेने ग्रासलेले असावे. ही कथा वाचकाला गोडी लावू शकत नाही. कित्येकदा अनाकलनीयही राहिली. या दोघांच्या मधील चिरमुले, पुंडलीक, खानोलकर, जातेगावकर आदींची पिढी नवकथेने प्रवर्तित केलेले काही विशेष अधिक समृद्ध करणारी असून तिचे भरीव कार्य कथेची परंपरा व नवे आविष्कार यांना जोडणारा एक महत्त्वाचा दुवा म्हणून लक्षात घेण्यासारखे आहे.

ह्यांच्यापैकी या काळातील ग्रामीण कथालेखक ग्रामीण वास्तवाचे, तेथील जीवनकलहाचे ग्रामीण भाषेत जे चित्रण करतात ते सहानुभूती व उपरोध या दोन्ही जाणिवांतून प्रगटलेले आढळते. आनंद यादव, रा. रं. बोराडे, सखा कलाल, चारुता सागर, महादेव मोरे इत्यादींनी आपापल्या व्यक्तित्वाशी इमान राखून, कधी ग्रामीण जीवनातील लैंगिक व्यवहारावर भर दिला, कधी त्यांच्या दुःखाचे ओझे प्रगट केले, कधी कौटुंबिक संबंधातील नाजूक हळव्या भावच्छटा व्यक्त केल्या तर कधी तेथील तीव्र संघर्षांना, शोषणाला तोंड फोडले. तथापि राजकारणाचा व औद्योगिकीकरणाचा प्रादुर्भाव जुन्या ग्रामीण जीवनाला पूर्णपणे बदलून टाकून गेला आहे. आजच्या या कथेत आजचे हे वास्तव फार मर्यादित प्रमाणातच प्रगट झाले आहे. बहुतेक ग्रामीण कथा एकेरी व्यक्तिचित्रात्मक किंवा हलके फुलके किस्से सांगणाऱ्या आढळतात. भाषेच्या शुद्धाशुद्धतेचा जुना दंडक या सर्वच लघुकथाकारांनी नाकारलेला असल्यामुळे त्यांच्या अनुभवाचा शाब्दिक आविष्कार ग्रामीण जीवनाला जवळचा असतो. पण त्यात जीवनदर्शन मात्र अस्सल नसते, वरवरचे असते. दलित कथेप्रमाणे या ग्रामीण कथेनेही मराठी साहित्याच्या सीमा विस्तारलेल्या आहेत. उद्धव शेळके यांनी वैदर्भीय सुखदुःखांचे सामान्यांच्या जीवनातील नाट्य याच प्रदेशाच्या बोलीतून मूर्त केले. आ. ना. पेडणेकर, मधु मंगेश कर्णिक, इत्यादींनी कोकणातील माणसांच्या सांस्कृतिक, धार्मिक जीवनाबरोबरच दारिद्र्याची आणि इरसालपणाचीही ओळख करून दिली हे जुन्याच्या पुढचे एक नवे पाऊल म्हणता येईल.



कथाक्षेत्रात या काळात विशेष महत्त्वाचे ठरलेले लेखक आहेत ते जी. ए. कुळकर्णी. १९६० च्या आसपासचे नागर कथालेखक माणसाचे स्वातंत्र्य, त्यावरील बंधने व मर्यादा यांचा विचार करू लागले तेव्हा त्यांना सुन्न करणारा एकटेपणा विशेषत्वाने जाणवू लागला. माणसाच्या कल्पकतेला, बुद्धीवैभवाला छेद देऊन जाणारी नियतीची अजस्र शक्ती त्यांच्या भावविश्वाला घेरते आहे असेही जाणवले. यांत्रिक जीवनातील निर्जीवपण पूर्वीही बोचू लागलेले होते पण आता जीवनाची अर्थशून्यता अधिक वाटू लागली. मानवी अस्तित्वाचे हे वेगळे भान मराठी कथेत व्यक्त झाले ते खानोलकर, कमल देसाई, विलास सारंग, अनिल डांगे, दिलीप चित्रे, सानिया इत्यादींच्या लिखाणातून. या सर्व जाणिवांचा भव्य स्वरूपात कल्पकतापूर्ण असा आविष्कार झाला तो जी. ए. कुळकर्णी यांच्या कथेत. स्वतःच्या तात्त्विक आकलनाला अनेक पात्रांच्याद्वारे व्यक्त करताना प्रतिकात्मक निवेदने, संवाद, प्रसंग निर्माण केल्यामुळे जी.एं.च्या कथांची सूचकता उलगडून पाहण्याची गरज तयार होते. त्यातून त्यांच्या साहित्याची समीक्षा भरपूर प्रमाणात झाली. आजवरचे परंपरागत चालत आलेले कथांचे रूपबंध जी.एं.नी आपल्या मनातील आजचा चिंतनमयी आशय व्यक्त करण्यासाठी नवेपणाने वापरले आहेत. १९६० पूर्वीच्या कथेत जसे गाडगीळ हे महत्त्वाचे नाव तसे १९६० नंतरच्या कथाक्षेत्रातील जी. ए. कुळकर्णी हे नाव आहे.

या जीवनविषयक विशिष्ट तात्त्विक आकलनाशी प्रत्यक्षतः नाते नसणारी आजच्या कथा साहित्यातील दुसरी बळकट धारा आहे ती शरश्चंद्र चिरमुले, विद्याधर पुंडलिक, विजया राजाध्यक्ष, श्री. दा. पानवलकर, आनंद जातेगावकर, ह. मो. मराठे, गौरी देशपांडे इत्यादींची. या प्रत्येक कथाकाराला त्यांच्या त्यांच्या अनुभवविश्वाचे सखोल व व्यामिश्र स्वरूप जसे व्यक्त करता आले आहे; तसेच स्वतःचा वेगळा असा ठसा असलेली आणि अनुभवाच्या स्वरूपाला नेमकेपणाने झेलणारी संरचनाही उभी करता आलेली आहे. या काही विशेष कसदार लेखन करणाऱ्या कथाकारांखेरीज अनेक इतर लहानमोठे कथालेखक मराठीत विपुलत्वाने नियतकालिकांतून आज लिहीत आहेत. रहस्यकथा, विज्ञानकथा, भूतकथा, कुटुंबकथा अशा वेगवेगळ्या क्षेत्रांतील हे कथालेखन सर्वसाधारण वाचकाची वाचनाची गोडी आणि भूक वाढवीत आहे. इतर वाङ्मय प्रकारांच्या तुलनेने एकूणच मराठी कथा हा विशेष वैविध्यपूर्ण वाङ्मय प्रकार असून सर्वसामान्य वाचकांचा त्याला चांगला आश्रयही आहे.

**कविता**

गेल्या वीस-पंचवीस वर्षांत मराठीत लिहिली गेलेली विपुल कविता प्राधान्याने मुक्तछंदात्मक आहे. पॉप्युलर प्रकाशनाने 'नवे कवी—नवी कविता' या मालेत निवडक कवींची कविता प्रसिद्ध करून त्यांपैकी काही कवींची स्वतंत्र काव्यवैशिष्टचे रसिकांसमोर आणण्याचा महत्त्वाचा प्रयत्न केला. आजच्या कवितेचा चेहरा हरवलेला आहे, ही 'गवता ऐशी उदंड' वाढलेल्या कवितेसंबंधातील, आजच्या समीक्षकांची एक मुख्य तक्रार आहे. मर्ढेकरप्रणीत नवकाव्याने व त्या युगात निर्माण झालेल्या काव्यविषयक विशिष्ट समजुतींमुळे मराठी कवितेचे अंतरंग व बहिरंग पुष्कळच बदलले, पण काव्याचे नवेपण त्यातील आशयापेक्षा त्यातील प्रतिमांच्या नाविन्यावर अवलंबून असते असे १९५० मध्ये मर्ढेकरांनी म्हटल्यानंतर कवितेचे प्रतिभायुक्त स्वरूप जेवढे स्वाभाविक गरजेतून तेवढेच नवेपणाच्या उपऱ्या हव्यासातूनही प्रगटले. काव्यासारख्या अधिक आत्मनिष्ठ असणाऱ्या वाङ्मय प्रकारातील गुंतागुंतीच्या प्रतिमा उलगडून कविता जाणणे हे वाचकाला अवघड गेल्यामुळे पुष्कळशा चांगल्या वाचकांचेही कवितेशी या काळात नाते तुटत गेले आहे. काव्यातील दुर्बोधता हा आजही वेगवेगळ्या पातळीवरून एक छळणाराच प्रश्न आहे. या प्रतिमायुक्त शैलीइतकीच जुनी वक्तृत्वपूर्ण, निवेदनात्मक वा आवाहनात्मक शैली आजच्या काव्यात बरीच वापरली जाताना दिसते. सामाजिक आशयाची या शैलीतील कविता कळण्यास जड जात नाही पण ती काव्यच का म्हणायची हे मात्र कळत नाही. काव्यविषयक संकल्पनेचा झालेला हा विस्तार हे



या कालखंडाचे जाणवणारे एक वैशिष्टच म्हणता येईल का? कोणत्याही काळात कवितेचा वाचकवर्ग मर्यादितच असतो हे मान्य करूनही तो या काळात अधिकच मर्यादित का झाला असावा याचीही चिकित्सा सामाजिक दृष्टीने आज महत्त्वाची आहे.

मर्ढेकर समकालीन अनेक कवींनी १९७५ पर्यंतची काव्यसृष्टी संपन्न केल्याने मर्ढेकर युग संपल्याचा प्रत्यय अद्याप रसिक मनाला येत नाही. त्यानंतरच्या पिढीतील करंदीकर, बापट, पाडगावकर, सदानंद रेगे, शेळके, सुर्वे, ग्रेस, आरती प्रभू, वैद्य, महानोर, भट, पै, धुरी, डहाके, चित्रे इत्यादींचा वैविध्यपूर्ण विकास मराठी भावकवितेला संपन्न करून गेलेला आहे. भावकवितेबरोबरच सुनीत, गझल, पोवाडा, लावणी, वात्रटिका, विरूपिका, तालचित्रे, गाथा, हायकू इत्यादी जुने-नवे रूपबंध या काळात रसिकमान्य झालेले आढळतात. ह्या कवींनी आपापल्या भावजीवनांचे, अनुभवांचे केलेले आविष्करण एकसुरी वाटत नाही. परंतु व्यक्तिगत आणि सामाजिक वैफल्याने ग्रस्त झालेली त्यानंतरची कवींची पिढी मात्र एकसुरी व वैफल्यग्रस्तही वाटते. भोवतालच्या वास्तवाचा संवेदनाशील मनांवर झालेला हा परिणाम मराठी कवितेच्या अनेक परंपरांपासून या कवींना वेगळेही काढीत आहे. तथापि, अद्याप त्यांच्याविषयी काही निश्चित विधान करणे फार अवघड आहे. स्वातंत्र्योत्तर समाजात तरुण संवेदनशील मने स्वजीवनाच्या संदर्भात कोणकोणत्या वृत्ती प्रगट करतात हे समजून येण्यासाठी व साहित्याचे त्यांच्या जीवनातील स्थान कसे बदललेले आहे हे कळावे यासाठीच ही कविता विशेष लक्षात राहून जाते. ही मने तारुण्यातील प्रेमाचा अनुभवही ज्या पद्धतीने स्वीकारतात आणि व्यक्त करतात त्यात एक प्रकारचे प्रौढत्व आहे आणि हरपलेले सुंदर विश्वही आहे. त्यांची कविता आशय दृष्टचा त्यांच्या जीवनानुभवांच्या अधिक जवळ आहे आणि त्यांची व्यक्तित्वे उदासीनतेची किंवा विध्वंसाची विरुद्ध टोके पकडून बसलेली आहेत.

अर्थात सगळेच नवे कवी असे आहेत असेही नाही. पण मुख्य धारा या प्रकारची दिसते.



**ललित गद्य**

गेल्या पंचवीस वर्षांत वैविध्यपूर्णतेतून विशेष संपन्न झालेला वाङ्मयप्रकार आहे तो मराठी ललित गद्याचा. पूर्वीचा लघुनिबंध वा ललित निबंध, त्याच्यातील बंदिस्त सांकेतिकता वगळून जसा या ललित गद्यामध्ये अंतर्भूत झालेला आहे तसाच कथाकवितादी रूढ साहित्यप्रकारात अंतर्भूत होऊ न शकणाऱ्या संवेदनक्षम मनांच्या अनेक जाणिवांनाही तो सामोरा गेलेला आहे. आत्मपर प्रवासवर्णन, विविध कलाविषयक आस्वादक लेखन, निसर्गाच्या किंवा थोर साहित्याच्या सहवासात विश्रब्ध मनाने घेतलेला आत्मशोध व समाजशोध . . . . असे वरेच काही या साहित्यप्रकारात आज समाविष्ट झालेले आहे. लेखकांच्या आत्माविष्काराच्या प्रेरणेचे हे एक वेगळे संमिश्र आणि समृद्ध रूप आहे. परिपूर्ती व युगांत ही इरावती कर्व्यांची तर पैस, ऋतुचक्र ही दुर्गा भागवतांची समाजाच्या सांस्कृतिक परंपरेचा वेध घेणारी पुस्तके या ललित गद्याचाच एक मौलिक भाग आहे. प्रभाकर पाध्ये, रा. भि. जोशी, गंगाधर गाडगीळ यांची एखाद्या स्थळाइतकाच आपल्या व्यक्तित्वाचा आविष्कार करणारी प्रवासवर्णने, ना. ग. गोरे, गो. वि. करंदीकर, दि. वा. मोकाशी, आदींनी मुख्यत्वे वैचारिक भूमिकेतून तर श्रीनिवास कुलकर्णी यांनी गतजीवनाला सूक्ष्म ऐंद्रिय संवेदनाक्षमतेने सामोरे जाऊन घेतलेला आपल्या अनुभवांचा वेध हेही या ललित गद्याचे विभ्रम आहेत. गीता साने, अनिल अवचट आदींनी अपरिचित सामाजिक वास्तवातून घडविलेले एकेका समाजाचे दर्शन आणि क्रृ. द. दीक्षितांनी घेतलेला संगीतानुभव हाही याच प्रकारात आढळतो. आज वर्धिष्णू असलेल्या या मुक्त साहित्यप्रकाराकडून अस्तंगत होत जाणाऱ्या गंभीर वैचारिक गद्याची जागा घेतली जावी किंवा जाते अशी लेखक-वाचक कोणाचीच अपेक्षा नाही. त्यामुळे मराठीतील वैचारिक गद्याचा ऱ्हास भरून निघणार नाही. तथापि, इतर ललित वाङ्मयप्रकारांना पोषणद्रव्ये मिळाल्यास मिळतीलही.

वैचारिक गद्य ही आधुनिक मराठी साहित्याची एक अभिमानास्पद परंपरा मानली जात असे. आजच्या 'स्पेशलायझेशन'च्या युगात विविध ज्ञानशाखांमध्ये ते दमदारपणाने प्रगट होते आहे. तथापि, आज मानवी जीवनाचे अनेक पैलू आणि विविध ज्ञानशाखा यांचा साकल्याने विचार फार कमी होतो आहे अशी समाजोन्नतीची भूमिका असणाऱ्या विद्वानांची तक्रार आढळते. त्यामुळे वैचारिक निबंधांचा सर्वसामान्य वाचकांना अभावही जाणवतो.

या ललित गद्याचीच एक शाखा आजचे विनोदात्मक लेखन म्हणता येईल. 'सुदाम्याचे पोहे' पासून सुरू झालेली मराठी विनोदाची दमदार परंपरा या काळातील विनोदी लेखकांनी विशेषच संपन्न केली आहे. गेल्या पंचवीस वर्षांत विनोद नवनवीन माध्यमांतून आणि शैलीतून प्रगटल्यामुळे त्याची व्याप्तीही पुष्कळ वाढली आहे. पु. ल. देशपांडे यांची 'व्यक्ती आणि वल्ली'तील व्यक्तिचित्रे, अपूर्वाईसारखी प्रवासवर्णने, राम नगरकरांचे आत्मचरित्र, वास्तवचित्रणातून निर्माण होणाऱ्या शंकर पाटील यांच्या 'नाटक' आणि संदर्भाचे स्थानांतर करून लिहिलेल्या द. मा. मिरासदारांच्या 'व्यंकूची शिकवणी' सारख्या कथा, बाळ गाडगीळांची 'लोटांगण' सारखी गद्यातील वाङ्मयीन विडंबने, जयवंत दळवींच्या 'ठणठणपाळाचे' निर्मळ खिल्ली उडविणे, गंगाधर गाडगीळांच्या बंडू, स्नेहलतेचे हलक्या फुलक्या सांसारिक समस्यातून प्रकटणारे जीवन, रमेश मंत्र्यांचा विनोद कोश, वि. आ. बुवांचे शृंगार संदर्भ असणारे विनोद—असे या प्रकारातील काही ठळक आविष्कार सांगता येतील. या विनोदी लेखकांमध्ये स्वतःच्या सूक्ष्म निरीक्षण शक्तीने, विनोदात्मक निवेदनाने, बहुश्रुततेने व मूल्य दृष्टीने पु. ल. देशपांडे यांचे लेखन विशेष महत्त्वाचे ठरते. विनोदी साहित्याबद्दल हे विधान जेवढे खरे आहे तेवढेच साचेबंद झालेले, त्याच त्या विनोद विषयांशी–स्त्रिया, मंत्री, सरपंच–अडकलेले विपुल लेखन रसिकांना कंटाळवाणे होते आहे हेही खरे आहे.

**मूल्यचिकित्सा**

आजच्या मराठी ललित साहित्यात सर्वसामान्य माणसाच्या



आयुष्यातील बदलत्या वास्तवाचा जो प्रत्यय येतो आहे तो मुख्यत: त्याच्या बदलत गेलेल्या जीवनमूल्यांच्या संदर्भातील आहे. स्वातंत्र्यानंतर सत्तेच्या राजकारणाला समाजजीवनात जे अधिक महत्त्व आले त्याचा परिणाम, त्याच बऱ्यावाईट पातळीवर व्यक्तीच्या कौटुंबिक आणि सामाजिक जीवनाची उभारणी होण्यात झालेला आहे. हे जीवन ह्याच आजच्या साहित्याचा प्राधान्याने आशय असल्यामुळे कथा, कादंबरी, काव्य यांसारखे साहित्यप्रकार कधी गांभीर्याने तर कधी रंजनाच्या सामान्य पातळीवरून जीवनाबद्दलची मूल्यचिकित्सा करताना आपल्याला दिसतात. राजकारणाइतकीच जीवनावर परिणाम करणारी दुसरी शक्ती आहे—आधुनिक विज्ञानाशी, तंत्रज्ञानाशी आणि समग्रतेने यंत्रयुगाच्या सामाजिक स्वरूपाशी निगडित असणारी. ऐहिक जीवनाच्या उभारणीसाठी आणि विकासासाठी स्वतंत्र भारताने स्वीकारलेली औद्योगिकीकरणाची प्रक्रिया मराठी समाजातील व्यक्तिजीवन पार बदलवून टाकणारी ठरलेली आहे. वाढती शहरे, वाढती लोकसंख्या, वाढती संपत्ती, वाढत्या झोपडपट्ट्या, वाढती बेकारी, सुखाच्या संदर्भातील वाढती विषमता आणि वाढत्या उपभोगांच्या अपेक्षा करणारी माणसांची मने यांचे गणित सोडविणे विशेष गुंतागुंतीचे झाले आहे. मराठी काव्य-कथा-कादंबरी हे बदललेले व्यक्तिमन फार स्पष्टपणाने, आजवरच्या अनेक वाङ्मयीन संकेतांना धक्के देऊन प्रगट करतात. गेल्या तीस-पस्तीस वर्षांत साहित्यिकांना माणसाच्या मनाच्या स्थितीगतीचे विशेष भान मानसशास्त्राच्या संशोधनाने आणून दिलेले असल्याने काही साहित्यिकांनी आपल्या लिखाणात ही गुंतागुंत तर चांगलीच खोलवरून न्याहाळलेली आहे. स्वत:च्या अनुभवांतून व्यापक जीवनशोधाकडे जाणारे त्यांचे मन माणसांचा जन्म, साध्य-साधन, मृत्यू, विकास, अधोगती इत्यादींच्या विषयी मूलभूत प्रश्न निर्माण करते. अशा काही थोड्या प्रमाणातील लेखनाने १९६० पूर्वीच प्रगत नवकथा, नवकादंबरी, नवकाव्य यांच्या इतिहासात मौलिक भर घातलेली आहे. परंतु लगतच्या काळातील परंपरेच्या पार्श्वभूमीवर साहित्याचे चित्र संमिश्र आहे.



संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीने परिस्थिती पूर्वीपेक्षा थोडी अधिक अनुकूल झाली म्हणून अनेक प्रतिभावंतांना कसदार पान्हा फुटावा असे सर्वच वाङ्मयक्षेत्रात घडलेले नाही. किंबहुना मानवी जीवनाचा व्याप अधिकाधिक नजरेसमोर येतो तसे वास्तवाचे आकलन अवघड झाल्याने गंभीर वाङ्मयीन प्रवृत्तींची जोपासना करण्याऐवजी रंजनात्मक प्रवृत्ती बळावण्याचीही शक्यता असते. कित्येकदा लोकप्रिय साहित्यिक स्वतःच हे घडवून आणतात किंवा कित्येकदा ते बाह्य परिस्थितीचे, मागणीचे बळी होतात. यासाठी सातत्याने, मूल्यनिष्ठेने प्रत्यक्ष कलाकृतींची व साहित्य व्यवहाराचीही समीक्षा होण्याची नितांत गरज असते. परंतु आज मराठी समीक्षाही आपले हे कार्य फारच तुटपुंजेपणाने बजावते आहे. ती अधिक गुंतली आहे, विकसितही झाली आहे ती तात्त्विक, सैद्धान्तिक विचारात. कदाचित येणाऱ्या काही वर्षांत कलास्वरूप शास्त्र, साहित्यसमीक्षा आणि साहित्यव्यवहार आपापले वेगळे प्रांत स्वतंत्रपणे आणि परस्परांच्या संबंधात अधिक सुजाणपणाने पारखून पाहतील व साहित्याबद्दलची आजची असमाधानाची भावना थोडी कमी झालेली असेल. आज कलावंत साहित्यिकांची चरित्रे प्रसिद्ध होत आहेत. १९ व्या शतकातील विचारवंत लेखकांच्या जीवनकार्याचे नवे मूल्यमापन लोक जिज्ञासेने वाचत आहेत. लोकसाहित्याच्या व दैवतकथांच्या आधारे प्राचीन साहित्याचा नवा संदर्भ शोधला जातो, तेव्हा समाजाला स्वत्वाची आणि स्वतःच्या परंपरेची एक वेगळी ओळख होते. त्या दिशेने मोठीच प्रक्रिया आज चालू झाली आहे. आपले स्वत्व आपण तपासून घेतो आहोत. वाङ्मयेतिहासाचे लेखन अद्ययावत करण्याचा सामूहिक प्रयत्न आता पुष्कळसा सिद्ध झालेला आहे. भारतातील इतर भाषांमधील, उत्तम आणि लोकप्रिय साहित्य अनुवादित करण्याची प्रवृत्तीही वाढताना दिसते. तेव्हा भविष्यकाळात सर्व मराठी समाजाचे भावनिक व वैचारिक जीवन याहून अधिक समृद्ध होईल, अद्ययावत होईल आणि नव्या मौलिक साहित्याची पाऊलवाट कदाचित त्यातूनच निघेल. या पार्श्वभूमीवर संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती हा त्या पाऊलवाटेचा एक प्रारंभ आहे.

*पुढील पानावर : वेरूळच्या लेण्यातील सुंदर नटेश्वर शंकराचे विलोभनीय शिल्प*

# मराठी रंगभूमी

**ज्ञानेश्वर नाडकर्णी**

महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या वेळी मराठी रंगभूमी अनेक अंगांनी बहरत होती हे खरे असले तरी तिच्या पुनरुज्जीवनाचे कार्य वरीच वर्षे आधी, म्हणजे १९४३ सालापासून सुरू झालेले होते. मराठी रंगभूमीचा जन्म १८४३ साली झाला असे मानून तिचा मोठ्या प्रमाणावर शतसांवत्सरिक उत्सव महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरील मुलखात साजरा झाला. कर्मधर्मसंयोगाने १९४३ साली ज्या उत्सवी योजना हाती घेण्यात आल्या त्या मराठी नाटयव्यवसायात हळूहळू स्थिरावून त्याला एक नवे वाळसे चढू लागले. आज गेल्या २५ वर्षांतील मराठी रंगभूमीच्या प्रगतीचे आलेखन करीत असताना या समग्र गतकाळाकडे मागे वळून पाहणे उपयुक्त ठरेल. त्यामुळे आपोआपच या विवेचनाला एक संदर्भसुद्धा लाभेल.

कै. विष्णुदास भावे यांच्या 'सीतास्वयंवर' नाटकाच्या सांगली येथील प्रयोगाने मराठी रंगभूमीची मुहूर्तमेढ रोवली गेली असे आपण मानतो. सुरुवात करण्याचे श्रेय भाव्यांचे असले तरी त्यांच्या नाटयप्रयोगाचे स्वरूप मात्र ओबडधोवड होते. त्याला सुबकपणा आणि खानदान प्राप्त व्हायला सुमारे चार दशके जावी लागली. अव्वल इंग्रजीच्या काळात पुण्यात सरकारी कचेरीत कारकुनी करणाऱ्या अण्णासाहेब किर्लोस्करांनी १८८० साली 'संगीत शाकुंतल' चा पहिला प्रयोग केला तेव्हा आजच्या अर्थाने आधुनिक मराठी नाटक प्रेक्षकाला पाहावयास मिळाले. किर्लोस्कर नाटक मंडळीच्या प्रेक्षकवर्गात पुण्यातील डेक्कन व फर्ग्युसन कॉलेजातील प्राध्यापक मंडळी, वकील, मामलेदार आणि ब्रिटिश सरकारचे गोरे हुद्देदार होते. मराठी नाटकात पुढे वरीच स्थित्यंतरे होत गेली तरी त्याच्या मध्यमवर्गीय व उच्च मध्यमवर्गीय प्रेक्षकाचे रसायन तयार झाले ते याच काळात.

किर्लोस्करांचे 'शाकुंतल' अनुवादित होते तर १८८२ साली रंगमंचावर आलेले त्यांचे 'संगीत सौभद्र' हे स्वतंत्र होते. कृष्ण, अर्जुन, सुभद्रा इत्यादी महाभारतातील व्यक्तींना किर्लोस्करांनी चपखलपणे मिरज-सांगलीकडील तत्कालीन मराठी समाजाच्या कोंदणात वसविले. अशा रीतीने त्यांनी आजच्या प्रेक्षकाशी जास्त घनिष्ठ संपर्क साधला आणि 'सौभद्र' अजरामर करून ठेवले. हीच किमया जास्त मोठ्या प्रमाणावर किर्लोस्करांचे सहकारी गोविंद वल्लाळ देवल यांनीही आपल्या नाटकांद्वारे करून दाखविली. अव्वल इंग्रजीच्या काळात संस्कृत नाटकांचे त्याचप्रमाणे शेक्सपियर आदि आंग्ल नाटककारांच्या कृतींचे वरेच अनुवाद होत होते. त्यातील वरेच रंगमंचावर पोचत नसत, त्यामुळे त्यांना 'बुकिश' नाटके म्हणत. देवलांनी 'मृच्छकटिक', 'झुंझारराव', 'दुर्गा', 'संशयकल्लोळ' इत्यादी अनुवादित नाटके (अथवा पूर्वीच्या अनुवादांच्या रंगावृत्त्या) एकापाठोपाठ एक सादर केल्या. त्याचवरोवर जरठवालाविवाहाच्या समस्येवर आधारलेले 'शारदा' हे स्वतंत्र नाटकही लिहिले.

किर्लोस्कर-देवलानंतर काल येतो तो खाडिलकर, गडकरी आणि वरेरकर यांचा. अर्थात् याच काळात इतर जिद्दीचे मराठी नाटककार काही कमी झाले नाहीत. किर्लोस्कर-देवलांच्या नाटकांत भाऊराव कोल्हटकरांसारखा असामान्य गायकनट चमकून गेला. त्यानंतरच्या कालखंडातील केशवराव भोसले अल्पायुषी ठरले. खाडिलकर-गडकऱ्यांच्या नाटकांवर वालगंधर्वांसारख्या अजोड स्त्रीपार्टी नटाची छाया पसरलेली आहे. बापूराव पेंढारकर व मास्टर दीनानाथ हे मराठी रंगभूमीच्या विकटच्या काळातील दोन त्रिनीचे गायकनट.

*मराठी रंगभूमीची मुहूर्तमेढ रोवणारे कै. विष्णुदास भावे*



किर्लोस्कर संगीत मंडळीचे संगीत सौभद्र : श्रीकृष्णाच्या भूमिकेत बाळकोबा ना[illegible]
सुभद्रा—भाऊराव कोल्हटकर व बळीराम—अण्णासाहेब किर्लोस्कर



संगीत मानापमान : लक्ष्मीधराच्या भूमिकेत सुप्रसिद्ध नट गणपतराव बोडस



संगीत शाकुंतल : दुष्यंत राजाच्या भूमिकेत मोरोबा वाघोलीकर, शकुंतला–
शंकरराव मुजुमदार व कण्व मुनींचा शिष्य–अण्णासाहेब किर्लोस्कर



'एकच प्याला'त बालगंधर्व (सिंधू), गणपतराव बोडस (सुधाकर),
(रामलाल) पंढरपूरकरबुवा





महाराष्ट्राला मोहिनी घालणाऱ्या बालगंधर्वांची स्त्रीवेषातील दोन रूपे



'सवाई माधवरावाचा मृत्यू' आणि 'भाऊबंदकी' ही खाडिलकरांची दोन प्रखर नाटके. त्यानंतर त्यांच्या प्रतिभेला संगीत नाटकांनी आणि बालगंधर्वांच्या गानकलेने वेढले. गडकऱ्यांनी भाषाशैली, पात्रपरिपोष, शोकात्म रसपरिपोष, विनोद इत्यादींच्या बाबतीत स्वतःचे असे नियम तयार केले आणि आपल्या कविप्रतिभेने मराठी प्रेक्षकाला थक्क करून टाकले. वरेरकरांचा कल समाजप्रबोधनाकडे होता. त्यांनीही तंत्रमंत्राचे नवनवे प्रयोग केले. मराठी रंगभूमीच्या अवनतीच्या काळातही त्यांचे लेखन जोमाने चालू राहिले.

बोलपटांच्या आगमनानंतर काही वर्षांतच मराठी रंगभूमीच्या विपन्नावस्थेला सुरुवात झाली. याच सुमारास आचार्य अत्र्यांच्या औपहासिक नाटकांनी काही काळ मराठी नाटयव्यवसायामध्ये तजेला निर्माण केला. युद्धकाळात स्थापन झालेली मो. ग. रांगणेकरांची 'नाटयनिकेतन' ही एकच संस्था वऱ्यापैकी तग धरून राहिली. त्यांच्या आधी इब्सेनला प्रमाण मानणाऱ्या काही ध्येयवादी विचारवंतांनी केलेला 'नाटयमन्वंतर'चा प्रयोग संपुष्टात आलेला होता.

हळूहळू प्रयोगागणिक वेतन घ्यायची 'नाईट' पद्धती मराठी नाटयव्यवसायात रूढ झाली. मुंबई मराठी साहित्य संघाच्या वतीने १९४३–४४ साली झालेल्या मराठी रंगभूमीच्या शतसांवत्सरिक उत्सवात कै. डॉ. अ. ना. भालेरावांनी विस्कळीत झालेल्या नाटय व्यवसायातील बरीच मंडळी कामाला जुंपली. प्रतिवर्षी हा उत्सव साजरा होऊ लागला आणि त्यातून वि. वा. शिरवाडकरांसारखा प्रतिभासंपन्न नाटककार पुढे आला. अनंत काणेकर आणि माधव मनोहर यांच्या रूपान्तरांनीसुद्धा मराठी नाटकाच्या पुनरुज्जीवनाला मोठ्या प्रमाणात हातभार लावला. उत्सवांमुळे सुरू झालेली ही उत्साहाची लाट पुढे सातत्याने टिकून राहिली आणि एका अर्थाने तिच्यावर आरूढ होऊनच नवे मराठी नाटक अगर नवनाटय पुढे आले असे म्हटले पाहिजे.



सुप्रसिद्ध गायकनट मा. दीनानाथ स्त्रीवेषात



अलीकडे गाजलेल्या ' घाशीराम कोतवाल ' मधील एक प्रसंग



**प्रायोगिक रंगभूमी**

मराठीतील प्रायोगिक रंगभूमी १९५० नंतरच्या काळात उदयाला येऊ लागली. नाटचव्यवसायही सावकाशीने स्थिरावू लागला. प्रायोगिक रंगभूमी आणि व्यावसायिक रंगभूमी या दोहोंमध्ये समन्वय साधण्याचे कार्य महाराष्ट्र राज्य शासनातर्फे प्रतिवर्षी होणाऱ्या संपूर्ण नाटकांच्या स्पर्धांनी केले. या स्पर्धा द्विभाषिक मुंबई राज्य असतानाच सुरू झाल्या होत्या. वसंत कानेटकरांचे 'वेड्याचं घर उन्हात' हे नाटक पुण्याच्या प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशनने (पीडीए) याच काळात स्पर्धेत सादर केले. प्रा. भालवा केळकरांनी त्याचे दिग्दर्शन करून त्यात एक महत्त्वाची भूमिकाही केली होती. डॉ. श्रीराम लागूंची त्यातील मध्यवर्ती भूमिकासुद्धा प्रेक्षकांच्या ध्यानात कायमची राहिली. याच सुमाराला विजय तेंडुलकरांचे 'श्रीमंत' हे नाटक विजया जयवंतांनी (मेहता) स्पर्धेत सादर केले आणि त्यात प्रमुख भूमिकाही केली. काही वर्षांच्या अंतराने स्पर्धेत नागपूरच्या रंजन कला मंदिराने पुरुषोत्तम दारव्हेकरांचे 'चंद्र नभीचा ढळला' हे नाटक सादर करून पहिले पारितोषिक मिळविले. महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या सुमारास अहमदनगरचे प्रा. मधुकर तोरडमल आपले 'काळे बेट लाल बत्ती' हे नाटक घेऊन स्पर्धेत उतरले.

ही सर्व नावे आज मराठी नाटचव्यवसायात आघाडीला आहेत. नाटककार म्हणून वसंत कानेटकर व विजय तेंडुलकर आणि नट-दिग्दर्शक म्हणून डॉ. श्रीराम लागू, विजया मेहता, मधुकर तोरडमल इत्यादी मंडळी आजही मराठी रंगभूमीवर कार्यरत आहेत. मात्र प्रायोगिक रंगभूमीला अजूनही दिशा लाभत आहे ती राज्य नाटचस्पर्धांमधूनच. पंचवीस वर्षांपूर्वी काही संस्थांचे नाव प्रायोगिक रंगभूमीशी संलग्न होते. विजया मेहता, अरविंद देशपांडे, दामू केंकरे व नंदकुमार रावते या मंडळींनी भारतीय विद्या भवनाच्या आश्रयाने जे ललित कला केंद्र चालविले त्याने तेंडुलकरांच्या एकांकिका व 'गृहस्थ' हे पहिले नाटक प्रेक्षकांसमोर आणले. पुढे विजयाबाई आणि अरविंद देशपांडे





*सामाजिक अन्यायाला वाचा फोडणारे 'लोककथा ७८'*

*विजया मेहता दिग्दर्शित 'संध्याछाया'तील एक करुण प्रसंग*



युरिपिडिसच्या 'मिडिया' या (ग्रीक) शोकांतिकेत रोहिणी हट्टंगडी



यांनी ' रंगायन ' ही नव्या धर्तीची प्रायोगिक संस्था स्थापन केली. केवळ एकांकिकांचे व नाटकांचेच प्रयोग नव्हे तर संगीताच्या मैफली, काव्यवाचन आणि व्याख्याने यांच्यासारखे सर्वांगीण अभिरुचीला पोषक असे उपक्रमसुद्धा ' रंगायन 'ने आयोजिले. तेंडुलकरांच्या पाठोपाठ कै. चिं. त्र्यं. खानोलकर व महेश एलकुंचवार यांच्या नवनवोन्मेषशाली नाट्यकृतीसुद्धा ' रंगायन 'ने रंगमंचावर आणल्या. खानोलकरांचे ' एक शून्य बाजीराव ', पाश्चात्य ॲब्सर्ड थिएटरच्या आविष्काराशी तुलना करता येईल असे नाटक. विचारवंतांमध्ये ते फारच गाजले. एलकुंचवारांच्या प्रतिभेची पहिली ओळख ' सुलतान ', ' होळी ' यांसारख्या एकांकिकांमधून पटली. असल्या कृतींच्या प्रयोगाच्या अनुषंगाने ' रंगायन ' ने काही वर्कशॉप्सही आयोजित केली. आयनेस्को, बेकेट इत्यादी आजच्या पाश्चात्य नाटककारांच्या प्रायोगिक कृतींचे अनुवादही ' रंगायन 'ने आवर्जून सादर केले. अशाच प्रकारचे कार्य ढोबळपणे आत्माराम भेंडे यांनी इंडियन नॅशनल थिएटरच्या विद्यमाने अल्प काळ केले तर जास्त सातत्याने प्रा. कमलाकर सोनटक्के यांच्या नेतृत्वाखाली साहित्य संघाच्या अमृत-नाट्य-भारतीने केले.

' रंगायन 'मधून बाहेर पडलेल्या सुलभा व अरविंद देशपांडे यांनी 'आविष्कार' ही प्रायोगिक संस्था स्थापन केली. 'आविष्कार'ने केलेली सर्वात मोठी गोष्ट म्हणजे दादरच्या छबिलदास हायस्कूलच्या सभागृहाचे प्रायोगिक चळवळीच्या आघाडीच्या केंद्रात रूपांतर होय. ' इंटिमेट थिएटर 'च्या या प्रकाराने नवनव्या संचांना आकर्षित करून घेतले. रास्त भाड्याने नाटकगृहे मिळवायचा प्रश्न मिटल्यासारखा झाला. विशेष म्हणजे छबिलदासच्या रंगमंचीय सोयींना साजेशी अशी नाट्यलेखनाची एक शैली हळूहळू तयार होत गेली. गो. पु. देशपांडेचांचे ' उद्ध्वस्त धर्मशाळा ', वृंदावन दंडवत्यांचे ' राजाचा खेळ ', अच्युत वझ्यांचे ' चल रे भोपळ्या टुणुक टुणुक ' व ' सोफा-कम- बेड ', सदानंद रेग्यांचे ' गोची ' आणि बादल सरकारांचे ' जुलूस ' अशा कितीतरी नाटकांचे प्रयोग छबिलदासमध्ये जितके रंगतदार



*नाट्यनिकेतनच्या ' कुलवधू ' ने मराठी नाट्यक्षेत्रात नवीन अध्याय निर्माण केला*



'रायगडाला जेव्हा जाग येते' मध्ये डॉ. काशिनाथ घाणेकर (संभाजी) व
मा. दत्ताराम (शिवाजी)



झाले तितके ते मोठ्या आकाराच्या नाट्यगृहात झाले नसते. दरम्यान 'आविष्कार'ची प्रायोगिक नाट्यनिर्मिती चालूच राहिलेली आहे आणि त्यात वर्कशॉप्स् त्याचप्रमाणे बालरंगभूमीवरच्या 'चंद्रशाले'सारख्या उपक्रमांची भर पडलेली आहे.

**व्यावसायिक**

प्रायोगिक दृष्ट्या महत्त्वाच्या म्हणता येतील अशा काही प्रवाहांचा मागोवा घेण्यापूर्वी आपण आपले लक्ष व्यावसायिक रंगभूमीकडे वळविले पाहिजे. व्यावसायिक रंगभूमीवर स्थिर होण्यासाठी विजय तेंडुलकरांना काही अवधी लागला. त्यांच्या 'मधल्या भिंती' सारख्या सुरुवातीच्या नाटकात 'लिटल मॅन'च्या व्यथांचे चित्रण होते, परंतु काही वर्षांनी गाजलेल्या 'गिधाडे', 'सखाराम बाइंडर' व 'घाशीराम कोतवाल' या नाट्यत्रयीत एक नवा बेडरपणा दिसतो. लैंगिकता व हिंसाचार यांचे उघडेनागडे केलेले चित्रण यात दिसते. जणु सुस्त झालेल्या प्रेक्षकवर्गाला टोचून, ढोसून त्याच्या मनात भावनांची व विचारांची खळबळ माजविणे हाच या नाट्यलेखनाचा हेतू होता. मात्र नाट्यरचनेच्या दृष्टीने पाहता हा प्रयत्न खचितच अभिनव वाटतो.

विपुल नाट्यलेखन करणाऱ्या वसंत कानेटकरांच्या 'रायगडाला जेव्हा जाग येते' या नाटकाने ऐतिहासिक नाट्यकृतीचा एक नवा कित्ता प्रेक्षकांपुढे ठेवला. शिवाजी व संभाजी या पितापुत्रांमधील अनोख्या परंतु प्रक्षुब्ध संबंधांचे चित्रण यात घडते. पुढे कानेटकरांच्या अस्वस्थ प्रतिभेने अनेक विषय आणि अनेक भावविश्वे धुंडाळली. 'हिमालयाची सावली'मधील धोंडो केशव कर्व्यांच्या प्रतिकृतीपासून तो आजच्या 'वादळ माणसाळतंय्' मधल्या बाबा आमट्यांच्या छायाकृतीपर्यंत प्रचलित जीवनातून अनेक आदर्श घेतले. समाजाच्या वेगवेगळ्या थरांतील पात्रांना चालते बोलते केले. शेक्सपियरच्या चार शोकात्मिकांच्या कथानकांचे धागे एकत्र जोडून 'गगनभेदी' ही कलाकृती निर्माण केली. सर्वसाधारण प्रेक्षकाला आकृष्ट करणारी आणि बऱ्याचदा चांगले वाङ्मयीन मूल्य असलेली अशी नाटके लिहिली.

कानेटकरांइतकेच व्यावसायिक यश बाळ कोल्हटकर व मधुसूदन कालेलकर या दोन नाटककारांना मिळालेले आहे. त्यांचे आवाहन जास्त निखळपणे सर्वसामान्य प्रेक्षकाला आहे. बाळ कोल्हटकरांना आपला सूर सापडला तो 'वाहतो ही दुर्वांची जुडी' मध्ये. मराठी प्रेक्षकांच्या मनातल्या भावनांना हात घालण्याचे सामर्थ्य या कौटुंबिक नाटकात होते. पौराणिक, ऐतिहासिक अशा पार्श्वभूमीवरही कोल्हटकरांनी नाटके लिहिली. परंतु सामाजिक विषयांतच त्यांचा जीव जास्त रमला. मधुसूदन कालेलकरांनीही कौटुंबिक विषयावरच भिस्त ठेवली. मात्र फडक्यांची 'अखेरचे बंड' ही कादंबरी, खांडेकरांची 'अमृतवेल', नानावटी-अहुजा खून खटला आणि सावरकरचरित्र यांच्यासारखे जास्त आव्हानदायी विषयसुद्धा त्यांनी बऱ्यापैकी हाताळले. मराठी नाटकाच्या पारंपरिक साच्याला या दोन नाटककारांनी क्वचितच धक्का दिला. व्यावसायिक मराठी नाटक दौऱ्यावर जाऊन आडगावच्या अशिक्षित प्रेक्षकांसमोरसुद्धा टिकू शकले पाहिजे हे कटु सत्य कोल्हटकर-कालेलकरांनी पचविले होते आणि अशा टिकाऊपणाचा एक आदर्श त्यांनी निर्माण केला असे म्हटले पाहिजे.

व्यवसाय दृष्ट्या विद्याधर गोखले यांची कामगिरी विशेष श्रेयस्कर ठरते. आपल्या 'सुवर्णतुला' या नाटकानिशी त्यांनी 'सौभद्रा'च्या धर्तीचे भरगच्च, संगीतप्रधान आणि शृंगारविनोदाच्या मिश्रणाने रोचक झालेले नाटक पुनरुज्जीवित केले. श्रीकृष्ण, बलराम, रुक्मिणी, सत्यभामा व नारद यांच्यासारखी परिचित पात्रे त्यांनी नव्या संदर्भात प्रेक्षकांपुढे आणली. छोटा गंधर्व, जयमाला शिलेदार, राम मराठे इत्यादी मराठी संगीत नाटकाच्या पारंपरिक पठडीतील कलावंत मंडळी गोखल्यांच्या या व अन्य नाटकात संगीत रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाचा दिलासा निर्माण करून गेली. 'पंडितराज जगन्नाथ' मध्ये गोखल्यांनी संस्कृत व उर्दू या भाषांवरील आपले प्रभुत्व सिद्ध केले. 'मदनाची मंजिरी'त त्यांनी शेक्सपियरच्या 'ट्वेल्थ नाईट'ला बेमालूम देशी स्वरूप दिले. तेव्हापासून तो आजच्या 'बावनखणी' पर्यंत त्यांच्या संगीत नाटकाचा प्रवास धिमेपणाने चालू आहे.



डॉ. वसंतराव देशपांडे व फैयाझ 'कटयार काळजात घुसली' मध्ये





संगीत नाटक यशस्वीपणे हाताळण्याचे अन्यांचे प्रयत्न खास नोंद करून ठेवावेत अशा प्रकारचे नाहीत. याला एक उत्तुंग अपवाद पुरुषोत्तम दारव्हेकरांच्या ' कटचार काळजात घुसली ' या नाटकाचा. याची कथावस्तूच मुळी दोन मातब्बर गवयांच्या स्पर्धेवर आधारलेली असल्यामुळे त्याचे अवघे वातावरण खानदानी संगीताने धुंद व्हावे यात आश्चर्य नाही. कै. वसंतराव देशपांड्यांनी यातील खाँसाहेबांची भूमिका अजरामर केली, तर ' मत्स्यगंधा ', ' लेकुरे उदंड जाली ' या कानेटकरांच्या नाटकांना वैशिष्ट्यपूर्ण संगीत देणाऱ्या जितेंद्र अभिषेकींनी ' कटचार 'च्या संगीतावर आपल्या प्रतिभेचे शिक्कामोर्तब केले.

व्यावसायिक रंगभूमीला अभिजात वाङमयीन रसवत्तेचे लेणे चढविण्याचे काम ज्या काही मोजक्याच नाटककारांनी केले त्यांच्यातील विनीचे एक म्हणजे वि. वा. शिरवाडकर. कोणे एके काळी त्यांच्या लिखाणाचा भर रूपांतरावर होता. परंतु सुमारे एक तपापूर्वी आपल्या ' नटसम्राट ' या नाटकाने त्यांनी मराठी नाट्यविश्व हादरवून सोडले. कै. गणपतराव जोशी, कै. नानासाहेब फाटक यांच्यासारख्या लोकोत्तर अभिनेत्यांच्या व्यक्तिमत्वाच्या मुशीतून त्यांचा नटवर्य अप्पा बेलवलकर तावून सुलाखून बाहेर पडला होता आणि डॉ. श्रीराम लागूंनी या भूमिकेचे सोने केले. उच्च साहित्यिक मूल्य असलेली ही शोकात्मिका व्यवसाय दृष्ट्यासुद्धा कमालीची यशस्वी झाली हा नाटकधंद्याच्या आजच्या अनिश्चित परिस्थितीतला एक चमत्कारच होय.

हीच किमया पु. ल. देशपांडे यांच्या ' तुझे आहे तुजपाशी ' या नाटकालासुद्धा साधली. तीसएक वर्षांपूर्वी जेव्हा हे नाटक रंगमंचावर आले तेव्हा त्याचे इंदौरी वातावरण व भाषा, त्यातील उपहास आणि विनोद, त्यातील ठसठशीत स्वभावचित्रे यांनी मराठी प्रेक्षकाला एका वेगळ्याच अनुभूतीची प्रचीती देऊन थक्क करून सोडले. त्यानंतर लवकरच पु.लं.नी ' बटाट्याची चाळ ' हा बहुरूपी कार्यक्रम सादर केला. त्यात स्वतःच्याच औपहासिक लेखनाद्वारे मुंबईच्या चाळ संस्कृतीचे मार्मिक दर्शन घडविले होते. यानंतर आला 'वाऱ्यावरची वरात ' हा रव्हयू पद्धतीचा संमिश्र विनोदी

' तुझे आहे तुजपाशी ' मधील एक प्रसंग



'अजब न्याय वर्तुळाचा' भारताबाहेर प. जर्मनीत प्रयोग झालेले पहिले भारतीय नाटक



कार्यक्रम. यापुढे अशाच कार्यक्रमांद्वारे रंगमंचीय आविष्काराच्या कक्षा कल्पकपणे रुंदावण्याचे कार्य पु.लं.नी चालूच ठेवले.

ज्येष्ठ नाटककारांच्या पाठोपाठ सुरुवात करून त्यांची बरोबरी करण्याचे श्रेय प्रामुख्याने जयवंत दळवी यांना जाते. 'संध्याछाया' या नाटकात त्यांनी एकाकी जीवन कंठणाऱ्या वृद्ध जोडप्याची व्यथा दाखविली. त्यांचे सर्वांत कलात्मक नाटक म्हणजे 'बॅरिस्टर'. यातील पात्रे एका अस्तंगत काळाच्या चौकटीत बंदिस्त झालेली आहेत. याच संदर्भात नाटकाचे मध्यवर्ती शोकनाटच फुलत जाते. मध्यंतरीच्या काळात दळवी यांनी विपुल नाटचलेखन केले. त्यांच्या विशेष प्रक्षोभक नाटकांत अलीकडचे 'पुरुष' हे विशेष महत्त्वाचे. त्यातील बलात्काराच्या मध्यवर्ती घटनेमुळे निर्माण झालेल्या समस्या जितक्या नाटचपूर्ण तितक्याच प्रत्ययकारी वाटतात.

दळवींपेक्षाही जास्त विपुल नाटचलेखन करणारे एक गुणवान नाटककार म्हणजे रत्नाकर मतकरी हे होत. मतकरींनी नाना प्रकारची कथानके हाताळली, त्याचप्रमाणे तंत्राचेही अनेक प्रयोग केले. सर्व दृष्टचा लक्षणीय असे त्यांचे नाटक म्हणजे 'लोककथा ७८' हे होय. १९७८ साली मराठवाडचातल्या एका आडगावी दलितांवर झालेल्या घोर अन्यायाची खरीखुरी हकीकत त्यांनी या अभिनव नाटकासाठी राबविलेली आहे. नाटकाच्या प्रयोगात नेपथ्य, अभिनयादी अंगे अतिशय नावीन्यपूर्ण स्वरूपात आपल्याला दिसतात. 'अश्वमेध', 'खोलखोल पाणी' इत्यादी नाटकांत मतकरींनी आपली सखोल मनोविश्लेषणाची शक्ती चांगल्या प्रकारे दाखविलेली आहे. मतकरींच्या कारकिर्दीत बालनाटचाचाही वाटा मोठा आहे.

व्यावसायिक जगात एकेकाळी विशेष यश मिळविणारे तरुण पिढीतील नाटककार म्हणजे सुरेश खरे. मतकरींप्रमाणे त्यांचीही सुरुवात प्रायोगिक रंगभूमीवरच झाली. परंतु 'काचेचा चंद्र' यासारखी त्यांची नाटके त्यातील मूलभूत नाटचामुळे जास्त विस्तृत प्रेक्षकवर्गाला आवडली. समाजातील अपप्रवृत्तींचे विच्छेदन करणारी नाटके लिहिताना किंचित सनसनाटी निर्माण करण्याचा मोह खरे यांना पडला तर तो त्यांच्या विषयाच्या नाजुकपणाकडे पाहून समजता येण्यासारखा आहे.

प्रायोगिक रंगभूमीपासून सुरुवात करून व्यावसायिक रंगमंचावर स्थिरावलेले आणखी एक नाटककार म्हणजे शं. ना. नवरे हे होत. 'ग्रॅन्ड रिडक्शन सेल' अगर 'मन पाखरू पाखरू' या त्यांच्या सुरुवातीच्या नाटकांत संवेदनाक्षमतेबरोबरच नाटकाच्या घाटाचे नवनवे प्रयोग करण्याची इच्छा दिसते. उलट 'गुंतता हृदय हे' अथवा 'गहिरे रंग' यांसारख्या त्यांच्या अलीकडच्या नाटकांचे आवाहन सर्वसामान्य प्रेक्षकाला जास्त आहे.

नवऱ्यांच्या नाटकांत एकेकाळी चमकलेल्या कै. बबन प्रभूंनी फार्सकार म्हणून चांगले नाव मिळविले. त्यांनी आणि आत्माराम भेंडचांनी रूढ केलेला हा नाटचप्रकार परभृत असला तरी त्यांच्या कलागुणांमुळे मराठी रंगभूमीने तो आत्मसात करण्यास मदत झाली. माधव मनोहर, नवरे, प्रभू व भेंडे यांनी प्रायोगिक मराठी रंगभूमीवर आपले एक युग निर्माण केले असे म्हणावयास हरकत नाही. यालाच पुढे व्यावसायिक बैठक प्राप्त झाली.

मोजकेच परंतु गुणवत्तापूर्ण नाटचलेखन करणाऱ्या काहींची नावे डोळचांपुढे येतात. विश्राम बेडेकर हे त्यातील महत्त्वाचे. १९३३ साली त्यांचे पहिले नाटक 'ब्रह्मकुमारी' रंगमंचावर आले. अलीकडच्या काळातील त्यांचे 'टिळक आणि आगरकर' हे त्यांच्या वेचक नाटचनिर्मितीमधला एक उच्चांक. टिळक आणि आगरकर यांच्या तरुणपणातील संबंधांवर आधारलेले हे नाटक त्या लोकोत्तर पुढाऱ्यांच्या जीवनाचा पूर्वार्ध लक्षवेधकपणे डोळचांपुढे उभा करते. 'यशोदा', 'गारंबीचा बापू' ही आपल्या कादंबऱ्यांवर आधारलेली कलात्मक नाटके लिहिणारे श्री. ना. पेंडसे हे 'संभूसाच्या चाळीत' या नाटकामुळे गाजले. 'गारंबीचा बापू' ते प्रखर स्वभावनाटच आहे तर 'संभूसाच्या चाळीत' या नाटकात मुंबईच्या चाळीतील मंडळींची सुखदुःखे बोलकी केलेली आहेत. पेंडश्यांप्रमाणे साहित्याचे इतर प्रांत गाजविणाऱ्या व्यंकटेश माडगूळकरांनी 'सती', 'पति गेले ग काठेवाडी' यांसारखी नावीन्यपूर्ण नाटचवस्तूंनी नटलेली व शैलीदार नाटके लिहिली. परंतु व्यवसाय दृष्टचा त्यांचे फारसे चीज झाले नाही. याउलट सई परांजप्यांसारख्या आजच्या नाटककाराला जनरंजनाची नस चांगली सापडली.





जर्मनांनी सादर केलेली दोन संस्कृत नाटके : ' शाकुंतल ' व ' मुद्राराक्षस '



'सख्खे शेजारी' अगर 'सोयरीक' सारख्या नाटकांत उपहास वा हलकाफुलका विनोद तजेलदार स्वरूपात पाहावयास मिळतो.

वऱ्यावाईट नाटकांची व्यावसायिक प्रयत्नांत भर घालणारे अनेक नाटककार आहेत, परंतु त्यांना कोणत्याही निश्चित अशा प्रवाहात स्थान नाही.

राज्य नाटयस्पर्धा ज्या काळात फुलू-वहरू लागल्या होत्या त्याच काळात भारतीय रंगभूमीवरून मराठी नाटक काही दर्जेदार कृती उसन्या घेऊ लागले. हिंदीतील मोहन राकेश, बंगालीतील बादल सरकार आणि कानडीतील गिरीश कर्नाड यांची प्रातिनिधिक नाटके मराठीत येऊ लागली. राकेश यांचे 'आधे अधुरे', बादल सरकारांची सुरुवातीची जवळजवळ सर्वच नाटके, कर्नाडांचे 'ययाती' व 'तुघलक' या साऱ्यांना मातब्बर अनुवाद व कुशल कलावंत यांनी मराठी रंगमंचावर सादर केले. याच सुमाराला विजय तेंडुलकरांच्या 'शांतता कोर्ट चालू आहे' या नाटकाला अखिल भारतीय पातळीवरचे कमलादेवी चट्टोपाध्याय पारितोषिक मिळाल्यामुळे त्यांच्याही नाटकांकडे अन्य भाषिकांचे लक्ष गेले. भाषाभाषांमधील ही देवघेव मराठी नाट्यवाङ्मयाला सकस करण्यास उपकारक ठरली. बादल सरकारांनी तर आपल्या एका विशिष्ट प्रयोग-पद्धतीचा प्रभाव मराठी रंगभूमीवर टाकला आणि प्रायोगिक नाट्यलेखनाच्या बाबतीत तर तो अजूनही पुसला गेलेला नाही.

**आविष्कार**

१९६० च्या आधी आणि काही काळ नंतर पाश्चात्य नाटकांची रूपांतरे बिनतक्रार मराठी रंगमंचावर होत होती, परंतु हळूहळू मराठी नाटकाच्या स्वरूपाबद्दल, त्याच्या अस्मितेबद्दल आणि त्याच्या खास देशी अशा तोंडवळ्याबद्दल नवनाट्याच्या निर्मात्यांच्या मनात अस्वस्थता निर्माण होऊ लागली. विजया मेहतांनी याबाबत प्रथम सातत्याने प्रयोग केले. ब्रेश्त या जर्मन प्रायोगिक नाटककाराच्या एका नाटकाचे व्यंकटेश माडगूळकरांनी केलेले रूपांतर रंगमंचावर आणल्यावर त्यांनी कै. चिं. त्र्यं. खानोलकरांकडून ब्रेश्तच्या 'कॉकेशियन चॉक सर्कल' चे रूपांतर ('अजब न्याय वर्तुळाचा') करवून घेतले. पूर्व जर्मनीतील ब्रेश्ततज्ज्ञ फ्रिझ बेनेविट्झ यांच्या सहकार्याने त्यांनी बसविलेला त्याचा प्रयोग १९७४ साली युरोपचा दौरा करून आला.

या दोन्ही रूपांतरांमागची मनप्रणाली अशी होती की भारतीय मातीत रुजलेला खराखुरा नाट्यप्रकार तमाशा हा आहे. तमाशा आणि अन्य खास मऱ्हाटी असे लोककलाप्रकार आपल्या प्रयोगपद्धतीत सामावून घेण्याचा यशस्वी प्रयत्न विजयाबाईंनी ब्रेश्तच्या संबंधात प्रथम केला. पुढे याच मार्गाने मराठी रंगभूमीच्या जातकुळीचा शोध घेत असताना त्यांनी भरताच्या नाट्यशास्त्राला अनुसरून 'मुद्राराक्षस' व 'शाकुंतल' या नाटकांचे प्रयोग बसविले आणि अगदी अलीकडे कर्नाडांचे 'हयवदन' हे नाटक पुन्हा मऱ्हाटी लोककलाप्रकारांच्या अधिष्ठानाला साक्षी ठेवून सादर केले.

तमाशा, दशावतार, खेळे इत्यादी लोककलाप्रकारांपासून स्फूर्ती घेऊन एक उत्तम रसायन निर्माण केले ते 'घाशीराम कोतवाल' ने. तेंडुलकरांचे हे नाटक जब्बार पटेल यांनी १९७२ साली प्रथम सादर केले. त्याला संगीत देणाऱ्या भास्कर चंदावरकरांनी 'हयवदन' चेही संगीत नंतर दिले. नाना फडणविसाचे पात्र वादग्रस्त संदर्भात सादर करणाऱ्या 'घाशीराम कोतवाल' च्या द्वारे तेंडुलकरांनी एक नवा नाट्यप्रकार निर्माण केला. १९८२ साली याही प्रयोगाने युरोपचा यशस्वी दौरा केला.

या सर्व प्रयोगांइतकेच महत्त्वाचे कार्य 'जागरण' या पारंपरिक कलाप्रकाराच्या अंगाने इंडियन नॅशनल थिएटरच्या लोककला संशोधन केंद्राने केलेल्या 'खंडोबाचे लगीन' ने साधलेले आहे. याच केंद्राने अलिखित अशा मऱ्हाटी लोककलाप्रकारांचे अनेक रंग वेगवेगळ्या महोत्सवांच्या निमित्ताने प्रेक्षकांना दाखविले. विजयाबाईंची निर्मिती, 'घाशीराम कोतवाल' आणि आय.एन्.टी. सारख्या संस्थांचे कार्य हे गेल्या दहा-पंधरा वर्षांत प्रायोगिक मराठी रंगभूमीवर एक नवचैतन्य निर्माण करून राहिलेले आहे यात शंका नाही.

मात्र याच संदर्भात तमाशाचा जास्त पारंपरिक असा मूलस्रोत आपण विसरता कामा नये. कै. भाऊ बापू मांग, कै. दादू इंदुरीकर





'दुर्गा झाली गौरी' मधील एक आकर्षक नृत्य

बालनाट्य शिक्षण शिबिरातील एक दृश्य



यांच्यासारख्या राष्ट्रीय पातळीवर सन्मानित झालेल्या कलावंतांच्या पिढीजाद तमाशाला वसंत सबनीस, शंकर पाटील व जगदीश खेबुडकर यांच्यासारख्या लेखकांनी खतपाणी पुरविले. आज हा काहीशा संकरित अशा तमाशाचा वग तग धरून आहे. संगीत बारीवर जरी सिनेमाचे आक्रमण झालेले असले तरी लिखित तमाशाचा विनोद, उपहास आणि चह्याटळपणा अजून आपली स्वत:ची शान राखून आहे. मराठी नाटकाला जाणाऱ्या शहरी प्रेक्षकापेक्षा वेगळा असा त्याचा आश्रयदाता आहे. त्याचा ढोलकीडफावरचा वारसा आपण मोलाचा मानला पाहिजे.

प्रायोगिक रंगभूमीला आजही व्यावसायिक रंगभूमीपेक्षा वेगळे असे अस्तित्व आहे. तीसएक वर्षांपूर्वी विजय तेंडुलकरांनी तिचा पाया घातला. त्यानंतर बऱ्याच वर्षांनी कै. चिं. त्र्यं. खानोलकरांनी तिच्यावर आपली कारकीर्द गाजविली. ' एक शून्य बाजीराव ' नंतर ' कालाय तस्मै नम: ', ' अवध्य ' ही व इतर नाटके त्यांनी मराठी रंगभूमीला दिली. खानोलकरांच्या नाटकांचे व एकांकिकांचे गुणावगुण काहीही असोत, प्रायोगिक रंगभूमीवरील त्यांचा दबदबा फार मोठा होता. त्यांच्या नाटकाचा घाट रूढीपासून सर्वस्वी वेगळा आणि कोणतेही आडाखे न पाळणारा असा होता. त्यांच्यातील कवी त्यांच्या नाटकावर सखोल परिणाम करून जाई. अखेरीस त्यांनी व्यावसायिक रंगभूमीशीही झटापट केली पण ती फारशी उपकारक ठरली नाही.

महेश एलकुंचवारांच्या प्रभावी एकांकिकांचा उल्लेख आधी आलेला आहे. ' गार्बो ', ' वासनाकांड ' आणि ' पार्टी ' ही त्यांची नाटके अभिनव नाट्यवस्तू आणि आगळा घाट यांच्यामुळे प्रेक्षकाला स्तिमित करून गेली. अच्युत वझे यांच्याही प्रायोगिक नाटकांचा उल्लेख आलेला आहे. छबिलदास चळवळीला जेव्हा उधाण आलेले होते त्या काळात वझ्यांच्या नवनाट्याची प्रायोगिकता रसिकांच्या नजरेत भरली. जब्बार पटेलांच्या हाताखाली तयार झालेले सतीश आळेकर हे आणखी एक महत्त्वाचे प्रायोगिक नाटककार. आपल्या प्रत्येक नाटकात त्यांनी तंत्रमंत्राचे नवनवे प्रयोग केले. त्या सर्वांत ' महानिर्वाण ' हे गाजले याचे कारण त्यात मृत्यू हाच विनोदाचा विषय दाखविलेला आहे.

**बाल रंगभूमी**

रूढार्थाने जिला प्रायोगिक समजत नाही परंतु जी व्यावसायिक नाही अशी दोन-तीन प्रकारची रंगभूमी आहे. पहिली बाल रंगभूमी. महाराष्ट्रात सुधा करमरकर यांच्याशी बाल रंगभूमीचे नाव निगडित आहे. लेखिका, दिग्दर्शिका व अभिनेत्री या तीनही नात्यांनी त्यांनी बाल रंगभूमीची दीर्घकाल सेवा केलेली आहे. त्यांच्याप्रमाणे स्वत:ची संस्था असलेली या क्षेत्रातील आघाडीची मंडळी म्हणजे रत्नाकर मतकरी, सुलभा देशपांडे आणि वंदना विटणकर ही होत. बाल रंगभूमीची चळवळ महाराष्ट्रात आता चांगलीच फोफावलेली आहे आणि या रंगभूमीवरील प्रयोगात उच्च दर्जाची लेखनमूल्ये व प्रयोगमूल्ये अनुभवायला मिळतात.

दलित रंगभूमी ही अलीकडच्या काळात उदयाला आलेली एक चळवळ. एकंदरीत राजकीय व साहित्यिक व्यासपीठावर दलितांच्या अस्मितेचा जो आविष्कार ठसठशीतपणे वृद्धिगत झाला त्याच्या संदर्भात दलित रंगभूमी जन्माला येणे अपरिहार्य वाटते. दलितांच्या समस्यांना वाचा फोडण्याचे काम या रंगभूमीवर आलेल्या नाटकांनी केलेले आहे. सुदैवाने या रंगभूमीच्या पाईकांनी कोणत्याही प्रकारची कडवी वा दुराग्रही भूमिका घेतलेली नाही.

अलीकडच्या स्त्रीमुक्ती चळवळीच्या संदर्भात ज्योती म्हापसेकर यांच्या ' मुलगी झाली हो ' या नाटकाचे प्रयोग महत्त्वाचे ठरतात. नाटकासारख्या कलेने प्रचारी असावे की नाही हा प्रश्न या प्रयोगामुळे उपस्थित होत नाही. स्त्रीमुक्तीच्या प्रश्नावर पोटतिडकीने म्हणण्यासारखे काही या कलावंतांजवळ आहे म्हणून आपोआपच त्यांच्या ज्वलंत आविष्काराला कलाकृतीचे स्वरूप प्राप्त होते. प्रायोगिक रंगभूमीवरील हा एक नवा, चैतन्यपूर्ण असा प्रवाह आहे.



दर वर्षी राज्य नाटयस्पर्धेबरोबरच 'उन्मेष', 'आय.एन्.टी.' इत्यादी संस्थासुद्धा एकांकिकांच्या वा नाटकांच्या स्वतंत्र स्पर्धा आयोजित करीत असतात. नाटयलेखन, दिग्दर्शन, निर्मिती व अभिनय या सर्व क्षेत्रांत उत्साह भरभरून वाहत असतो. या उत्साहाला विधायक वळण लावण्यासाठी काही कार्य चालू असते. राज्य शासनाचे सांस्कृतिक कार्य संचालनालय दर वर्षी यशस्वी स्पर्धकांसाठी शिबिरे भरवीत असते. 'आविष्कार' सारख्या संस्था आपली स्वतःची नाटयशिक्षण शिबिरे भरवितात. डॉ. कृ. रा. सावंत हे गेली वरीच वर्षे आपले नाटयशिक्षण केंद्र चालवीत आहेत. या सर्व चळवळींच्यामुळे प्रायोगिक रंगभूमीची बैठक कणखर होण्यास मदत होते.

व्यावसायिक पातळीवर मराठी रंगभूमीचे गुजराती व हिंदी रंगभूमीशी विशेष घनिष्ठ संबंध आहेत. विजय तेंडुलकर, खानोलकर, कानेटकर, दळवी, सुरेश खरे इत्यादींची नाटके सातत्याने या भाषांत गेलेली आहेत. प्रायोगिक काय किंवा व्यावसायिक काय, मराठी रंगभूमीचा दवदबा इतर भाषांत फार मोठा आहे. अलीकडेच प्रभाकर पणशीकरांनी आचार्य अत्र्यांच्या 'तो मी नव्हेच' या आपल्या गाजलेल्या नाटकाचा प्रयोग कानडीत वसवून तो कर्नाटकात यशस्वीपणे रंगमंचावर आणला. अशा प्रयत्नामुळे भाषाभाषांतील व राज्याराज्यातील संबंध दृढ करण्यास मराठी नाटकाचा आपोआपच हातभार लागलेला आहे आणि हे सगळे राष्ट्रीय एकात्मतेच्या दृष्टीने मोलाचे ठरते.

अनेक अडीअडचणींना तोंड देऊन मराठी नाटयव्यवसाय आज उभा आहे. अखिल भारतीय मराठी नाटयपरिषद ही नाटयप्रेमी आणि नाटयव्यावसायिक यांची मध्यवर्ती संस्था आज प्रगतीच्या मार्गावर आहे. नाटयपरिषदेतर्फे दर वर्षी अनेक सोहळे पार पाडले जातात, त्याचप्रमाणे गुणी कलावंतांना पारितोषिकेही दिली जातात. 'नाटयदर्पण' हे नियतकालिक दर वर्षी असाच एक सोहळा साजरा करते आणि पारितोषिके देते. अशा निमित्ताने महाराष्ट्र राज्य शासन आणि मराठी नाटयव्यवसाय यांच्यातील सहकार्य कायम राहते, वाढीला लागते.

मराठी रंगभूमीवर नाटककाराचे स्थान जितके महत्त्वाचे तितकेच नटाचे, दिग्दर्शकाचे, नेपथ्यकाराचे आणि अन्य तंत्रज्ञांचेही आहे. मराठी रंगभूमीच्या ऐन भरभराटीच्या काळात नाटक मंडळ्यांची जडणघडण वेगळी होती. नाटककार हा कंपनीच्या बिऱ्हाडी असायचा. देवल, खाडिलकरांसारखा नाटककार कंपनीचा तालीममास्तरसुद्धा असायचा. गंधर्व नाटक मंडळीत तर खाडिलकरांचे स्थान एखाद्या गुरूइतके महत्त्वाचे असायचे. नाटक कंपन्यांचे दौरे होत तेव्हा पुष्कळदा एकेका गावी आपली तीन-चार नाटके घेऊन कंपनी काही आठवडे मुक्काम ठोकून बसायची. १९४३ साली मराठी रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाला आस्ते आस्ते सुरुवात झाली तरी तिची आर्थिक घडी पार वदलली. गावोगावी कंत्राटदारांना महत्त्व आले आणि 'चालणारी' नाटके म्हणून काही सपक किंवा गल्लाभरू प्रयत्नांना महत्त्व आले. अजूनही राज्य नाटयस्पर्धेत पुढे येणाऱ्या प्रायोगिक नाटककारांना व्यावसायिक रंगमंचावर ठामपणे पाऊल रोवून उभे राहता येत नाही याचे एक कारण म्हणजे पुण्या-मुंबईबाहेरील धंद्याची कोंडी हे होय.

केशवराव दाते, नानासाहेब फाटक आणि मास्टर दत्ताराम यांच्यासारखी श्रेष्ठ कलावंत मंडळी महाराष्ट्र राज्य स्थापनेनंतरच्या काळात अस्तंगत झाली. यांच्यापैकी दत्तारामांनी कानेटकरांच्या 'रायगडा'तला शिवाजी, 'मत्स्यगंधे'तील भीष्म आणि शिरवाडकरांच्या 'ययाती आणि देवयानी' मधील ययाती अशा भूमिका चिरस्मरणीय शैलीत वठविल्या. एखाददुसरा तुरळक अपवाद सोडता 'क्लासिकल' नाटके आणि 'क्लासिकल' भूमिका मागे पडल्या तरी प्रभाकर पणशीकर ('तो मी नव्हेच'), काशिनाथ घाणेकर ('गारंबीचा बापू'), कै. सतीश दुभाषी ('बेईमान') आणि डॉ. श्रीराम लागू यांच्यासारखे मोठ्या ताकदीचे नट मराठी रंगभूमीला लाभले. डॉ. लागू आणि अमोल पालेकर यांच्यासारख्या कलावंतांनी चित्रपटासारख्या स्पर्धक धंद्यात गुंतूनही वेळोवेळी प्रायोगिक रंगभूमीवर महत्त्वाचे काम केले. आज या सर्व नटांच्या पाठची तरुण नटांची एक नवीच्या नवी



पिढी मराठी रंगभूमीवर दिसत आहे. श्रेष्ठ चरित्र-अभिनयाची प्रचीती कै. शांता जोग, विजया मेहता, भक्ती बर्वे इत्यादी नटींनी दिली आणि आजही नवोदित अभिनेत्रींची गुणवत्ता आशादायक वाटते.

मराठी रंगभूमीला लाभलेल्या काही मोजक्याच दर्जेदार नेपथ्यकारांत श्याम आडारकर, रघुवीर तळाशीलकर, बाबा पार्सेकर, पांडुरंग कोठारे, बापू लिमये इत्यादींचा उल्लेख केला पाहिजे. नाट्यसंपदेच्या ‘ तो मी नव्हेच ’ च्या निमित्ताने कोल्हापूरच्या राजाराम चव्हाणांनी फिरता रंगमंच निर्माण केला. पुढे सखाराम भाव्यांनी ‘ जॅक नाईफ स्टेज ’ प्रचारात आणले. महाराष्ट्र राज्य स्थापनेनंतरच्या काळात तंत्र दृष्टचा सुसज्ज असे पुण्याचे बालगंधर्व रंगमंदिर व टिळक स्मारक मंदिर त्याचप्रमाणे ठाण्याचे गडकरी रंगायतन अस्तित्वात आले. तरीसुद्धा जिल्हा-तालुका पातळीवर चांगल्या नाटकगृहांची गरज अजून पुरी झालेली नाही.

मराठी संगीत नाटक हे आपल्या रंगभूमीचे एक भूषण. त्याची प्रगती आज धिम्या गतीने चालू आहे. विद्याधर गोखल्यांखेरीज वि. वा. शिरवाडकर, वसंत कानेटकर यांच्यासारख्या काही थोड्या नाटककारांनी या प्रगतीला हातभार लावला. पूर्वीच्या ‘ सौभद्रा ’ त काम करणारे कलावंत सोडले तर रामदास कामत व आशालता यांच्या पाठोपाठ कीर्ती शिलेदार, नारायण बोडस, फैय्याज यांच्यासारखे गायक कलावंत आजच्या संगीत नाटकात वावरताना दिसतात. गीतकार व नाटककार म्हणून या क्षेत्रातील अशोकजी परांजपे यांची कामगिरीसुद्धा हरहुन्नरी आहे. मात्र संगीत नाटकाचे हे रोप ‘ घाशीराम ’ अथवा ‘ हयवदन ’ चा अपवाद सोडता प्रायोगिक रंगमंचावर काही मूळ धरत नाही.

गेल्या २५ वर्षांतील मराठी रंगभूमीचा असा हा संसार. मराठी नाटकाचे मराठी माणसाचे वेड इतके मोठे आहे की इंग्लंड-अमेरिकेत राहणारे महाराष्ट्रीयसुद्धा मराठी नाटके बसवितात. गेल्या काही वर्षांत प्रायोगिक रंगभूमीने पाश्चात्त्य नाटकांची उसनवारी करण्याचे खूपच कमी केलेले आहे. पूर्वी बोलपटांच्या आक्रमणाने मराठी नाटकधंद्याला धक्का दिला. परंतु आजच्या दूरचित्रवाणीपासून कितपत धोका आहे हे अजून कळायचे आहे. करमणूक म्हणून नाट्यव्यवसायाचा अंगीकार करीत असतानाच जनप्रबोधनाचे एक प्रभावी माध्यम म्हणून मराठी नाटकाकडे पाहावयास त्याचे सेवक विसरलेले नाहीत. विसाव्या शतकाच्या तिसऱ्या व चौथ्या दशकात मराठी रंगभूमीच्या दीर्घ परंपरेत जो खंड पडला त्याचा विसर पडावा इतके सातत्य आजच्या मराठी रंगभूमीच्या विविधांगी प्रगतीत निश्चितच आहे.



*'गांधी' चित्रपटात रोहिणी हट्टंगडी. मराठी रंगभूमीची चित्रपटसृष्टीला देन*

# मराठी चित्रपट

अरुण खोपकर

एखाद्या शॉटची मांडणी करताना अग्रभूमीवरील घटनांना किती महत्त्व द्यायचं आणि पार्श्वभूमीला किती द्यायचं ह्याचा काही विवेक असतो. अग्रभूमी व पार्श्वभूमी ह्यांच्या सापेक्ष महत्त्वाचा तोल हा आपण ज्या दृष्टिकोनातून ह्या घटनांकडे बघतो त्याचा अचूक निदर्शक असतो. महाराष्ट्रात गेल्या पंचवीस वर्षांत झालेल्या चित्रनिर्मितीत मराठी चित्रपट इथं अग्रभूमी मानले व बाकीचे विशेषत: हिंदी चित्रपट पार्श्वभूमी मानले तर एक गोष्ट निश्चितच मान्य करावी लागेल, ती म्हणजे अग्रभूमीवर होणाऱ्या घटनांपेक्षा अगदी वेगळ्या स्वरूपाच्या घटना पार्श्वभूमीवर होत आहेत. त्यामुळे ह्या दोन भूमींचा संबंध साधा पूरक संबंध नाही (तसाच तो बादरायण संबंधही नाही) हे आपल्याला ध्यानात घ्यायला लागेल. त्याच्या विशिष्ट स्वरूपाचे विश्लेषण करणे हे ह्या आढावावजा लेखात अशक्य आहे. परंतु त्यातील ताणाच्या स्वरूपाबद्दल चार शब्द इथं अप्रस्तुत ठरणार नाहीत. किंबहुना अग्रभूमीवरील घटनांची चौकट निश्चित करण्यास त्याची मदतच होईल.

१९६० साल हे भारतीय चित्रपटाच्या दृष्टीने एक महत्त्वाचं साल ठरतं. ह्या वर्षी फिल्मफेअर पारितोषिक मिळविलेला 'मुगल-ए-आझम' हा भारतीय चित्रपटांच्या आलेखरेषेचा एक उच्च बिंदू आहे तसाच तो व्यासबिंदूदेखील आहे. ह्या परंपरेत असणारा जिवंतपणा, तळमळ, सचोटी, जिद्द इथं एका उंचीपर्यंत पोचतात आणि थांबतात. १९६२ साली बनलेला गुरुदत्तचा 'साहिब, बिबी, गुलाम' हा आणखी एक असाच मानबिंदू.

१९४७ साली कंपन्यांचा जमाना संपल्यानंतर चित्रनिर्मितीला सातत्य, दर्जा आणि नाव प्राप्त करून देणाऱ्या बहुतेक



'अयोध्येचा राजा' मध्ये दुर्गा खोटे व गोविंदराव टेंबे

भारतीय चित्रपट व्यवसायाचे संस्थापक स्व. दादासाहेब फाळके



'संत तुकाराम' मधील एक दृश्य. चित्रपटाच्या जागतिक इतिहासात मानाचे स्थान मिळविण्याच्या योग्यतेचा बोलपट



दिग्दर्शकांची कारकीर्द १९६०–६४ च्या सुमारास संपते किंवा त्यांचे ऱ्हासपर्व सुरू होते. के. आसिफ, राज कपूर, बिमल रॉय आणि गुरुदत्त ही ह्यातली काही महत्त्वाची नावं. नेहरू कालखंडातल्या आशा-आकांक्षा, स्वप्न आणि सभ्यता ह्या दिग्दर्शकांच्या चित्रपटात साकार होतात. समाजवाद, पंचशील, ध्येयवाद ह्यांची जसजशी दैनंदिन जीवनापासून फारकत होऊ लागली तसतसा चित्रपटातील नायक-नायिकात एक कठोरपणा येऊ लागला. राज कपूर ते अमिताभ बच्चन (मार्गे शम्मी कपूर) हा प्रवास ही गोष्ट आपल्याला सहज जाणवून देतो. 'आनंद' मधल्या (१९७१) राजेश खन्नाच्या हसण्याला, हसवण्याला एक हिस्टेरिक झालर आहे. 'दीवार' मध्ये (१९७५) अमिताभ बच्चनच्या संतप्त तरुणात ह्या हास्याला, मृदुत्वाला जागाच उरली नाही. एकीकडे वाढता संताप व दुसरीकडे त्यामुळेच अजस्र बनलेले स्वप्नांचे कारखाने (अमर अकबर अँथनी) ह्या दोन ध्रुवात आपण सुरुवातीला जिला पार्श्वभूमी म्हटले होते तिचे वर्णन करावे लागते.

हिंदी चित्रपट निर्मितीच्या ह्या तुटक रेखाटनानंतर सरळ १९६० च्या मराठी चित्रपटाकडे येण्यापूर्वी आपण मराठी चित्रपटाच्या सुरुवातीपासूनचा धावता आढावा घेऊ. त्यामुळे मराठी चित्रपटनिर्मितीच्या विशिष्ट स्वरूपाचं आकलन व्हायला आपल्याला मदत होईल.

दादासाहेब फाळके ह्यांचा भारतीय चित्रपट व्यवसायाचे संस्थापक हा उल्लेख अपुरा आहे. चित्रपट व्यवसायाचा पाया घालताना त्यांना भारतीय चित्रपटाचं पाश्चात्य चित्रपटांपासून वेगळं असं स्वत:चं स्वरूप निश्चित करावं लागलं. हा वेगळेपणा केवळ चित्रपट विषयांपुरता मर्यादित नव्हता तर घाट आणि आशयापर्यंत जाऊन पोचत होता. भारतीय चित्रकलेच्या, प्रतिमा निर्मितीच्या प्राचीन परंपरेच्या अभिजात आणि लोकप्रिय दोन्ही परंपरांशी नातं जोडायचा त्यांनी प्रयत्न केला. रविवर्म्यांच्या चित्रशैलींचा त्यांनी केलेला वापर ह्याचीच साक्ष देतो.



'संत ज्ञानेश्वर' मधील एक हृदयस्पर्शी प्रसंग



'रामशास्त्री' चित्रपटातील एक दृश्य



'प्रभात' चा कालखंड हा केवळ महाराष्ट्राच्या
त्रपट इतिहासाच्या संदर्भातच नव्हे तर भारतीय
त्रपटांच्या इतिहासाच्या दृष्टीनेही महत्त्वाचा कालखंड
हे. फाळक्यांनी आपल्या देशाभिमानाला आपल्या
राणिक चित्रपटांतून वाट दिली. 'प्रभात'च्या
त्रनिर्मात्यांनी आपल्या संतपटांतून भारताच्या एका
त्यंत सर्जनशील आणि प्रभावी परंपरेशी नातं जोडलं.
गनीसांचा तुकाराम हा ऐतिहासिक तपशीलाच्या
ळाबेरजेतून तयार झालेली मेणाची वाहुली नाही तर
कारामाच्या अस्तित्वातल्या मेणाहून मऊ आणि वज्राहून
ठोर अशा विरोधाचे सगुण, साकार स्वरूप आहे. गौरी आणि
कारामाच्या चित्रणातून प्रकृतिपुरुषाच्या विरोध संगतीचं द्वंद्व
भा करणारा हा चित्रपट, चित्रपटांच्या जागतिक इतिहासातही
ानाचं स्थान मिळवायला लायक आहे. कलेच्या सुरुवातीच्या
ाळातच (१९३६) शक्य असलेल्या निरागस प्रतिभेचा
तुकाराम' हा अविस्मरणीय आविष्कार आहे.

'प्रभात' चे सामाजिक चित्रपट ही व्ही. शांताराम ह्यांची
र्मिती. 'कुंकू' (१९३७), 'माणूस' (१९३९) आणि
ंजारी (१९४१) हा त्यांच्या सर्जनशीलतेचा सर्वोत्कृष्ट काल.
ुरुषप्रधान भारतीय चित्रपटात तडफदार स्त्रीची नाव घेण्यासारखी
चित्रणं हाताच्या बोटावर मोजण्याइतकी, आजच्या स्त्रीमुक्ती
ळवळीच्या काळातही शांता आपटे यांनी 'कुंकू' मध्ये
ंगविलेल्या भूमिकेसारख्या भूमिका विरळा आहेत.

चांगल्या 'समस्याप्रधान' चित्रपटांपेक्षाही दुर्मिळ गोष्ट
म्हणजे दर्जेदार विनोदी चित्रपट. भारतीय चित्रपटात शारीरिक
व्यंगाची, पेशाची, वेशाची आणि परप्रांतीयांची टवाळी उडवणं
इथपर्यंतच विनोदाची मर्यादा साधारणतः जाते. तेव्हा मास्टर
विनायकांचे ब्रह्मचारी (१९३८), सरकारी पाहुणे (१९४२)
हे चित्रपट भारतीय चित्रपटांच्या इतिहासात मानाचं स्थान
मिळवितात. विनायकांचा विनोद हा केवळ शाब्दिक विनोद
नाही तर तो खराखुरा सिनेमॅटिक विनोद आहे.





व्ही. शांताराम यांच्या सुप्रसिद्ध 'माणूस' चित्रपटात शांता हुबळीकर
प्रभातचे संगीत दिग्दर्शक मा. कृष्णराव संगीत दिग्दर्शन करीत असताना



कुंकू (१९३७) : स्त्रीमुक्तीच्या आजच्या जमान्यातही असा परिणामकारक चित्रपट विरळा



*ब्रह्मचारी : मा. विनायकांच्या या व इतर विनोदी चित्रपटांना चित्रपट इतिहासात महत्त्वाचे स्थान आहे*



राष्ट्रपती पदकाचा मान मिळविणाऱ्या 'श्यामची आई' चित्रपटातील एक दृश्य



१९४४ चा 'प्रभात' चा 'रामशास्त्री' हा 'कंपनी' युगाची अखर असंच मानावं लागेल. १९४५ साली तर एकही मराठी चित्रपट झाला नाही आणि शिवाय स्वातंत्र्यप्राप्तीनंतर चित्रपट व्यवसायाची एकूण जडणघडण बदलली त्याप्रमाणे मराठी चित्रपट व्यवसायाचीही बदलली.

जुन्यांपैकी व्ही. शांताराम बऱ्याच प्रमाणात हिंदीकडे वळले. 'लोकशाहीर राम जोशी' (१९४७) आणि 'अमर भूपाळी' (१९५१) नंतर त्यांची महत्त्वाची निर्मिती हिंदीतच झाली. मात्र अलीकडे 'पिंजरा' आणि 'चानी' बरोबर ते मराठीत परत आले. आचार्य अत्र्यांनी विनोदी चित्रपटांची निर्मिती सोडून गंभीर विषयाकडे लक्ष वळवलं. त्यांच्या 'श्यामची आई' ने १९५३ मध्ये राष्ट्रपती पदकाचा सन्मान मिळविला. त्यांनी १९५४ मध्ये 'महात्मा फुले' केलं खरं पण त्यानंतर हळूहळू ते संपूर्णत: राजकारणात बुडाले.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळातले मराठीतले सर्वांत महत्त्वाचे दिग्दर्शक म्हणजे श्री. राजा परांजपे. ते स्वत: उत्तम नट होते. त्यांची कल्पनाशक्ती आणि विनोदबुद्धी तल्लख होती. माध्यमाची जाणीव चांगली होती. त्यांचे 'पेडगावचे शहाणे' (१९५२), लाखाची गोष्ट (१९५२) ह्या चित्रपटांत वास्तववाद, विक्षिप्त विनोद आणि सहृदयता ह्यांचं सुंदर मिश्रण पहायला मिळतं. ह्या चित्रपटांबरोबरच नाव घेण्यासारखा विनोदी चित्रपट म्हणजे श्री. पु. ल. देशपांडे ह्यांचा 'गुळाचा गणपती' (१९५३). मात्र श्री. देशपांडे ह्यांच्या सिनेविनोदाचं स्वरूप श्री. परांजपे ह्यांच्यापेक्षा मास्टर विनायकांशी नातं सांगतं.

१९६० पर्यंतच्या काळातील (आणि त्यानंतरच्या काही वर्षांतील) स्मरणीय अशी दोन नावं म्हणजे श्री. ग. दि. माडगूळकर आणि श्री. सुधीर फडके. माडगूळकरांची पटकथा, गीते आणि सुधीर फडक्यांचे संगीत ह्याची महाराष्ट्राला चटक लागली होती.

ह्या सुमारास कौटुंबिक चित्रपटांना महाराष्ट्रात एक महत्त्व आलं. हिंदी चित्रपटांच्या स्पर्धेत लागून राहताना, मध्यमवर्गीय प्रेक्षकांशी नातं जोडायचा यशस्वी नमुना म्हणजे कौटुंबिक चित्रपट.



'अमर भूपाळी' मध्ये पंडितराव नगरकर व संध्या



'सामना' चित्रपटात डॉ. श्रीराम लागू



श्री. धर्माधिकारींच्या चित्रपटांनी हे साधलं. 'बाळा जो जो रे' (१९५१), 'चिमणी पाखरं' (१९५२) ह्यांच्या यशातून हेच सिद्ध होतं.

ग्रामीण प्रेक्षकांशी नातं जोडायचा नमुना म्हणजे तमाशा चित्रपट. तसे तमाशा चित्रपट मराठीत नवे नाहीत. पण १९५९ च्या 'सांगत्ये ऐका' च्या प्रचंड आर्थिक यशानंतर मात्र मराठीतील 'ग्रामीण' चित्रपटांना चांगलाच बहर आला.

नमुन्याबरहुकूम निर्मिती ही कला दृष्टया हीन निर्मिती असते असा मुळीच दावा नाही. किंबहुना कोणत्याही कलेत अभिजात अभिव्यक्ती ही परंपरा आणि नवता ह्यांच्या परस्पर ताणातून होत असते. जेव्हा साचा वरवर कायम वाटतो तेव्हा त्याच्या अंतर्गत रचनाघटकात सूक्ष्म अथवा मूलगामी बदल होऊ शकतात आणि शेवटी साच्याचं स्वरूप आमूलाग्र बदलूही शकतं. विकसनशील भांडवलशाहीत क्रयवस्तूत सतत सुधारणा होण्यात नमुन्याबरहुकूम निर्मितीचा मोठा वाटा आहे.

अमेरिकन चित्रपटांत वेस्टर्न म्युझिकल इत्यादी नमुने तयार होऊनही त्यात अभिजात निर्मिती होऊ शकली. मात्र मराठी चित्रपटांचा दर्जा उंचावण्यात कौटुंबिक आणि ग्रामीण ह्या दोन नमुन्यांची फारशी मदत झाली नाही असेच म्हणावे लागते.

नमुन्याबरहुकूम निर्मिती होत असताना चांगल्या दिग्दर्शकांनाही नमुना आणि त्याच्या बाहेरचे अंशातून वाट काढावी लागते. १९६० नंतरच्या काळातले ह्यातले एक महत्त्वाचे दिग्दर्शक म्हणजे श्री. राजदत्त. त्यांनी दिग्दर्शित केलेल्या चित्रपटात 'देवकी नंदन गोपाला'चा (१९७८) विशेष उल्लेख करण्यासारखा आहे. गाडगे महाराजांसारख्या लोकांच्या आठवणीत ताज्या असलेल्या व्यक्तीच्या जीवनावर चित्रपट काढणे हे आधीच कठीण. त्यात जमावाची चित्रणं ही प्रादेशिक भाषांच्या अर्थसंकल्पात बसणं त्याहून कठीण. पण गाडगेमहाराजांच्या भक्तीनं लोकांचं सहकार्य मिळालं आणि निसर्गवादी शैलीच्या लिटमस कसोटीला श्री. राजदत्त उतरले.





'पुढचं पाऊल' मध्ये पु. ल. देशपांडे व राजा परांजपे

'जय मल्हार' मध्ये ललिता पवार व बाबुराव पेंढारकर




'सिंहासन' चित्रपटातील एक दृश्य



त्यांचा 'शापित' (१९८२) चित्रपट दलित समाजाचं चित्रण करण्याचा प्रयत्न आहे. ह्यातले काही प्रसंग (उदा. मेलेल्या ढोराभोवती घुटमळणारी गिधाडे, 'पुत्र' जन्मानंतर साखर वाटण्याचा प्रसंग) चित्रपट संपल्यावरही मनात घुटमळतात. श्री. निळू फुले ह्यांनी उभा केलेला, श्री. ग. रा. कामत ह्यांनी कल्पिलेला आजोबा ही ह्यातली एक खास व्यक्तिरेखा आहे. बहुधा संपूर्ण काळ्या अथवा संपूर्ण पांढऱ्या रंगात रंगवल्या जाणाऱ्या पात्रात हे बहुरंगी, इरसाल आणि करुण पात्र आपलं मन जिंकून घेतं. सामाजिक दडपण जसं बाहेरून असतं तसंच ते दडपल्या जाणाऱ्या माणसाच्या मनात घर करून बसतं. त्यामुळ ते बदलाला विरोध करणारी एक शक्ती बनतं. अशा व्यक्तीचं चित्रण करताना तिला पुरोगामी आणि प्रतिगामी अशा नेटक्या गटात बसता येत नाही. ह्या पात्राचं चित्रण करताना श्री. राजदत्त, श्री. कामत आणि श्री. निळू फुले ह्यांनी आपल्या सहृदयतेची प्रचीती आणून दिली आहे.

श्री. राजा ठाकूर ह्यांचा 'मुंबईचा जावई' (१९७०) हा मराठीच्या विनोदी चित्रपटांच्या परंपरेची आठवण करून देऊन बासु चटर्जीच्या सहाय्याने हिंदीत गेला. त्यांच्याच 'रंगल्या रात्री अशा' (१९६२) हा चित्रपटही उल्लेखनीय आहे.

श्री. कमलाकर तोरणे ह्यांचा 'आम्ही जातो आमुच्या गावा' (१९६८) हा चित्रपट जरी 'मध्यवर्ती कल्पना परकीय' ह्या सदराखाली मोडत असला तरी त्याचा एकूण चेहरामोहरा जमून गेला होता. त्यांच्या 'आराम हराम है'ला (१९७६) फिल्म फेअर पारितोषिक मिळालं होतं.

श्री. विजय तेंडुलकरांच्या 'शांतता ! कोर्ट चालू आहे' ह्या नाटकावर आधारित व श्री. सत्यदेव दुबे दिग्दर्शित चित्रपट (१९७१) हा नाटकाइतके आर्थिक यश मिळवू शकला नाही. माध्यमबदलाच्या ह्या प्रयत्नात श्रीमती सुलभा देशपांडे ह्यांची बेणारेबाई मात्र चांगलीच लक्षात रहाते.

अलीकडच्या काळातील महत्त्वाचे दिग्दर्शक म्हणून श्री. जब्बार पटेल ह्यांचंच नाव घ्यावं लागेल.

श्री. जब्बार पटेल ह्यांचा अगदी पहिला चित्रपट 'सामना' (१९७५) बघितला तर ग्रामीण चित्रपटाच्या काही जन्मखुणा त्यावर दिसतात. तसेच श्री. पटेल ह्यांच्या नाट्यक्षेत्रातील यशाची सावलीही आढळते. तसं पाहिलं तर मराठी परंपरेतल्या 'तुकाराम' इत्यादी चित्रपटांनी चित्रपट माध्यमाच्या भाषेत जी भर घातली तशा प्रकारची भर 'सामना' घालत नाही. त्यातील शैलीमुळे सिनेमॅटिक चित्रणाऐवजी नाट्याच्या चित्रणाची जाणीव अनेकदा होते. पण ह्या नाटकावर मात्र श्री. जब्बार पटेल आणि त्यांचे सहकारी कलाकार निळू फुले आणि श्रीराम लागू ह्यांची पकड पक्की आहे. नाट्याच्या निसर्गवादी शैलीतील अभिनयतंत्रावरच्या प्रभुत्वामुळे सिनेमात नाट्यमय आविष्कारात एकसंधत्व जाणवतं. 'सामना' चा कथाविषय हा महाराष्ट्राच्या ग्रामीण भागातील संघर्षाचं चित्रण असल्यामुळे. त्यातील समकालीनतेमुळे हा चित्रपट नेहमीच वेगळा वाटला आणि श्री. पटेल ह्यांच्या चित्रपट कारकिर्दीबद्दल अपेक्षा निर्माण झाल्या.

त्यांचा दुसरा चित्रपट 'जैत रे जैत' (१९७८). 'सामना' पेक्षा वेगळ्या शैलीतलं चित्रण करण्याचा श्री. पटेल ह्यांचा हा प्रयत्न. त्यांच्या नाट्यदिग्दर्शनात ते निसर्गवादी. आभासवादी शैलीच्या कधीच बाहेर पडले होते. 'जैत रे जैत' मध्ये सूत्रधाराचा त्यांचा वापर पाहताना मात्र रचनात्मक आणि निसर्गवादी शैलींचा मेळ न झाल्याची जाणीव होते. इथं कथाविषयापासून मांडणीपर्यंत रोमँटिसिझमची श्री. पटेलांवर असणारी छाया जाणवते.

घाट न साधल्याची जाणीव श्री. पटेलांना स्वतःच झाली म्हणून की काय, पण ते निसर्गवादी-नाट्यमय शैलीकडे आणि त्याला अनुरूप कथाविषयाकडे परत वळले. ह्यावेळी त्यांचा कथाविषय होता श्री. अरुण साधूंच्या पत्रकारशैलीतल्या कादंबऱ्या. 'सिंहासन' मध्ये (१९७९) राजकीय पार्श्वभूमीवर थ्रिलर करण्यात श्री. पटेल यशस्वी झाले आहेत. इथं थ्रिलर हा शब्दाचा वापर घाटाचे समर्पक वर्णन म्हणून केला आहे, कमीपणा दाखविण्याकरता नाही. (कोस्टा गाव्हराच्या



चित्रपटांचेही ह्याच शब्दांनी वर्णन करता येईल.) ह्या चित्रपटात महाराष्ट्राच्या नाट्य-चित्रसृष्टीतील बहुतेक प्रथितयश अभिनेत्यांचा उपयोग करून त्यांच्यापैकी काहीजणांकडून चाकोरीबाहेरील चित्रण करून घेण्यात श्री. पटेल यशस्वी झाले आहेत. उदा. श्री. दत्ता भट ह्यांच्या भूमिकेत अशा काही बेरकी-निरागस छटा येतात की त्या विसरणे कठीण आहे. 'प्रभात'च्या 'माणूस', 'कुंकू' अशा तत्कालीन समस्याविषय असणाऱ्या चित्रपटांनंतर समकालीन घटनांचा कथाविषय घेण्याबद्दल श्री. पटेल ह्यांचा उल्लेख करावा लागेल. श्रीराम लागू, अरुण सरनाईक, सतीश दुभाषी, रिमा लागू इत्यादी कलाकारांच्या नेटक्या भूमिका पाहण्याचं समाधान 'सिंहासन' पाहताना मिळतं.

श्री. पटेल ह्यांचा अलीकडचा चित्रपट म्हणजे 'उंबरठा' (१९८१). जुन्या मराठी चित्रपटांसारखा हाही मराठी आणि हिंदी ह्या दोन्ही आवृत्त्यांत करण्यात आला. 'सिंहासन'मधल्या निसर्गवादी शैलीची ही पुढची पायरी आहे. 'सिंहासन'मधील वास्तव हे राजकीय-सामाजिक पातळीवर असून अधूनमधून वैयक्तिक पातळीवर येतं. शिवाय हे वास्तव कादंबरीलेखकाच्या विशिष्ट सामाजिक दृष्टिकोनातून आधीच एकसंध झालेलं आहे. 'उंबरठा' हे चित्र एका व्यक्तिगत अनुभवावर उभ्या राहिलेल्या कादंबरीवर आधारित आहे. इथं एक गोष्ट नमूद करावीशी वाटते. निसर्गवाद, वास्तववाद ह्यांच्या गृहीततत्त्वात परिस्थितीच्या 'वस्तुनिष्ठ' चित्रणाला खूप महत्त्व आहे. मात्र हे जास्तीत जास्त वस्तुनिष्ठ व्हावं म्हणून कलावंताला विशेष परिचित अशा परिस्थितीचं चित्रण होऊ लागलं. म्हणजेच त्याच्या भोवतालच्या परिस्थितीचं आणि शेवटी त्याच्याच आयुष्याचं चित्रण होऊ लागलं. आत्मनिष्ठेचा त्रस्त समंध पुढील दारानं बाहेर काढल्यावर अशा प्रकारे मागील दारानं परत येतो. 'उंबरठा'तील वास्तववादी चित्रणात अशीच काहीशी अडचण आलीय. व्यक्तिगत अनुभवांच्या प्रसंगप्रधान चित्रणातून येणारे चुटकेवजा स्वरूप टाळणे आणि एकसंध, समर्थ आणि आशयघन घाट बनविणे ह्या दोन्ही गोष्टींचा मेळ साधता येणं ही सोपी गोष्ट नव्हे. त्यामुळे अशा प्रयत्नात हाती आलेलं सूक्ष्म तडे गेलेलं यशही खुज्या ध्येयांच्या १०० टक्के साफल्यापेक्षा महत्त्वाचं ठरतं. ह्या चित्रणात सवंग भावुकतेला बळी न पडता ठेवलेली तटस्थता, मानवी स्वभावाचे सूक्ष्म निरीक्षण, कलावंताकडून उत्तम कामे करवून घेणं ह्या अनेक गोष्टींमुळं 'उंबरठा' चित्रपटाला एक महत्त्वाचा टप्पा म्हणावं लागेल. स्मिता पाटीलचा नैसर्गिक अभिनय हे ह्या चित्रपटाचं खास वैशिष्ट्य. हिंदी चित्रपटांच्या स्वप्नांच्या कारखान्याला तोंड देऊन आपलं स्वत्व कायम राखण्याच्या मराठी चित्रपटांच्या प्रयत्नात वास्तववादावर आणि निसर्गवादावर भर दिला गेला. त्यामुळे सच्च्या, सरळ चित्रणाचे काही चांगले नमुने आपल्याला पहायला मिळाले. परंतु चित्रपटाच्या एकूण स्वरूपाविषयी मूलगामी विचार ज्यातून दृष्टीस पडतील असे चित्रपट मात्र निर्माण झाले नाहीत. 'एक शून्य बाजीराव', 'घाशीराम कोतवाल' आणि शेवटी 'बेगम बर्वे' इत्यादी नाटकांनी मराठी नाटक केवळ भारतात आघाडीवर ठेवले नाही तर नाट्यकलेच्या काही मूलभूत प्रश्नांना हात घातला. मराठी चित्रपटात मात्र हे झाले नाही. 'घाशीराम कोतवाल' आणि 'बेगम बर्वे' ह्या नाटकांनी संगीत नाटकाच्या मराठी परंपरेचा आधुनिक अर्थ सांगितला. 'संत तुकाराम' मध्ये विष्णुपंत पागनीसांनी जो अभिनय केला तो जागतिक चित्रपटात महत्त्वाचा आहे. मात्र अलीकडच्या चांगल्या मराठी चित्रपटांनी निसर्गवादाच्या माहितीच्या हमरस्त्याने प्रवास केला. ह्यांतील काही उल्लेखनीय चित्रपटांचा आपण इथं विचार करू.

जयू आणि नचिकेत पटवर्धन ह्या स्थापत्यशास्त्रज्ञ जोडप्यानं केलेला '२२ जून १८९७' (१९८०) ह्या चित्रपटात वास्तू आणि अवकाश ह्यांच्या कलात्मक शक्यतांचा उपयोग केला आहे. हाही चाकोरीबाहेरचा प्रयत्न आहे. मात्र चित्रपटशैलीच्या अनिश्चिततेची आणि नवखेपणाची चित्रपट पाहताना जाणीव होते.

अलीकडच्या काळात मराठीतील अनेक नामवंत कलावंत नाटक आणि सिनेमा ह्या दोन्ही माध्यमांची कास धरून आहेत. ह्यांपैकी एक महत्त्वाचं नाव म्हणजे श्री. अमोल पालेकर ह्यांचं.

*'२२ जून १८९७' मधील तीन करारी तरुण*



'उंबरठा' चित्रपटात गिरीश कर्नाड व स्मिता पाटील



प्रयोगशील दिग्दर्शक म्हणून नाट्यसृष्टीत आणि नैसर्गिक अभिनेता म्हणून चित्रपटसृष्टीत यश मिळविल्यावर त्यांनी 'आक्रीत' (१९८१) हा चित्रपट केला. नरबळीला प्रेरित झालेल्या माणसांच्या कहाणीत (ह्रीदेखील महाराष्ट्रात घडलेल्या काही घटनांवर आधारित आहे) श्री. पालेकरांचा अभिनय बघण्यासारखा आहे.

ह्या गुणात्मक आढाव्यात काही गणनात्मक गोष्टी न आल्यास तो जरा अपुराच राहील. 'विच्छा माझी पुरी करा' ह्या अतियशस्वी लोकनाट्याचे कर्ते श्री. दादा कोंडके ह्यांनी चित्रपटसृष्टीत प्रवेश केल्यावर तितकंच आर्थिक यश मिळवून 'गिनेस बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड्स' मध्ये नामोल्लेख मिळविला.

हा आढावा जरी चित्रपटांपुरता मर्यादित असला तरी १९८५ मध्ये टेलिव्हिजनचित्रपटांबद्दल न बोलणे हे फारच कर्मठपणाचे ठरेल. टीव्हीवर लोकप्रिय झालेल्या श्री. चिं. वि. जोशी यांच्या लेखनावर आधारलेल्या चिमणराव मालिकेनंतर श्री. विनय धुमाळे ह्यांनी त्यावर आधारित संपूर्ण चित्रपट केला. तो पाहताना ज्या काही गोष्टी लक्षात आल्या त्यांपैकी एक म्हणजे चांगला चित्रपट टीव्हीवर यशस्वी ठरतो पण चांगला टीव्हीकार्यक्रम चित्रपट म्हणून यशस्वी होतोच असं नाही. टेलिव्हिजन ह्या मिश्र माध्यमाने अजूनही स्वतःचं असं सौंदर्यशास्त्रीय स्वरूप मिळविलेले नाही. त्यामुळे टीव्ही ते सिनेमा प्रवास जरा अडचणीचा आणि हालाचा. शिवाय टीव्हीमालिकेच्या तुकडेवजा, प्रसंगप्रधान निवेदनातून एकसंघ चित्रपट जमणं जरा कठीणच. केवळ अपूर्णांकाच्या बेरजेतून चित्रपटांचा एकांक जमत नाही हे कटु सत्य इथं अनुभवाला येतं.

श्रीमती विजया मेहता ह्यांनी लक्ष्मीबाई टिळकांच्या 'स्मृतिचित्रे' ह्या मराठीतील अत्यंत श्रेष्ठ कलाकृतीचं रूपांतर केलं. साहित्याचं दृक्‌श्राव्य माध्यमात रूपांतर करण्याच्या समस्या जुन्याच आहेत. कृतीला अत्यंत यांत्रिकपणे प्रामाणिक राहणारी रूपांतरं सपशेल आपटलीही आहेत किंवा जिवंतपणे प्रामाणिक राहून ब्रेसाँसारख्याच्या हाती यशस्वीही झाली आहेत. कुरोसावानं संपूर्ण स्वातंत्र्य घेऊनही 'मॅक्‌बेथ'च्या आत्म्याला जपानी शरीरात त्याच्या सर्व वैशिष्ट्यांसकट परकायाप्रवेश करायचा चमत्कार करून दाखवला आहे. त्यामुळे रूपांतराच्या वळणवळणात रहदारीचे नेमके नियम सांगणं कठीणच.

विजयाबाईंनी रूपांतरात साधी नाट्यमयता हे सूत्र समोर ठेवलं असावं. टीव्हीच्या तुटपुंज्या मदतीवर केलेल्या ह्या प्रयत्नाचं भारतातच नाही तर देशाबाहेरही कौतुक झालं. मुळातली भाषा आणि प्रसंग ह्यांची विजयाबाईंनी बूज राखली. उत्तम आणि शिस्तीच्या नाट्यदिग्दर्शनाबद्दल ख्यात असलेल्या विजयाबाई 'स्मृतिचित्रां'बरोबर चित्रपटदिग्दर्शनाकडे वळल्या हे चांगलं झालं.

मराठी चित्रपटांचा हा एक धावता आढावा. तारखानपशिलांची गर्दी न करता, नामावळ्यांची तोरणं न लावता महत्त्वाच्या प्रवृत्तींचं रेखाटण करायचा हा प्रयत्न आहे. आजचा मराठी चित्रपट हा हिंदी चित्रपटाच्या महावृक्षाच्या सावलीत वाढायचा प्रयत्न करतोय. त्याला स्वतःचा निश्चित प्रेक्षकवर्ग नाही. चांगली प्रेक्षागृहं नाहीत. शहरात टेलिव्हिजन आणि व्हिडिओची जबर स्पर्धा आहे. उत्तम तंत्रज्ञ, तांत्रिक सोयींचा लाभ घेण्याची आर्थिक कुवत नाही. करमणूक कर परत देण्याच्या योजनेने चित्रपटाला आर्थिक सहाय्य मिळालं हे श्रेय महाराष्ट्र सरकारला जरूर आहे. परंतु त्यातील आर्थिक उत्तेजनाच्या फायद्याबरोबर केवळ आर्थिक यशाला पाठिंबा मिळण्याचा तोटाही आपल्याला नजरेआड करता येणार नाही.

ह्या सार्‍याला तोंड देऊनही चांगले चित्रपट निर्माण करण्याची जिद्द बाळगणारे निर्माते-दिग्दर्शक मराठीत आहेत. बंगाल, कर्नाटक आणि केरळच्या अनुभवावरून एक गोष्ट निश्चित होते. प्रांतीय चित्रपट जितका जागतिक चित्रपटाच्या भाषेशी खरा संबंध जोडू शकतो, तिच्यात भर घालू शकतो तितका अधिक यशस्वी होतो. समर्थ निर्माते-दिग्दर्शक, सुजाण समीक्षक, मोकळ्या मताचा रसिक प्रेक्षक आणि सहृदय शासन ह्यांनी मराठी चित्रपट आपलं स्वतःचं खास स्थान मिळवू शकेल अशी आशा वाटायला लावणारी गुणी माणसं आज इथं आहेत, हे मात्र निश्चित.



सामाजिक अन्यायाचे प्रत्ययकारी चित्रण असलेला चित्रपट 'शापित'



महर्षि धोंडो केशव कर्वे : स्त्रीशिक्षणाचे महान पुरस्कर्ते. ह्यांनी स्थापन केलेल्या हिंगणे स्त्रीशिक्षण संस्थेतूनच पुढे श्रीमती नाथीबाई दामोदरदास ठाकरसी (एस्.एन्.डी.टी.) हे महिलांचे विद्यापीठ निर्माण झाले

# महाराष्ट्रातील शिक्षण विकास

य. गो. नित्सुरे

१ मे १९६० या दिवशी जेव्हा एकभाषिक महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले त्या सुमारास महाराष्ट्राच्या शिक्षणक्षेत्रानेही एका नव्या अन् क्रांतिकारक कालखंडात प्रवेश केला. शिक्षणाचा व समाजाच्या सर्वांगीण अभिवृद्धीचा किती निकट संबंध असतो हे मराठी माणूस परंपरेने जाणत होता. महात्मा फुले, न्यायमूर्ति रानडे, लोकमान्य टिळक, नामदार गोखले, महर्षि कर्वे, कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, कर्मवीर भाऊराव पाटील, राजर्षि शाहूमहाराज, स्वामी रामानंद आदी अनेक नेत्यांनी सर्वसामान्य माणसाला आधुनिक शिक्षणाची पाणपोई खुली व्हावी व समाजपुरुषाचे जीवन सर्व दिशांनी फुलावे अन् विविध क्षेत्रांत संपन्न व्हावे म्हणून डोळसपणे अपार कष्ट केले होते. ब्रिटिशांशी चालू असणाऱ्या राजकीय क्षेत्रातील झगड्याचा एक अविभाज्य भाग म्हणून या थोर नेत्यांनी व शिक्षण क्षेत्रातील स्वार्थत्यागी कार्यकर्त्यांनी मराठी माणसामधील शिक्षणाची भूक वाढविली होती. टिळकयुगात व गांधीयुगात पश्चिम महाराष्ट्र, विदर्भ व मराठवाडा या तिन्ही विभागांत अनेक गावी राष्ट्रीय शिक्षणाचा फैलाव करणाऱ्या शिक्षणसंस्था प्रतिकूल परिस्थितीशी सामना देत, अनुकूल कालखंडाची वाट पाहत, जिद्दीने काम करीत होत्या. १५ ऑगस्ट १९४७ रोजी देश राजकीय दृष्ट्या स्वतंत्र झाला तेव्हा शिक्षणक्षेत्रातील परिवर्तनाबाबत अनुकूल वारे वाहू लागले. परंतु प्रारंभी देशापुढे राजकीय क्षेत्रातील अनेक उग्र समस्या एकापाठोपाठ उभ्या राहिल्या. त्यांची उकल करण्यात राष्ट्रीय नेते गर्क होते. लोकभाषा हा तर आधुनिक शिक्षण प्रसाराचा मूलाधार असतो. कारण आधुनिक काळातील शिक्षण हे जसे समाज परिवर्तनाचे प्रभावी शस्त्र असते तसेच समाजाच्या सर्वांगीण उन्नतीचे साधनही असते. राजकीय-आर्थिक-सांस्कृतिक अन् अन्य क्षेत्रांतील प्रचलित घडामोडींपासून ते नव्या प्रेरणा व नवे दृष्टिकोन घेत असते; तसेच व्यक्ती, कुटुंब अन् समाज यांच्या भविष्यकाळातील वाटचालीची दिशा निश्चित करण्यास व गती वाढविण्यास ते मोलाचा हातभार लावीत असते.

परंतु ब्रिटिश कालखंडातील शिक्षणातून हे काहीच परिणामकारकपणे घडत नव्हते. साम्राज्य टिकविण्याचे एक साधन म्हणून परकीय सरकार शिक्षणाकडे प्रामुख्याने पाहत होते. म्हणून भारतीय शिक्षणव्यवस्थेत आमूलाग्र परिवर्तन स्वातंत्र्योत्तर काळात होण्याची मागणी सर्व क्षेत्रातील विचारवंत व जनता करीत होती. डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या समितीने विद्यापीठ स्तरावरील परिवर्तनाची दिशा व स्वरूप स्पष्ट करणारा अहवाल १९५० साली संसदेला सादर केला होता. डॉ. मुदलियार यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या समितीने माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना कशी करावी याचा तपशील सादर करणारा अहवाल १९५२ साली संसदेपुढे ठेवला होता. शिक्षण हा विषय भारतीय घटनेप्रमाणे केंद्र शासन व राज्य शासन या दोघांकडे आहे. वरील दोन्ही समित्या भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी, देश स्वतंत्र होताच, अग्रक्रमाने नेमल्या होत्या. परंतु या अहवालातील सूचना व्यापक अर्थाने राज्यस्तरावर अमलात आणणे शक्य झाले नव्हते. शिक्षणाचा गाडा भूतकाळातील घटनांच्या चिखलात रुतलेला होता. शिक्षणाचा तात्त्विक पाया अस्थिर होता; शिक्षणाचा आशय कालबाह्य झालेला होता; शिक्षणसंस्थांमध्ये सर्वसामान्यपणे चैतन्याचा अभाव होता; शिक्षणाच्या सर्वच अंगोपांगांबाबत पुनर्विचार करण्याची गरज होती. ब्रिटिशांनी शिक्षण प्रसाराबाबत जोपासलेली 'वरून खाली झिरपत आणण्याची' नीती अव्हेरून



*महर्षि विठ्ठल रामजी शिंदे : एक आद्य समाजसुधारक व बहुजन समाजाच्या शिक्षणाचे खंदे पुरस्कर्ते*



देण्याची गरज होती. त्याऐवजी ‘ सर्वसामान्य माणूस ’ हा केंद्रबिंदू मानून, आधुनिक शिक्षणाचा अमृतकलश खेड्यापाड्यातील प्रत्येक झोपडीपर्यंत घेऊन जाण्याची नवी नीती बद्धमूल करण्याची गरज होती.

ही ऐतिहासिक किमया महाराष्ट्र राज्याची मागणी फलद्रूप करण्यासाठी जे प्रचंड जनजागरण घडले व महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर सर्वसामान्य माणसामध्ये चैतन्य अन् उत्साह निर्माण करण्यासाठी, महाराष्ट्र राज्याचे पहिले मुख्य मंत्री ना. यशवंतरावजी चव्हाण यांनी जी प्रभावी भाषणे केली त्यामुळेच घडून येऊ शकली. १ मे १९६० च्या घटनेचे वर्णन करताना, ‘ तुमच्याआमच्या जीवनामध्ये आनंदाचा, सोहळ्याचा क्षण निर्माण झाला आहे ’ असे सांगून यशवंतरावजी पुढे म्हणाले, ‘ आज खेड्यातल्या शेतकऱ्यांमध्ये, फॅक्टरीतल्या मजुरांमध्ये, शहरातल्या विद्यार्थ्यांमध्ये सगळीकडे नवी शक्ती निर्माण झाली आहे. ही नवी शक्ती उभी करण्याचे तुम्हाआम्हाला इतिहासाचे आव्हान आहे.’.

महाराष्ट्राच्या सर्वांगीण जीवनाच्या विकासाला जबरदस्त चालना देणारा असा तो जणू मंतरलेला कालखंड होता. हंटर कमिशनपुढे लेखी निवेदन सादर करताना १८८२ साली महात्मा फुले यांनी ब्रिटिशप्रणीत शिक्षणातील दोषांवर हल्ला चढविला होता. ते म्हणाले होते की, ‘ सरकार असे सुखस्वप्न बाळगत आहे की वरिष्ठ वर्गातील लोक कनिष्ठ वर्गातील लोकांमध्ये शिक्षणप्रसार करतील. हे सुखस्वप्न उराशी बाळगून गरीब शेतकऱ्यांकडून सरकार जो सारा गोळा करते त्या सर्व वसुलाचे उत्पन्न सरकार वरिष्ठ लोकांच्या शिक्षणावर उधळते. विद्यापीठे श्रीमंतांच्या मुलांना शिक्षण देतात आणि त्यांची ऐहिक उन्नती साधण्यासाठी साह्य करतात. परंतु त्या विद्यापीठातून निघालेल्या सुशिक्षितांनी आपल्या देशबांधवांच्या उन्नतीच्या कार्यात काहीही भर घातली नाही.’.

सध्या प्राथमिक शिक्षणाची आबाळ होत आहे व माध्यमिक स्तरावरील शिक्षण पुस्तकी बनले आहे अशी टीका करून, उपाययोजना सुचविताना महात्मा फुले स्पष्टपणे सुचवितात की, प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक फैलाव प्राधान्याने करावा. माध्यमिक शिक्षणामध्ये उपयुक्त धंदेशिक्षणाचा समावेश करावा म्हणजे सुशिक्षित तरुण नोकरीच्या मागे जाणार नाहीत. निवेदनाच्या अखेरीस त्यांनी म्हटले होते की, ‘ मला या शिक्षणविषयक चौकशी समितीकडे एकच विनंती करावयाची आहे की, त्यांनी मुलींचे शिक्षण मोठ्या प्रमाणावर सुरू करण्यासाठी कृपया ठोस उपाय योजावे.’.

नवमहाराष्ट्राच्या भवितव्याविषयीचे जे उज्ज्वल चित्र नामदार चव्हाण रेखाटीत होते त्यात शिक्षणक्षेत्रातील पुनर्रचनेबाबतचा जो आराखडा महात्मा फुले यांनी सुमारे पाऊणशे वर्षांपूर्वी द्रष्टेपणाने चितारला होता त्याचाच पुरस्कार ते जोमदारपणे करीत होते. महाराष्ट्राच्या भवितव्याच्या एका मोठ्या, लांब सफरीतील आपण सहप्रवासी आहोत असे समस्त मराठी माणसांना आवाहन करून सर्वांच्या मनात प्रेरणा व जागृती निर्माण करताना पुढील तेजस्वी शब्द एका भाषणात यशवंतरावजी उच्चारतात : ते म्हणतात, ‘ आज मी असा आपणाशी बोलत असताना ती सफर मला माझ्या डोळ्यासमोर दिसते आहे, विजेच्या प्रकाशाने लखलखल्यासारखी दिसते आहे. ती लांबची सफर आहे, कष्टाची सफर आहे, उद्योगाची सफर आहे. पण ती पुरी केलीच पाहिजे. कारण त्यामध्ये जनतेचे कल्याण आहे.’.

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर शैक्षणिक क्षेत्रातील विकासाची जी सफर चालू झाली आहे तिने गेल्या २५ वर्षांत नेत्रदीपक पल्ला गाठला आहे.

शिक्षणाचा जो ‘ पिरॅमिड ’ उलटा झाला होता तो सुलटा करण्याबाबतची महात्मा फुले यांची इच्छा प्रत्यक्षात आणण्यात आली आहे. प्राथमिक शिक्षणाला सर्वोच्च अग्रक्रम देण्यात आला आहे. या प्राथमिक शिक्षणालाही वंचित होणाऱ्या प्रौढ व्यक्तींसाठी ‘ कार्यकारी साक्षरते ’ची प्रचंड मोहीम उभी करण्यात आली आहे. या दोन महत्त्वपूर्ण क्षेत्रांत – प्राथमिक शिक्षण व प्रौढ साक्षरता –



*बालवाड्यांमुळ आदिवासी मुलांनाही शिक्षण मिळू लागले आहे*



महाराष्ट्राने १९६० ते १९८५ या कालखंडात, अनंत अडचणींना तोंड देऊन, शिक्षणाचा विस्तार महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यापर्यंत घडवून आणला आहे. या दोन्ही क्षेत्रांत महाराष्ट्राने केलेल्या कामगिरीचा गौरव राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर करण्यात आला आहे.

**प्राथमिक शिक्षण**

'शिक्षण – किमान प्राथमिक शिक्षण – हा प्रत्येक मुलाचा अगर मुलीचा जन्मसिद्ध हक्क आहे' या तत्त्वावर महाराष्ट्रातील शिक्षणाची उभारणी गेली पंचवीस वर्षे चालू आहे. गरिबी, भौगोलिक अडचणी, कुटुंबातील परंपरेचा अभाव, अनिष्ट सामाजिक परंपरांचा दबाव, पालकांच्या मनोवृत्ती, साधनांची कमतरता यांसारख्या असंख्य प्रतिकूल बाबी लाखो लहान मुलांना शिक्षणापासून ब्रिटिशकाळात वंचित करीत होत्या व त्याबद्दल तत्कालीन सरकार उदासीन होते. त्यामुळे महाराष्ट्रातील हजारो खेड्यांत शाळा नाममात्र अवस्थेत चालू होत्या. शाळेत येणाऱ्या मुलांतील फारच थोडी मुले पहिल्या किंवा दुसऱ्या इयत्तेचा उंबरठा ओलांडीत असत. विद्यार्थ्यांच्या गळतीचे प्रमाण प्रचंड असे आणि मुलींनी शाळेत यावे याबद्दल शासन अल्पसाही प्रयत्न करीत नसे.

या पार्श्वभूमीवर प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रीकरण घडवून आणण्याचे अवघड काम महाराष्ट्र शासनाने हाती घेतले आणि त्यासाठी आवश्यक असणाऱ्या सुविधा, प्रशिक्षित मनुष्यबळ व अद्ययावत तंत्रे उपलब्ध करून देण्याचे धोरण खंबीरपणे अवलंबिले आहे. 'प्राथमिक शिक्षणाचा कार्यक्रम' हा नियोजन मंडळाच्या धोरणानुसार 'किमान गरजांचा कार्यक्रम' म्हणून मानण्यात येत आहे. तसेच पंतप्रधानांनी घोषित केलेल्या वीस कलमी कार्यक्रमातील एक महत्त्वाचा कार्यक्रम म्हणूनही प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रीकरणाला अग्रक्रम देण्यात आला आहे.

१९६२ साली जिल्हा परिषदा स्थापन झाल्यापासून प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रात विशेष जोर निर्माण झाला. यामुळे प्राथमिक शाळांची संख्या १९६०–६१ मध्ये जी ३३,१८८ होती ती १९८३–८४ मध्ये ५१,००० झाली आहे. प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांच्या संख्येत – मुलांच्या व मुलींच्या – प्रचंड वाढ झाली आहे. १९६०–६१ साली ही संख्या अंदाजे ४१ लक्ष ७८ हजार होती ती १९८३–८४ साली अंदाजे ८९ लक्ष ८० हजारांपर्यंत पोचली आहे.

**महाराष्ट्र राज्यातील लोकसंख्येतील वाढ**

| | | १९६१ (लोकसंख्या | १९८१ लाखात) | वाढ (शेकडा) |
|---|---|---|---|---|
| पुरुष | .. | २०४.२९ | ३२४.१५ | ५८.७ |
| स्त्रिया | .. | १९१.२५ | ३०३.६९ | ५८.८ |
| एकूण | .. | ३९५.५४ | ६२७.८४ | ५८.७ |

याचा अर्थ १९६१ ते १९८१ या २० वर्षांमध्ये महाराष्ट्रातील एकूण लोकसंख्येमध्ये ५८.७ टक्के वाढ झाली.

**प्राथमिक शाळा**

| | | १९६०–६१ | १९८३–८४ (अंदाजे) | वाढ (शेकडा) |
|---|---|---|---|---|
| मुलांच्या | .. | ३३,१८८ | ५१,००० | ५३.७ |
| मुलींच्या | .. | १,४०६ | २,००० | ४२.२ |
| एकूण | .. | ३४,५९४ | ५३,००० | ५३.२ |

वरील तक्त्यावरून गेल्या २४ वर्षांमध्ये सर्वसामान्यपणे लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणात प्राथमिक शिक्षणाच्या सुविधांमध्ये वाढ झाल्याचे दिसून येते.

**प्राथमिक शाळांतील विद्यार्थी (लाखात)**

| | | १९६०–६१ (अंदाजे) | १९८३–८४ (अंदाजे) | वाढ (शेकडा) |
|---|---|---|---|---|
| मुले | .. | २६.८३ | ५०.५० | ८८.२ |
| मुली | .. | १४.९४ | ३९.३० | १६२.९ |
| एकूण | .. | ४१.७८ | ८९.८० | ११४.९ |

वरील आकडयांवरून स्पष्टपणे दिसून येते की, प्राथमिक शाळांतील विद्यार्थी संख्येचा वेग लोकसंख्येच्या वाढीपेक्षा दीड पटीने आहे. हा वेग मुलींच्या संख्येमध्ये तर जवळजवळ तीन पटीपर्यंत आहे. संख्यात्मक वाढीची कल्पना यावरून स्पष्ट होऊ शकेल.

जरी महाराष्ट्रात प्राथमिक शिक्षण १ ते ७ या वर्गांमध्ये दिले जाते तरी देशाच्या पातळीवर इयत्ता १ ते ८ मधील विद्यार्थ्यांची आकडेवारी प्राथमिक शिक्षणाच्या संबंधात गोळा केली जाते. ६ ते १४ या वयोगटातील मुलामुलींच्या बाबतची ही आकडेवारी असते. कारण या वयोगटातील सर्व मुलामुलींना प्राथमिक शिक्षण देणे ही जबाबदारी भारताच्या घटनेमध्ये अंतर्भूत करण्यात आलेली आहे.

या राष्ट्रीय दृष्टिकोनातून पाहिले तर महाराष्ट्राने नेत्रदीपक प्रगती केली आहे. १९८३–८४ अखेर राज्यातील ६ ते १४ या वयोगटातील एकूण ११७.५२ लाख मुले इयत्ता १ ते ८ मध्ये दाखल झाली आहेत. त्यामध्ये ४९.५४ लाख मुली आहेत. टक्केवारीच्या भाषेत सांगावयाचे तर ६ ते १४ या वयोगटातील ९०.९ टक्के मुले शाळेत दाखल झाली आहेत. यामध्ये मुलींचे प्रमाण ७८.७ टक्के आहे तर मुलांचे १०२.५ टक्के आहे. अनुसूचित जातीच्या मुलांचे दाखल झाल्याचे एकूण प्रमाण ९१ टक्के आहे तर अनुसूचित जमातीचे ६१ टक्के आहे.



*ग्रामीण भागात आता सर्वत्र प्राथमिक शिक्षण उपलब्ध झाले आहे*



१९८३–८४ अखेर राज्यातील २०० किंवा अधिक लोकसंख्या असलेल्या सर्व गावांमध्ये १ किलोमीटर अंतरात प्राथमिक शाळा उघडण्यात आल्या आहेत. १९८३–८४ अखेर महाराष्ट्रात प्राथमिक शाळा नसलेली फक्त १,३०० खेडी होती. या सर्वच खेड्यांत १९८४–८५ या वर्षात प्राथमिक शाळा उघडण्यात आल्या आहेत. सध्या महाराष्ट्रात अंदाजे १६,००० एकशिक्षकी प्राथमिक शाळा आहेत. त्यांचे क्रमशः द्विशिक्षकी शाळांमध्ये रूपांतर करण्याचे शासनाचे धोरण आहे.

राज्यात प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या कमकुवत गटातील जवळजवळ १८ लाख विद्यार्थ्यांना मोफत पाठ्यपुस्तके पुस्तकपेढीच्या योजनेद्वारा दिली जात आहेत. तर मोफत गणवेष व लेखनसाहित्याचा लाभ प्रतिवर्षी जवळजवळ पन्नास हजार विद्यार्थ्यांना मिळत आहे. तसेच सुमारे १,२०० आदिवासी मुलामुलींना शिष्यवृत्ती दिली जात आहे.

अनौपचारिक शिक्षणाचा लाभ प्रतिवर्षी अंशकालीन वर्गाच्या माध्यमातून जवळजवळ ३६,००० मुलांना होत आहे, तर शिक्षकांनी उत्स्फूर्तपणे सुरू केलेल्या गृहवर्गातून जवळजवळ एक लाख मुलांना ज्ञानदानाचा लाभ होत आहे.

मुलींच्या प्राथमिक शिक्षणासाठी महाराष्ट्र शासनाने, समाजातील विविध घटकांच्या सहकार्याने गेली २५ वर्षे सातत्याने जे डोळस, सर्वंकष व जिद्दीचे प्रयत्न चालविले आहेत त्याचा गौरव राष्ट्रीय स्तरावर नुकताच करण्यात आला आहे. भारतातील जे राज्य मुलींच्या प्राथमिक शिक्षणाबाबत उत्कृष्ट काम करीत असेल त्या राज्याला उत्तेजनपर पारितोषिक देण्याची योजना केंद्र सरकारने १९८३–८४ या सालापासून जाहीर केली व या पहिल्याच वर्षी महाराष्ट्राला ८० लाख रुपयांचे पारितोषिक मिळाले आहे. अनेक आपत्तींशी झुंज देऊन महात्मा फुले व त्यांच्या पत्नी सौ. सावित्रीबाई फुले यांनी स्त्रीशिक्षणाचा झेंडा १८४८ साली धैर्याने उभारला. त्यांचा आणि स्त्रीशिक्षणाच्या कार्यात महाराष्ट्रातील थोर कार्यकर्त्यांनी निर्माण केलेल्या परंपरेचा हा गौरव महाराष्ट्र राज्याच्या रौप्यमहोत्सवी वर्षाच्या आसपास केंद्र पातळीवर झाला हा योगायोग अपूर्व मानला पाहिजे.

अशा प्रकारे गेल्या पंचवीस वर्षातील प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रातील वाटचाल जरी भरीव असली तरी प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रीकरणाचे उद्दिष्ट अद्यापि महाराष्ट्र राज्य गाठू शकलेले नाही ही वस्तुस्थिती आहे. या दृष्टीने शालेय शिक्षणात सुधारणा सुचविण्यासाठी व खास करून कमकुवत गटातील मुलामुलींच्या शिक्षणात सुधारणा सुचविण्यासाठी शिक्षण राज्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली शासनाने एक समिती नेमली. या समितीच्या शिफारशींच्या आधारे कार्यवाही सुरू झाली आहे. १९८४–८५ हे वर्ष विशेषकरून मुलींना शाळेत टिकवून धरण्याचे वर्ष (रिटेन्शन इयर) म्हणून जाहीर करण्यात आले आहे. मुलींच्या शिक्षणाला प्रोत्साहन मिळावे तसेच समाजाकडून व पालकांकडून भरीव प्रतिसाद मिळावा या दृष्टीने शासनाने नुकतीच एक महत्त्वाची घोषणा केली ती अशी की, इयत्ता १२ वी अखेरपर्यंतचे शिक्षण मुलींना मोफत करण्यात आले आहे. अनुसूचित जातीजमातींच्या विद्यार्थ्यांकडे अग्रक्रमाने लक्ष पुरविण्यासाठी शासनाने विविध पावले उचलली आहेत. त्यामुळेच २८ मे १९८४ रोजी नवी दिल्ली येथे भरलेल्या शिक्षण मंत्री परिषदेत महाराष्ट्राच्या शिक्षण मंत्र्यांनी असे सांगितले की, 'महाराष्ट्रातील प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रीकरणाचे उद्दिष्ट १९९० अखेर पूर्ण करण्याचा राज्य शासनाचा संकल्प आहे.'.

**प्रौढ शिक्षण**

'प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रीकरण' करणे या कार्यक्रमाप्रमाणेच 'प्रौढ शिक्षणा'च्या कार्यक्रमालाही नियोजन मंडळाने 'किमान गरजांचा कार्यक्रम' म्हणून मानले आहे. तसेच या कार्यक्रमाचा पंतप्रधानांनी घोषित केलेल्या वीस कलमी कार्यक्रमातही अंतर्भाव आहे.



महाराष्ट्राला महिला शिक्षणासाठी केंद्रीय पुरस्कार मिळाला आहे



१९६० पूर्वी महाराष्ट्रात तुरळक ठिकाणी, प्रामुख्याने स्वयंसेवी सस्थांतर्फे, प्रौढ शिक्षणाचे कार्य चालू होते. तथापि, एकभाषिक महाराष्ट्राच्या निर्मितीनंतर शासनाने, लोकाभिमुख शिक्षणप्रसाराच्या धोरणाचा अविभाज्य भाग म्हणून, प्रौढ शिक्षणाच्या कार्यक्रमांना अग्रक्रमाने प्रोत्साहन देण्यास प्रारंभ केला. १९५९ साली सातारा जिल्ह्यात 'ग्राम शिक्षण मोहीम' या नव्या प्रयोगाने जन्म घेतला. गावातील समस्त गावकरी मंडळीमध्ये उत्साहाचे वातावरण निर्माण करून निरक्षरांना साक्षर करण्याच्या कार्यक्रमाला आंदोलनाचे स्वरूप प्राप्त करण्याचे अभिनव व प्रत्ययकारी तंत्र यशस्वीपणे वापरात आणले गेले. त्यामुळे सदर कार्यक्रम १७ एप्रिल १९६१ पासून सर्व महाराष्ट्रात सुरू करण्यात आला. १५ ते ५० या वयोगटातील सर्व निरक्षर प्रौढांना चार महिन्यांच्या कालावधीत साक्षर करावयाचे अशा पद्धतीने हा कार्यक्रम राबविला जात असे. अत्यल्प खर्च व जनतेचा उत्स्फूर्त सहभाग ही या कार्यक्रमाची वैशिष्टये होती. १९६२ साली जिल्हा परिषदांची निर्मिती झाल्यानंतर 'ग्राम शिक्षण मोहिमे' ला विशेष गती प्राप्त झाली आणि त्यामुळे साक्षर प्रौढांच्या संख्येत प्रतिवर्षी नेत्रदीपक वाढ होऊ लागली.

१९६१ मध्ये महाराष्ट्राच्या साक्षरतेचे शेकडा प्रमाण २९.९ होते. १९७१ साली हे प्रमाण ३९.०६ इतके वाढले आणि साक्षरतेच्या दृष्टीने महाराष्ट्र भारतातील दुसऱ्या क्रमांकाचे राज्य ठरले. 'युनेस्को' या आंतरराष्ट्रीय संस्थेने या कार्याचा गौरव करून १९७२ सालाचे 'महमद रझा पहेलवी पारितोषिक' महाराष्ट्रास बहाल केले.

'ग्राम शिक्षण मोहिमे'चा प्रमुख रोख साक्षरता प्रसारावर होता. तथापि कालमानाच्या बदलत्या गरजा व जनतेच्या अपेक्षा लक्षात घेऊन, प्रौढ शिक्षणाच्या उद्दिष्टांमध्ये शासनाने अनुरूप बदल घडवून आणले. स्थानिक परिस्थितीप्रमाणे साक्षरतेला 'कार्यात्मक साक्षरते'ची जोड देण्यात आली. याशिवाय किसान शिक्षण योजना, धंदे शिक्षण योजना, अनौपचारिक शिक्षण योजना इत्यादी कार्यक्रमांनी प्रौढांचे जीवन समृद्ध करण्यात येऊ लागले.

ऑक्टोबर १९७८ पासून 'राष्ट्रीय प्रौढ शिक्षण' हा कार्यक्रम सुरू झाला व स्वयंसेवी संस्थांना प्रौढ शिक्षणाच्या कार्यक्रमात सहभागी करून घेण्यात आले.

याशिवाय साक्षरोत्तर अनुधावन कार्यक्रम म्हणून १९७९–८० पासून राज्य शासनाने नवसाक्षरांसाठी प्रत्येक जिल्ह्यात ८५ प्रमाणे २.४३५ वाचनालये सुरू केली आहेत.

वर सांगितलेल्या विविध प्रयत्नांमुळे महाराष्ट्रातील साक्षरतेच्या प्रमाणात उल्लेखनीय वाढ झाली आहे. १९८१ च्या खानेसुमारीनुसार महाराष्ट्राची साक्षरता ४७ टक्के आहे. त्यानंतर १९८०–८१ पासून १९८४–८५ पर्यंत जवळजवळ १८ लाख निरक्षर प्रौढांना शिक्षण देण्यात आले. यामध्ये अनुसूचित जातीतील व जमातीतील प्रौढांचा मोठा सहभाग आहे.

१९६१ ते १९८१ या कालखंडात साक्षरतेचे प्रतिशत प्रमाण पुरुष व स्त्रिया या दोन्ही गटांमध्ये किती वाढले हे पुढे दिलेल्या तक्त्यावरून दिसून येईल :

**साक्षरतेच्या प्रमाणातील वाढ**

| | | १९६१ | १९८१ | वाढ (शेकडा) |
|---|---|---|---|---|
| पुरुष | .. | ४२.० | ५८.८ | ४०.० |
| स्त्रिया | .. | १३.८ | ३४.८ | [illegible] |
| एकूण | .. | २९.८ | ४७.२ | ५८.४ |

महाराष्ट्र राज्यातील महिलावर्गाने साक्षरता मोहिमेला उत्साहाने जो प्रतिसाद दिला आहे त्यामुळे राष्ट्रीय पातळीवर महाराष्ट्र राज्याचा नुकताच गौरव करण्यात आला आहे. या बाबींचा खास उल्लेख केला पाहिजे. निरक्षर प्रौढ महिलांच्या शिक्षणासाठी उत्कृष्ट काम करणाऱ्या राज्यांना १९८३–८४ या वर्षापासून



कर्मवीर भाऊराव पाटील
यांच्या रयत शिक्षण
संस्थेने शिक्षणाची गंगा
गोरगरिबांपर्यंत
पोचविली

पारितोषिके देण्याची योजना केंद्र सरकारने जाहीर केली होती व या कालखंडातील कामगिरीबाबत जी ५ राज्ये भारतात बक्षीसपात्र ठरली त्यांत महाराष्ट्र राज्याची निवड झाली ही खासच अभिमानास्पद बाब आहे.

### माध्यमिक शिक्षण

१९६०–६१ साली महाराष्ट्र राज्यात २,४६८ माध्यमिक शाळा होत्या व या शाळांतून ८ लाख ५८ हजार विद्यार्थी शिक्षण घेत होते. गेल्या २४ वर्षांत माध्यमिक शिक्षणाच्या क्षेत्रात लक्षणीय विकास घडून आला आहे हे खाली दिलेल्या तक्त्यावरून दिसून येईल. १९८४–८५ सालाअखेर राज्यातील माध्यमिक शाळांची संख्या ७,००० पेक्षा अधिक झाली आहे. त्यांमध्ये सुमारे ४० लाख विद्यार्थी शिक्षण घेत आहेत:

**माध्यमिक शाळा व विद्यार्थी**

| | | १९६०–६१ | १९८३–८४ (अंदाजे) | वाढ (शेकडा) |
|---|---|---|---|---|
| शाळा | .. | २,४६८ | ७,००० | १८३.६ |
| विद्यार्थी (लाखात) — | | | | |
| मुले | .. | ६.२८ | २५.४० | ३०४.५ |
| मुली | .. | २.३० | १४.२० | ५१७.४ |
| एकूण | .. | ८.५८ | ३९.६० | ३६१.५ |

लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणाची तुलना करता माध्यमिक शाळांची व त्यांमधील विद्यार्थ्यांची वाढ निश्चितच उल्लेखनीय आहे. विशेषत: मुलींच्या संख्येतील वाढ स्पृहणीय आहे.

तसेच पुढील तक्त्यावरून असेही दिसून येईल की, माध्यमिक शाळांतून शिकविणाऱ्या शिक्षकांच्या एकूण संख्येत तसेच या शिक्षकांतील प्रशिक्षित शिक्षकांच्या व स्त्री शिक्षकांच्या प्रमाणातही लक्षणीय वाढ गेल्या २४ वर्षांत झाली आहे:



**माध्यमिक शाळांतील शिक्षक**

| | | १९६०–६१ | | १९८३–८४ (अंदाजे) | | वाढ (शेकडा) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | एकूण | प्रशिक्षित प्रमाण टक्के | एकूण | प्रशिक्षित प्रमाण टक्के | |
| पुरुष | .. | २६,५१६ | ५८.२ | ९१,००० | ९५.० | २३३.० |
| स्त्रिया | .. | ८,५८२ | ३४.० | ३८,००० | ९६.० | ३२२.२ |
| एकूण | .. | ३५,०९८ | ६२.१ | १,२९,००० | ९५.५ | २६८.६ |

माध्यमिक स्तरावरील शिक्षण विस्तारात ही जी लक्षणीय वाढ झाली आहे ती प्राथमिक शिक्षणाच्या गेल्या २४ वर्षांतील विस्ताराच्या मानाने तुलनात्मक दृष्ट्या अधिक आहे. तथापि, प्राथमिक शिक्षणाच्या विस्तारासाठी शासन जे सर्वंकष प्रयत्न करीत आहे, तसेच महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीपासून शिक्षणक्षेत्रात व सामाजिक, आर्थिक जीवनात ज्या नव्या जाणिवा निर्माण झाल्या आहेत त्यांच्यामुळेच माध्यमिक शिक्षणाच्या विस्ताराला अधिक जोम प्राप्त झालेला दिसतो.

माध्यमिक स्तरावरील शिक्षणाची उद्दिष्टे व कार्यक्रम यांमध्ये आधुनिक काळातील गरजांशी सुसंगत असे परिवर्तन करण्याबाबत महाराष्ट्र शासनाने १९६०–६१ सालापासून अनेक पुरोगामी पावले उचलली आहेत. १९६० ते १९७० या कालखंडात माध्यमिक व उच्च शिक्षणाची पुनर्रचना करण्याबाबत अन्य देशांप्रमाणे भारतातही नव्या जोमाने विचारमंथन घडून आले. केंद्र शासनाने सर्व स्तरांवरील शिक्षणाचा पुनर्विचार करून उपाययोजनांचा आराखडा सुचविण्यासाठी १९६४ साली डॉ. कोठारी यांच्या अध्यक्षतेखाली एका आयोगाची नेमणूक केली. १९६६ साली या आयोगाचा अहवाल उपलब्ध झाला. हा संदर्भ



राज्यात आता सर्व मुलींना बारावीपर्यंतचे शिक्षण मोफत मिळते



लक्षात घेऊन महाराष्ट्र शासनाने ८ एप्रिल १९६८ रोजी 'शैक्षणिक पुनर्रचनेबाबतची श्वेतपत्रिका' महाराष्ट्र विधिमंडळाला सादर केली व त्यामुळे महाराष्ट्रातील आगामी काळातील योजनाबद्ध शैक्षणिक विकासाबाबतच्या सार्वत्रिक विचारविनिमयाला चालना मिळाली. या श्वेतपत्रिकेवर व्यक्त झालेले लोकमत लक्षात घेऊन राज्य सरकारतर्फे संकलित स्वरूपाचे शिक्षणविषयक धोरण १९७० मध्ये जाहीर करण्यात आले.

माध्यमिक स्तरावरील गुणवत्तावृद्धीचे, विकासाचे, एकसूत्रीकरणाचे व आधुनिकीकरणाचे कार्यक्रम उभारण्यासाठी गेल्या २५ वर्षांत शासनाने काही वैशिष्टयपूर्ण पावले उचलली आहेत. महाराष्ट्र राज्य शिक्षण शास्त्र संस्था (स्थापना १९६४); राज्य आंग्ल भाषा शिक्षण संस्था (स्थापना १९६५); महाराष्ट्र राज्य माध्यमिक शिक्षण मंडळ व विभागीय मंडळ (स्थापना १९६६); ग्रामीण भागातील प्रज्ञावंत विद्यार्थ्यांसाठी विद्यानिकेतने या नावाने १९६६ पासून सुरू करण्यात आलेल्या वसतिगृहात्मक शाळा (राज्यात सध्या अशी एकूण पाच विद्यानिकेतने असून त्यांपैकी एक खास आदिवासी विद्यार्थ्यांसाठी आहे. अन्य चार विद्यानिकेतनांमधूनही प्रत्येकी दहा आदिवासी विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येतो); महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (स्थापना जानेवारी १९६७) यांचेप्रमाणेच दृकश्रवण शिक्षण संस्था, व्यवसाय मार्गदर्शन व निवड संस्था आणि शैक्षणिक तंत्रज्ञान संस्था कार्यरत आहेत. या संस्थांचे काम अधिक प्रभावी होण्यासाठी व त्यांच्या कामात सुसूत्रता निर्माण व्हावी म्हणून शासनाने शैक्षणिक तंत्रज्ञान संस्था वगळता इतर सर्व संस्थांचे विलीनीकरण करून 'महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद' अशी (ज्याप्रमाणे केंद्रीय पातळीवर नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशनल रीसर्च अँड ट्रेनिंग ही संस्था आहे त्याप्रमाणे) नवी संस्था प्रवर्तित करण्याचा महत्त्वाचा निर्णय घेतला आहे व महाराष्ट्राच्या रौप्यमहोत्सवी वर्षात या संस्थेच्या कार्यक्रमांना गती देण्यात येणार आहे. तोपर्यंत राज्यपातळीवरील विविध संस्थांनी आपली कामे स्वतंत्रपणे सुरू ठेवली आहेत.

मागासवर्गीय व अन्य गुणी विद्यार्थ्यांना शिक्षण घेणे सुलभ व्हावे म्हणून विविध शिष्यवृत्त्या देण्यात येतात. १९६०-६१ ते १९८४-८५ या कालखंडात शिष्यवृत्त्यांवर शिक्षण संचालनालयामार्फत झालेला एकूण खर्च क्रमक्रमा वाढत चालला आहे हे पुढील तक्त्यावरून लक्षात येईल :

**शिष्यवृत्त्यांवरील खर्च**

| वर्ष | | खर्च (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १९६०-६१ | .. | १५३.०२ |
| १९६५-६६ | .. | ५९२.३५ |
| १९७०-७१ | .. | ४६३.८८ |
| १९८०-८१ | .. | ६६२.१० |
| १९८३-८४ | .. | १०२१.३० (अंदाजे) |

आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या पालकांच्या मुलांना माध्यमिक शिक्षणापासून वंचित राहावे लागता कामा नये म्हणून १९५९-६० सालापासून फीमाफीची सवलत देण्यात येते. पालकांच्या वार्षिक उत्पन्नाची ही मर्यादा १९८३-८४ पासून १०,००० रुपयांपर्यंत वाढविण्यात आली आहे. शिवाय पालकांच्या वार्षिक उत्पन्नाची कोणतीही अट न घालता विद्यार्थिनींना माध्यमिक शालांत परीक्षेपर्यंत फी सवलत देण्याची योजना १९८३-८४ पासून लागू केली व अलीकडेच घेतलेल्या निर्णयाप्रमाणे मुलींच्या फी सवलतीची मर्यादा उच्च माध्यमिक शिक्षणापर्यंत वाढविण्यात आलेली आहे. या बाबींचा उल्लेख महिलांमधील शिक्षणप्रसाराच्या महाराष्ट्र शासनाच्या प्रयत्नांच्या संदर्भात यापूर्वी करण्यात आलेला आहे.



नुकतीच शताब्दी साजरी केलेल्या फर्ग्युसन कॉलेजने महाराष्ट्राच्या शैक्षणिक विकासात मोलाची कामगिरी बजावली



तसेच, या संदर्भात आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकातील मुलींच्या शिक्षणासाठी, पालकांना काही आर्थिक सहाय्य करून, त्यांच्या मुलींचे किमान ७ व्या वर्गापर्यंतचे शिक्षण अखंडपणे चालू राहावे यासाठी १९८३–८४ सालापासून शासनातर्फे 'सावित्रीबाई फुले दत्तक पालक योजना' सुरू करण्यात आली आहे. या योजनेनुसार कोणीही नागरिक दर महा २५ रुपये देऊन मुलीचे दत्तक पालकत्व स्वीकारू शकतो. या अभिनव योजनेला उत्कृष्ट प्रतिसाद मिळाला आहे. पहिल्या वर्षीच सुमारे १ लाख १५ हजार मुलींना दत्तक पालक मिळवून देण्यात यश आले आहे.

वरील प्रतिसाद लक्षात घेऊन शासनाने १९८४–८५ पासून 'महात्मा फुले छात्र सेवा' योजना कार्यान्वित केली आहे. प्रत्येक गावातील सेवाभावी संस्था वा संघटनांनी आपापल्या गावातील गरीब व गरजू मुलांना वह्या, पुस्तके, गणवेष देणे, दुपारची भाजीभाकरी पुरवणे, खेळांचे साहित्य उपलब्ध करणे, आजारी पडल्यास औषधोपचार करणे अशांसारखे कार्यक्रम राबवून विद्यार्थीजीवनाच्या विकासातील अडचणी दूर करण्यात लोकशक्तीला सहभागी करून घ्यावे अशी कल्पना यामागे आहे.

याशिवाय गेल्या पाच वर्षांमध्ये संपर्काधिष्ठित शालेय गुणविकासाचा कार्यक्रम, धडपड व्यासपीठ, गीतमंच, शाळांची प्रतवारी यांसारखे नवनवे कार्यक्रम संख्यात्मक वाढीला व गुणात्मक विकासाला गती देण्याच्या हेतूने हाती घेण्यात आले आहेत. माध्यमिक स्तरावर शाळेबाहेर असणाऱ्या मुलांमुलींसाठी 'खुली शाळा' ही योजना सुरू करण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे.

**उच्च माध्यमिक शिक्षण**

सन १९७२ पासून राज्यात १० + २ + ३ हा आकृतिबंध अमलात आला असून १९७५–७६ या शैक्षणिक वर्षापासून उच्च माध्यमिकचे (११ वी) वर्ग सुरू करण्यात आले. उच्च माध्यमिकचे हे वर्ग माध्यमिक शाळांना आणि महाविद्यालयांना जोडले जातात. उच्च माध्यमिक स्तरावर कला, वाणिज्य व विज्ञान या तीनही शाखांचे शिक्षण दिले जाते. विद्यार्थ्यांच्या





महाराष्ट्र सरकारने तांत्रिक शिक्षणाचा महत्वाकांक्षी कार्यक्रम हाती घेतला आहे





*मलखांब, वेत मलखांब यांसारख्या देशी खेळांना शासन प्रोत्साहन देते*





संख्येच्या प्रमाणात हे वर्ग सुरू करण्यात येतात. सन १९८३–८४ पर्यंत उच्च माध्यमिक प्रथम वर्षाचे (११ वी) एकूण ३,३४४ तसेच द्वितीय वर्षाचे (१२ वी) एकूण ३,००९ वर्ग सुरू करण्यात आले आहेत. १९८३–८४ या वर्षी एकूण ४५० वर्ग सुरू करण्यास परवानगी देण्यात आली. एकूण ९८२ माध्यमिक शाळांना व ३७७ महाविद्यालयांना तसेच ९ स्वतंत्र कनिष्ट महाविद्यालयांना हे वर्ग जोडण्यास परवानगी देण्यात आली आहे. सध्या या स्तरावर एकूण ४,७७,१९१ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. त्यांत माध्यमिक शाळांना जोडलेल्या वर्गांमध्ये २,५९,१५२ तर महाविद्यालयांना जोडलेल्या वर्गांमध्ये २,१८,०३९ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. सन १९७८–७९ पासून काही निवडक संस्थांमधून या वर्गांमध्ये व्यावसायिक अभ्यासक्रमाचीही सुविधा निर्माण करण्यात आली आहे.

**उच्च शिक्षण**

गेल्या २४ वर्षांत उच्च शिक्षणामध्ये किती संख्यात्मक वाढ झाली आहे हे खालील तक्त्यावरून दिसून येईल :

**महाविद्यालये, विद्यार्थी व शिक्षक**

| | १९६०–६१ | १९८३–८४ (अंदाजे) | वाढ (शेंकडा) |
|---|---|---|---|
| महाविद्यालये (सर्वप्रकारची) | ११६ | ५४९ | ४३४.० |
| विद्यार्थी | ९१,६४७ | ६,२५,००० | ८६१.० |
| शिक्षक | उपलब्ध नाही | २१,००० | .... |

प्राथमिक आणि माध्यमिक स्तरावर झालेल्या शैक्षणिक विस्ताराचा परिणाम उच्च शिक्षणाच्या स्तरावर होणे अपरिहार्य आहे. विद्यार्थी संख्येमध्ये गेल्या २४ वर्षांत जवळजवळ ९ पटींनी झालेली वाढ याची निदर्शक आहे असे मानण्यास हरकत नाही.

महाराष्ट्र राज्यात १९६० मध्ये पाच विद्यापीठे कार्य करीत होती. यांतील सर्वांत पहिले मुंबई विद्यापीठ. या विद्यापीठाची स्थापना १८५८ साली करण्यात आली. या विद्यापीठाची परंपरा फार थोर आहे. महाराष्ट्राचेच नव्हे तर अखिल भारताचे विविध क्षेत्रांतील जीवन समृद्ध करण्यासाठी झटणारे नेते या विद्यापीठातून निर्माण झाले आहेत.

नागपूर विद्यापीठाची स्थापना सन १९२३ मध्ये झाली. पुणे विद्यापीठ १९४८ साली स्थापन झाले. औरंगाबाद येथे मराठवाडा विद्यापीठाची स्थापना करण्यात आली. केवळ स्त्रीशिक्षणाला वाहिलेले स्वतंत्र विद्यापीठ असावे या कल्पनेने महर्षि कर्वे यांनी श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठाची स्थापना सन १९१५ मध्ये केली. या विद्यापीठाचे प्रमुख काम मुंबई येथे चालते आणि पुणे व अन्य काही शहरांत महाविद्यालये आहेत. महाराष्ट्रातील या पाच विद्यापीठांनंतर १९६३ मध्ये शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर येथे अस्तित्वात आले व दिनांक १ मे १९८३ पासून अमरावती विद्यापीठ स्थापन करण्यात आले. अशी एकूण सात विद्यापीठे (अकृषी) सध्या महाराष्ट्र राज्यात कार्य करीत आहेत.

विद्यापीठांच्या अभ्यासक्रमात कला, विज्ञान, वाणिज्य, शिक्षण, विधी, अभियांत्रिकी, वैद्यकीय शिक्षण, तांत्रिक शिक्षण तसेच आयुर्वेद व फार्मसी अशा प्रमुख विद्याशाखा समाविष्ट आहेत. १९७४ पूर्वी ह्या विद्यापीठांचा स्वतंत्र असा वेगवेगळा कायदा अस्तित्वात होता. परंतु १९७४ पासून युनिव्हर्सिटी एज्युकेशन अॅक्टान्वये सर्व विद्यापीठे एकाच कायद्याच्या अमलाखाली आणली गेली. या कायद्यान्वये त्यांची कर्तव्ये निश्चित करण्यात येऊन त्यांना स्वायत्ततेचा दर्जा देण्यात आला. ही विद्यापीठे आपापल्या विभागातील परिस्थिती अभ्यासून संबंधित विभागाची शैक्षणिक उन्नती करण्याकरिता पोषक असे शिक्षण संशोधन करण्याची जबाबदारी प्रामुख्याने सांभाळीत आहेत.

उच्च शिक्षणाच्या विविध विद्याशाखांतून पदव्युत्तर व विशिष्ट संशोधनात्मक शिक्षणाचे कार्य अधिक जोमाने व्हावे या दृष्टीने मुंबई व पुणे विद्यापीठांतून विद्यापीठ अनुदान मंडळाच्या आर्थिक साहाय्याने सुरू झालेले सेंटर ऑफ अॅडव्हान्स स्टडी ही उल्लेखनीय बाब होय. शासनाचाही या केंद्रांना अनुदानाचा वाटा आहे.




*कृषि विद्यापीठांच्या संशोधनाचा महाराष्ट्रातील शेतकऱ्यांना चांगला फायदा होत आहे*



विद्यापीठे व महाविद्यालये यांच्या व्यतिरिक्त संशोधन कार्य करणाऱ्या १९६० मध्ये १५ संस्था होत्या. आज १९८३–८४ मध्ये अशा संस्थांची संख्या ७० झाली.

### कृषि विद्यापीठे

१९४८ पर्यंत केवळ पुणे येथेच कृषि महाविद्यालय होते. महाराष्ट्राच्या पुर्ननिमितीनंतर नागपूर, अकोला आणि परभणी येथील कृषि महाविद्यालये महाराष्ट्रात समाविष्ट करण्यात आली. धुळे, सोलापूर आणि दापोली येथे आणखी तीन महाविद्यालये स्थापन करण्यात आली.

कृषिविषयक क्षेत्रातील उच्च शिक्षणाची व संशोधनाची वाढती गरज लक्षात घेऊन, महाराष्ट्र राज्यात राहुरी येथे १९६८ मध्ये, त्यानंतर १९७१ मध्ये अकोला येथे व १९७२ मध्ये परभणी आणि दापोली येथे कृषि विद्यापीठे स्थापन करण्यात आली. सर्व संशोधनात्मक केंद्रे आणि योजना त्याचप्रमाणे सर्व शैक्षणिक संस्था या विद्यापीठांकडे सुपूर्द करण्यात आल्या. या चार कृषि विद्यापीठांत आणि कृषि विभागात सुसंवाद-सुसूत्रता असावी यासाठी नुकताच राज्य शासनाने एक कायदा पास केला आहे.

### शिक्षणावरील वाढता खर्च

सहाव्या पंचवार्षिक योजनेच्या कालखंडात राज्य शासन आपल्या एकूण खर्चाच्या अंदाजे सहावा हिस्सा शिक्षणासाठी देत आहे. शिक्षणावरील दरडोई खर्चात पुढीलप्रमाणे वाढ झाली आहे :

**दरडोई खर्च (रुपयांत)**

| | १९६०–६१ | १९८३–८४ (अंदाजे) | वाढ (शेकडा) |
|---|---|---|---|
| प्राथमिक .. | ३८ | २५० | ५५८.० |
| माध्यमिक व उच्च माध्यमिक .. | १६६ | ४५० | २८७.९ |
| कला, शास्त्र, वाणिज्य महाविद्यालये .. | ३३२ | १,१०० | २३१.३ |

राज्यात जवळजवळ १ कोटी ३० लाख विद्यार्थी विविध स्तरांवर शिक्षण घेत आहेत; साडेतीन लाख शिक्षक ज्ञानदानाच्या कामात गुंतलेले आहेत आणि १९८४–८५ या वर्षी अंदाजे ५५० कोटी रुपये शिक्षणक्षेत्रावर शासनातर्फे खर्च करण्यात आले आहेत. अर्थात ही रक्कम खर्ची पडत आहे असे मानण्यापेक्षा या रकमेची महाराष्ट्राच्या भावी विकासासाठी गुंतवणूक (इन्व्हेस्टमेंट) करण्यात येत आहे असेच मानणे युक्त ठरेल.

१९८४–८५ या आर्थिक वर्षात शिक्षणांतर्गत विविध स्तरांवरील कार्यक्रमांसाठी योजनेतर व योजनांतर्गत खर्चाचा तपशील खालील तक्त्यामध्ये दिला आहे :

**शिक्षणांतर्गत विविध स्तरांवरील खर्चाचे अंदाजपत्रक**

(रुपये हजारात)

| विकासाचे शीर्ष/ उप शीर्ष (१) | योजनेतर (२) | योजनांतर्गत (३) | एकूण तरतूद (४) | टक्केवारी (५) |
|---|---|---|---|---|
| ए-प्राथमिक शिक्षण | २२,०७,४८४ | ५७,४२२ | २२,६४,९०६ | ४६.५ |
| बी-माध्यमिक शिक्षण | १५,९६,०५० | १५,५३,००० | १७,५१,३५० | ३६.० |
| सी-विशेष शिक्षण (प्रौढ शिक्षण) | ३,२६० | २०,६७९ | २३,९३९ | ०.५ |
| डी-विद्यापीठपूर्व शिक्षण | १,१२,१३२ | ३४,९०८ | १,४८,०४० | ३.० |
| ई-विद्यापीठ व इतर उच्च शिक्षण | ५,५१,९६७ | १६,६२७ | ५,६८,५९४ | ११.७ |
| एच-सर्वसाधारण | ८९,१०२ | २२,११६ | १,११,२१८ | २.३ |
| एकूण बेरीज | ४५,६०,९९५ | ३,०७,०५२ | ४८,६८,०४७ | १००.० |

वरील तक्त्यावरून लक्षात येईल की, राज्याच्या एकूण तरतुदींपैकी जवळजवळ २५० कोटी रुपये प्राथमिक शिक्षणावर



गुंतवणूक होत आहे. माध्यमिक शाळांसाठी खर्च होणाऱ्या रकमेचा विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात दोनतृतीयांश भाग इयत्ता ५ ते ८ वर खर्च होतो असे मानल्यास इयत्ता १ ते ८ च्या शिक्षणावर राज्यात प्रतिवर्षी एकूण ३८० कोटी रुपये गुंतवणूक होत आहे. तरीही ही तरतूद अपुरी पडते. वाढत्या विद्यार्थीसंख्येच्या प्रमाणात लागणारे जादा शिक्षक, वर्गखोल्यांचे बांधकाम आणि शैक्षणिक साहित्य या किमान गरजा पूर्ण करण्यासाठी आणि ५५० कोटी रुपयांच्या गुंतवणुकीचे परिणामकारक फळ मिळण्यासाठी त्यात किमान आणखी दोनशे कोटींची तरी भर घालायला हवी. १९९० अखेर प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रीकरणाचे व प्रौढ शिक्षणाचे उद्दिष्ट पूर्ण करायचे झाल्यास आवश्यक तितकी आर्थिक तरतूद उपलब्ध होऊ शकेल का ? हा महत्त्वाचा प्रश्न आहे. राज्य शासनाने आपला प्रस्ताव आठव्या अर्थ आयोगाला सादर केला आहे. समाजाकडून व बँकांकडून सतत आर्थिक सहाय्य मिळविण्याचा प्रयत्न चालू आहेच. सातव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सहाव्या योजनेच्या दुपटीपेक्षा जास्त आर्थिक तरतूद होण्याची गरज आहे. या संबंधात नियोजन मंडळाकडून वाढीव सहाय्य अपेक्षित आहे.

**विकासाची भावी दिशा**

महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेपासून गेल्या २४ वर्षांमध्ये सामान्य शिक्षणाच्या विविध स्तरांवर संख्यात्मक व गुणात्मक प्रगती होत असल्याचे स्पष्ट असले तरी अजूनही बराच पल्ला गाठावयाचा आहे. एकविसाव्या शतकाची पायाभरणी भक्कम होण्याच्या दृष्टीने पुढील काही आव्हानांना सामोरे जाऊन त्यावर मात करण्यासाठी अधिक सघन प्रयत्न व्हावयास हवेत हे निर्विवाद आहे. शासनाने शालेय अभ्यासक्रमात सुधारणा सुचविण्यासाठी व शिक्षण व्यवसायाभिमुख करण्यासाठी नेमलेल्या समित्यांचे अहवाल शासनाच्या विचाराधीन आहेतच. तसेच पदवीपूर्व अभ्यासक्रमाच्या पुनर्रचनेसाठी एक राज्यस्तरीय समिती शासनाने नेमली आहे. तसेच 'ओपन युनिव्हर्सिटी' (खुले विद्यापीठ) स्थापनेचा विचार करण्यासाठी एक समिती नेमण्यात आली आहे. या विविध समित्यांच्या शिफारशींचा मागोवा घेऊन व शिक्षणाशी संबंधित असलेल्या विविध घटकांशी संपर्क साधून नजिकच्या काळामध्ये या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्राची शैक्षणिक वाटचाल कोणत्या दिशेने व्हावी याबद्दल काही निश्चित असे धोरण आखावे लागेल. सर्वच स्तरांवरील विद्यार्थीसंख्येचे वाढते प्रमाण व त्या मानाने उपलब्ध होणारी साधनसामग्री व आर्थिक तरतुदी यांच्यामध्ये संतुलन राखण्याच्या दृष्टीने योजनाबद्ध असा कार्यक्रम हाती घ्यावा लागेल व त्या दृष्टीनेच महाराष्ट्र शासनाने पावले टाकण्यात येत आहेत.

*विश्वविक्रमी सुनील गावस्कर : श्री. गावस्कर यांनी क्रिकेटमधील अनेक जागतिक विक्रम मोडले. कसोटी क्रिकेटमध्ये ३० शतके झळकवून त्यांनी डॉन ब्रॅडमनचा विक्रमही मोडला*



बॅडमिंटनपटू नंदू नाटेकर यांना सहादा एकेरी, सहादा दुहेरी व तीनदा संमिश्र दुहेरी सामन्यांत राष्ट्रीय विजेतेपद मिळाले. १९६१ मध्ये त्यांना अर्जुन पारितोषिक मिळाले. मलेशिया, थायलंड, ब्रिटन इत्यादी देशांतील महत्त्वाच्या सामन्यांत त्यांनी आतापर्यंत ५३ एकेरी, ४३ दुहेरी व ३८ संमिश्र सामने जिंकले आहेत



बुद्धिबळपटू खाडिलकर भगिनी : रोहिणी, वासंती व जयश्री यांनी आंतरराष्ट्रीय बुद्धिबळ सामन्यांत अनेक बहुमान प्राप्त केले आहेत





कबड्डी व कुस्ती या प्रमुख देशी खेळांमध्ये देशात महाराष्ट्र अग्रेसर आहे

# महाराष्ट्रातील विज्ञान व तंत्रज्ञान

प्रा. रा. वि. सोवनी

महाराष्ट्र राज्य स्थापनेचा रौप्यमहोत्सव साजरा करीत असताना गेल्या पंचवीस वर्षांत आपण किती आणि कशी प्रगती केली याचा आढावा घेणे अगत्याचे आहे. विशेषत: ज्या विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या साहाय्याने आपण प्रगती केली त्यासंबंधीचे सिंहावलोकन करणे जरूर आहे. महाराष्ट्रातील प्रगतीचा मागोवा घेत असताना आपल्याला साऱ्या भारताचाही विचार करणे अपरिहार्य ठरते. कारण अखेरीस महाराष्ट्र हा भारताचाच एक महत्त्वाचा घटक आहे. तेव्हा विज्ञान व तंत्रज्ञान या क्षेत्रातील प्रगतीचा आढावा घेताना प्रथम आपण त्याची राष्ट्रीय पूर्वपीठिका पाहणे योग्य ठरेल.

आपल्याला विज्ञान व तंत्रज्ञान अपरिचित नाही. प्राचीन भारतात विज्ञानाचा कसून अभ्यास केला गेला. आयुर्वेदासारखे प्रगत तंत्रज्ञान आपल्याकडे तयार झाले. खगोलशास्त्रातही आपण फार महत्त्वाची भर टाकली व त्यासाठी लागणारे गणित भारतातच तयार झाले. परंतु ज्या काळात पाश्चात्य देशांमध्ये विज्ञानाला बहर आला होता त्या काळात आपल्याकडील परकीय सत्तेने आपल्या प्रगतीचा आर्थिक पायाच उखडून टाकला होता. आपले प्राचीन कार्य रसातळाला गेले आणि आपण पूर्णपणे परावलंबी बनलो. सुदैवाने या स्थितीची कल्पना टिळक, गांधी, नेहरू यांच्यासारख्या प्रज्ञावंत पुढाऱ्यांना आली आणि 'संपूर्ण स्वातंत्र्य' हेच ध्येय त्यांनी अंगीकारले. आपल्याला स्वातंत्र्य मिळाले. परंतु तोपर्यंत परकीय राज्यकर्त्यांनी आपले पूर्ण शोषण करून आपला फक्त सांगाडाच ठेवला होता. या सांगाड्यात प्राणप्रतिष्ठा करण्याचे काम पंडित जवाहरलाल नेहरू यांनी केले आणि त्याचीच फळे आपण आज चाखीत आहोत.

आपल्या स्वातंत्र्य चळवळीचा उद्देश, आर्थिक स्वातंत्र्य हा असल्यामुळे स्वातंत्र्य मिळाल्यावर राष्ट्राची प्रगती होण्यासाठी औद्योगिकीकरण आणि शेती व्यवसायात सुधारणा ह्यावर प्रामुख्याने भर देण्यात आला. यासाठी भारतीयांमध्ये विज्ञानाची 'जाणीव' (टेम्पर) निर्माण होणे अत्यंत जरूर आहे असे नेहरूंना वाटले आणि त्यांनी त्या दृष्टीने प्रगतीची आखणी केली. कौन्सिल ऑफ सायंटिफिक अँड इंडस्ट्रियल रीसर्चची स्थापना करून राष्ट्रीय प्रयोगशाळांची जबाबदारी या संस्थेकडे सोपविण्यात आली. त्याचप्रमाणे वैद्यक व शेतीविषयक संस्थांची निर्मिती करण्यात आली. चिमुकल्या स्वतंत्र भारताने अणुशक्तीला हात घातला, एवढेच नव्हे तर पुढे अवकाश संशोधन आणि प्रवास यांविषयीचे कार्यही करण्यास सुरुवात केली. देशातील वैज्ञानिक व तांत्रिक प्रगतीला योग्य ते वळण लागावे यासाठी पंडित नेहरूंनी १९५८ मध्ये वैज्ञानिक धोरणासंबंधीचा ठराव कार्यान्वित केला.

वैज्ञानिक धोरणाची मुख्य उद्दिष्टे पुढीलप्रमाणे :

(१) शुद्ध, उपयोजित आणि शैक्षणिक अशा तीनही प्रकारच्या वैज्ञानिक संशोधनासाठी देशात विज्ञानाची वाढ करणे, जपणूक करणे व पोषण करणे.

(२) संशोधनासाठी उच्च दर्जाचे संशोधक तयार करून त्यांना राष्ट्रीय प्रगतीचे प्रमुख घटक मानणे.

(३) शिक्षण, शेती, उद्योगधंदे आणि संरक्षण यांसाठी लागणारे वैज्ञानिक व तंत्रज्ञ यांच्या शिक्षणासाठी व कार्यासाठी सर्वतोपरी मदत करणे.

भारतामधील वैज्ञानिक व तांत्रिक प्रगतीचा पाया मध्यवर्ती शासनाने घातला व त्यामुळेच भारताच्या विविध राज्य घटकांमध्ये प्रगती झाली. ही प्रगती अधिक पद्धतशीर करण्यासाठी १९७१ मध्ये मध्यवर्ती शासनाने विज्ञान व तंत्रज्ञान खाते निर्माण केले.

*मुंबईच्या हाफ्किन इन्स्टिट्यूटमध्ये सापाचे विष काढताना*




महाराष्ट्रात २१ ठिकाणी दूरचित्रवाणी प्रक्षेपण केंद्रे सुरू करण्यात आली आ
त्यांचा फायदा राज्यातील ६,७०० खेड्यांना मिळतो. त्यामुळे दूरचित्रवाणी
हे लोकशिक्षणाचे प्रभावी माध्यम झाले आहे



या खात्यामार्फतच एकूण प्रगतीचा आढावा आणि एकमेकांतील परस्पर सहकार्य यांवर लक्ष ठेवले जाते.

वैज्ञानिक व तांत्रिक प्रगतीचा आढावा घेताना या प्रगतीचा जो फायदा दैनंदिन जीवनात मिळत आहे त्याचा विचार करावा लागतो. यासाठीच महाराष्ट्र राज्यातील प्रगती पाहताना आपण शेती, धान्य उत्पादन, साखर उत्पादन, धातू उत्पादन, धरणे, पाणीपुरवठा, वीज, आरोग्य इत्यादी घटकांचा विचार करणार आहोत. कारण या क्षेत्रांमधील प्रगती ही वैज्ञानिक व तांत्रिक प्रगतीमुळेच शक्य झाली आहे यात संदेह नाही.

महाराष्ट्र राज्य शासनाने वैज्ञानिक व तांत्रिक प्रगतीसाठी विशेष लक्ष पुरविले आहे. भारतामध्ये मुंबईसारख्या ठिकाणी वस्त्रोद्योग, रेल्वे आणि विद्युत निर्मितीचे कार्य प्रथम सुरू झाले. या मुंबईतच व्ही.जे.टी.आय. आणि यू.डी.सी.टी. (युनिव्हर्सिटी डिपार्टमेंट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी) यांसारख्या संस्था स्थापन झाल्या. त्यामुळे उद्योगधंदे वाढीस लागले. या सर्व उद्योगधंद्यांमध्ये पाश्चिमात्य देशांतील तांत्रिकीचा वापर केला जात असे. या तांत्रिकीचा एतद्देशीय परिस्थितीला योग्य असा वापर करण्याचे कार्य मात्र त्या मानाने होत नव्हते. उद्योगधंद्यांचा विकास होण्यासाठी भारतीय विज्ञान व तंत्रज्ञान यांचा विकास होणे जरूर होते. यासाठी प्रत्येक वेळी काही नवीन संशोधनच करावयास पाहिजे असे नाही. परंतु इतरत्र जे काही संशोधन होत आहे त्याचा मागोवा घेऊन ते आपल्याकडील परिस्थितीला कसे उपयोगी पडेल याचा विचार होणे आवश्यक आहे.

मध्यवर्ती शासनाने विज्ञान व तंत्रज्ञानाच्या प्रगतीसाठी काही ठोस पावले उचलली आणि त्याचा फायदा घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाने ८ फेब्रुवारी १९७२ मध्ये यासंबंधीचा विचार करण्यासाठी एक उच्चस्तरीय समिती नेमली. या समितीचे अध्यक्ष मुख्य मंत्री व उपाध्यक्ष शिक्षण मंत्री होते. समितीच्या शिफारशींनुसार जून १९७४ मध्ये शासनाने विज्ञान व तंत्रज्ञान कक्ष निर्माण केला. राज्यासाठी संशोधन व विकास नियोजन उप समित्या नेमून या कक्षाचे काम सुरू झाले. उप समित्यांनी प्रकल्प सुचविले त्याचप्रमाणे खाजगी क्षेत्रांतूनही प्रकल्पांसाठी कल्पना या कक्षाकडे आल्या.

विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाचे एक प्रशंसनीय अंग असे की हा कक्ष विज्ञान संशोधनाचे काम हाती घेत नाही तर हा कक्ष समायोजनेचे काम करतो. म्हणजे असे की. कक्षाने मान्य केलेले प्रकल्प योग्य त्या संस्थेकडे तो सुपूर्द करतो. या संस्थांना आर्थिक व तांत्रिक साहाय्य देतो. म्हणजे थोडक्यात हा कक्ष प्रेरक (कॅटॅलिस्ट) कार्य करतो. ज्या संस्थेकडे एखादा प्रकल्प सुपूर्द केला जातो त्या संस्थेची क्षमता अर्थातच तपासून पाहिलेली असते. त्यांच्या कामाला उद्दीपन करण्याचे कार्य हा कक्ष करतो. त्यामुळे संस्थेच्या कार्याला चालना मिळून प्रकल्प मार्गी लागतो. एवढेच नव्हे तर पूर्णही होतो. १९७६–७७ मध्ये या कक्षाने एकूण २२ प्रकल्पांना १.८ लक्ष रुपयांची आर्थिक मदत केली. १९७८ मध्ये ३ लक्ष रुपये खर्च केले.

विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने केलेले कार्य पुढीलप्रमाणे आहे. यांतील काही ठळक प्रकल्पांचा प्रथम आढावा घेऊन नंतर इतर प्रकल्पांची माहिती घेऊ.

**मॅग्नेशिअम ऑक्साईड प्रकल्प**

महाराष्ट्राला खूप मोठा सागरकिनारा आहे. या सागरकिनाऱ्यावर मोठ्या प्रमाणात मीठ तयार केले जाते. मीठ काढल्यानंतर जो गाळ राहतो त्यात अनेक धातूंची संयुगे असतात व साहजिकच धातूंच्या उत्पादनासाठी हा एक फार मोठा उद्गम आहे. आजपर्यंत याचा वापर कधी केला नव्हता. कक्षाने भावनगरच्या एका संस्थेला पन्नास हजार रुपयांचे अनुदान देऊन गाळातून मॅग्नेशिअ अलग करण्याचे काम करण्यास सांगितले. या संस्थेने मॅग्नेशिअम हायड्रॉक्साईड तयार करून प्रकल्प पुरा केला आहे. या संयुगाचा उत्तापसह (रिफ्रॅक्टरी) म्हणून उपयोग होतो. म्हणजे असे की. अशा प्रचंड तपमानाच्या ज्या भट्ट्या असतात त्यांना अस्तर म्हणून मॅग्नेशिअमचा उपयोग होतो. या प्रकल्पात तयार झालेला एक टन



मॅग्नेशिआ जमशेदपूर येथील टाटा स्टील कंपनीला पुरविण्यात आला. प्रकल्प यशस्वी झाल्यावर मॅग्नेशिआ मोठ्या प्रमाणावर तयार करण्यासाठी आता खाजगी कंपन्यांना देण्यात येत आहे.

**ध्वनी मोजणारा मीटर**

अनेक कारखान्यांमध्ये प्रचंड प्रमाणावर आवाज होत असतात. या आवाजांचा परिणाम कामगारांवर होत असतो. आवाजाचा दुष्परिणाम टाळण्यासाठी कारखान्यात किती आवाज तयार होतो ते दर्शविणारे एखादे साधन आवश्यक असते. विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने अशा प्रकारचे मोजमाप करणारे यंत्र बनविण्यासाठी १४ हजार रुपये दिले. मुंबईमधील एका संस्थेने ध्वनी मोजणारा मीटर तयार केला आहे व त्याचे मोठ्या प्रमाणावर उत्पादन लवकरच सुरू होईल.

**पाण्याचा अपव्यय टाळणे**

पाणीपुरवठा करणारे जलाशय प्रचंड असतात. यातील पाण्याची सतत वाफ होऊन मोठ्या प्रमाणात पाणी वाया जाते. हा अपव्यय टाळण्यासाठी कक्षाने राष्ट्रीय केमिकल प्रयोगशाळा व पुणे येथील जलसिंचन खात्याच्या मदतीने महाराष्ट्रामधल्या चार मोठ्या जलाशयांवर अल्कॉक्झी एथेनॉल या रसायनाचा एक रेणवीय जाडीचा थर पसरला. या थरामुळे एक दशलक्ष घनफूट (क्युबिक फीट) पाणी वाचविता आले. या वाचलेल्या पाण्यावर २४ हेक्टर क्षेत्रात दीड लाख रुपये किंमतीचा भाजीपाला तयार करण्यात यश आले. वाऱ्याच्या झोतामुळे रसायनाचा थर फाटू नये, ढकलला जाऊ नये म्हणूनदेखील प्रयत्न चालू आहेत. अशा प्रकारे पाणी वाचविण्याचा एक महत्त्वाचा उपाय आता आपल्याला उपलब्ध झाला आहे.

**मातीचे संशोधन**

ज्या मातीत पिके उभी करावयाची त्या मातीचा कस कशा प्रकारचा आहे हे माहीत असणे जरूर आहे. महाराष्ट्रामधल्या मातीचे असे संशोधन व माहिती उपलब्ध नव्हती. विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने महाराष्ट्रातील ठिकठिकाणच्या मातीचे विश्लेषण करून, मातीचा कस ठरविण्याच्या दृष्टीने राज्यातील सर्व कृषि विद्यापीठे आणि इतर अनेक संस्थांना प्रोत्साहन दिले. जंगलतोडीमुळे आणि पुरामुळे जमिनीची फार मोठ्या प्रमाणात झीज होते. त्यातील क्षार वाहून नेले जातात व पर्यायाने जमीन नापीक बनते. महाराष्ट्रातील एकूण शेतजमिनीचे वैज्ञानिक सर्वेक्षण आवश्यक होते. कक्षाने अंगिकारलेल्या कामात जमिनीतील सूक्ष्म पोषकद्रव्ये पाहणे हे महत्त्वाचे होते. तांबे, बोरॉन, जस्त, मँगनीज, लोखंड आणि मॉलिब्डिअम या धातूंची संयुगे अत्यल्प प्रमाणात जमिनीत असतात व ती वनस्पतींना अत्यावश्यक असतात. या संयुगांनाच सूक्ष्म पोषण द्रव्ये (मायक्रो-न्यूट्रिअंट्स) असे म्हणतात. सर्वेक्षणाचे हे काम १९७८ पासून सुरू आहे आणि आता ते लवकरच पुरे होईल. राज्यातील प्रत्येक तालुक्यातील मातीचे नमुने गोळा केले जाऊन त्यांचे विश्लेषण करण्यात येईल. या प्रकल्पामुळे संपूर्ण राज्याचा एक उत्तम असा मृत्तिका नकाशाच तयार होईल. त्याशिवाय राज्यातील कोणाही शेतकऱ्यास त्याच्या शेतजमिनीचे विश्लेषण व परीक्षण करून देण्याची सोयही करण्यात आली आहे. हे कार्य राज्याच्या धान्योत्पादनवाढीस फार महत्त्वाचे ठरणार आहे.

**पाझर तलाव**

महाराष्ट्रात अनेक ठिकाणी पाण्याची टंचाई भासते. पिण्याचे पाणी व शेतीला लागणारे पाणी मिळणे आवश्यक असते. परंतु टंचाईग्रस्त भागांमध्ये काय करावयाचे? विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने पाझर तलाव तयार करण्याचे कार्य करण्यास मदत केली. काही ठिकाणी चर खणून पावसाचे पाणी साठवण्याचे प्रयोग केले. या प्रयोगांना हळूहळू यश येत आहे.

**सागरी तण (सी वीड्स)**

महाराष्ट्राला ७२० किलोमीटर लांबीचा सागरकिनारा



लाभलेला आहे. ह्या सागरकिनाऱ्यावर अनेक प्रकारच्या वनस्पती व प्राणी राहात असतात. ह्या सागरी वनस्पतींमधून आयोडीनसारखे महत्त्वाचे घटक मिळू शकतात. विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाच्या साहाय्याने महाराष्ट्राच्या सागरकिनाऱ्याचे सर्वेक्षण करण्यात आले. किनाऱ्यावरच्या सागरी वनस्पतींना सागरी तण (सी वीड्स) असे म्हणतात. या सर्वेक्षणाच्या आधारे मालवण किनाऱ्यावर सागरी तणांचे मोठ्या प्रमाणात संवर्धन करता येईल असे आढळून आले आहे. या भागात हिप्निया, सरगॅसम, ग्रॅसिलॅरिया इत्यादी जातींच्या तणांचे संवर्धन करण्यात येणार आहे. या तणांपासून अल्जिनिक आम्ल, अगरअगर, अल्जिनेट्स इत्यादी प्रकारची रसायने मिळतात. गोवा येथील नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ ओशनॉग्राफी या संस्थेकडे हे काम देण्यात आले आहे.

**औषधी वनस्पती**

हिमालयातील डायस्कोरिआ ही कंदमूळ वनस्पती जंगलतोड व जमिनीची धूपणी यांमुळे त्या भागात नामशेष होत आहे. या कंदमुळापासून स्टेरॉइड व संप्रेरके (हॉर्मोन्स) मिळतात. साहजिकच ही औषधी वनस्पती फार महत्त्वाची आहे. तथापि ही वनस्पती इतरत्र वाढविण्याचे प्रयोग सुदैवाने झाले आहेत. बंगळूर येथील इंडियन हॉर्टिकल्चर रीसर्च स्टेशनमध्ये डायस्कोरिआचे संवर्धन केले जाते. आपल्या राज्याच्या विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने जंगल खात्यामार्फत डायस्कोरिआचे कंद बंगळूर येथून आणून नाशिक विभागात लावले. ही वनस्पती येथे उत्तम वाढली. नाशिक येथील रोपांमधून १२-१५ टन वियाणे मिळाले. आता फॉरेस्ट डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र या संस्थेमार्फत नागपूर विभागात डायस्कोरिआची लागवड २०० एकरांत करण्यात आली आहे. डायस्कोरिया वनस्पतीत डायऑस्जेनिन या नावाचे द्रव्य मिळते. ही वनस्पती मोठ्या प्रमाणात उपलब्ध झाल्यावर त्यातील औषधिद्रव्ये तयार करण्यासाठी इतर संस्थांना व कारखान्यांना दिली जातील. औषधी वनस्पतीसंबंधीचा आणखी एक प्रकल्प म्हणजे 'बिब्वा'. बिब्यामध्ये कर्करोग विरोधक रसायने असण्याची शक्यता दिसून आली होती. आज बिब्वा निर्यात केला जातो तो केवळ त्याच्या गुणधर्मांचे विश्लेषण करण्यासाठी. विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने टाटा मेमोरियल रुग्णालय (कॅन्सर संशोधन केंद्र), इन्स्टिटयूट ऑफ सायन्स, मुंबई आणि हाफकिन संस्था, मुंबई, नॅशनल केमिकल लॅबोरेटरी, पुणे या संस्थांच्या साहाय्याने बिब्यातील रसायनांचा शोध घेतला. निरनिराळ्या पद्धतीने बिब्याचे अर्क काढून त्यातील रसायनांच्या प्रतिक्रिया तपासण्यात आल्या. काही रसायने कर्करोगाला प्रतिकार करतात असे आढळून आले. हा शोध पुढे चालू आहे.

आणखी एक प्रकल्प म्हणजे सदाफुलीतील कॅन्सरविरोधी घटक अलग करणे. सदाफुलीच्या पानात विविध प्रकारची ३० अल्कलाईडे सापडतात. त्यांपैकी व्हिनब्लास्टिन आणि व्हिनक्रिस्टिन ही रसायने अलग करून त्यांचे गुणधर्म तपासण्यात आले. नॅशनल केमिकल लॅबोरेटरीने हे काम पुरे केले आहे. आता ही औषधे मोठ्या प्रमाणावर तयार करण्यासाठी सिप्ला कंपनीला परवानगी देण्यात आली आहे व ती औषधे बाजारात उपलब्ध आहेत.

विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने राबविलेले आणखी काही प्रकल्प पुढीलप्रमाणे आहेत :

**(१) ज्वारीची नवी जात**

गहू आणि तांदूळ यांच्या खालोखाल ज्वारीचा वापर महाराष्ट्रात होतो. विशेषत: ग्रामीण विभागात ज्वारी हेच प्रमुख अन्न आहे. या ज्वारीच्या नव्या नव्या जाती राज्याच्या कृषि विभागाने तयार केल्या आहेत. नव्या जातींमध्ये प्रथिने व अमिनो आम्ले यांचे प्रमाण किती आहे याचा शोध घेण्यात आला. हे प्रमाण जास्त असणाऱ्या जातींची लागवड आता अधिक प्रमाणात करण्यात येत असून पौष्टिक ज्वारी मिळण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

**(२) सोनामुखी**

सोनामुखी ही प्रामुख्याने रेचक म्हणून वापरण्यात येते. परंतु



ऊर्जेची पर्यायी साधने शोधण्यात महाराष्ट्र अग्रेसर आहे. प्रवरा साखर कारखान्याने वैद्यकीय महाविद्यालयासाठी उभारलेला सौरशक्ती प्रकल्प



या वनस्पती फक्त जंगलात उपलब्ध आहेत व त्यांच्यातील रेचक द्रव्याचे प्रमाणही कमी आहे. नागपूर विद्यापीठाने सोनामुखीतील रेचक द्रव्याचे प्रमाण वाढविण्यासाठी संशोधन प्रकल्प हाती घेतला. विदर्भामधील काही जातींच्या संकर प्रजा तयार करण्यात आल्या. या संकरित जातींमध्ये रेचक द्रव्यांचे प्रमाण खूपच असल्याचे आढळून आले आहे. भविष्यकाळात सोनामुखीच्या या नव्या जातींची पद्धतशीर लागवड करण्यात येऊन त्यातील औषधिद्रव्ये मोठ्या प्रमाणात उपलब्ध होईल अशी खात्री आहे.

## (३) रबर देणारी वनस्पती

रबर देणारी झाडे जगात काही भागांतच वाढतात. त्यांना आर्द्र वातावरण व भरपूर पाऊस लागतो. महाराष्ट्रात काही ठिकाणी रबराच्या झाडांची मोठ्या प्रमाणावर लागवड करण्याचे प्रयोग यशस्वी झाले आहेत. तरीसुद्धा आज पुरेसे रबर उपलब्ध होत नाही म्हणून वायुली (Guayule) या नावाच्या वनस्पतीची लागवड हाती घेण्यात आली. ह्या वनस्पतीचे शास्त्रीय नाव 'पार्थेनियम आर्जेंटेटम' असे आहे. ही वनस्पती आपल्याकडे अर्धरूक्ष जमिनीत वाढते. कक्षामार्फत वायुलीची लागवड मोठ्या प्रमाणात करण्यात आली आहे. या वनस्पतीमधून उत्तम दर्जाचे नैसर्गिक रबर मिळते. या वनस्पतीचा आणखी एक फायदा म्हणजे ही वनस्पती जमिनीची धूप थांबविते आणि जमिनीखालील पाण्याचा साठा वाढविण्यास उपयोगी ठरते. पुणे विद्यापीठ, पुणे येथील कृषि विद्यालय व भावनगर येथील सॉल्ट संशोधन केंद्र या संस्थांनी आपल्या जागांमध्ये वायुलीची ४ ते ५ हजार झाडे लावली आहेत व त्यांतून रबरही मिळू लागले आहे.

## (४) पामतेल

खाद्यतेलाची टंचाई सतत भासत असल्याने खाद्यतेलाचे उत्पादन वाढविण्याकरिता नव्या नव्या वनस्पतींचा शोध घेणे जरूर आहे. यांपैकी पाम हे एक झाड आहे. आज पामतेल आपण आयात करीत आहोत. त्याऐवजी या झाडांची येथेच लागवड केल्यास पामतेलाची आयात करावी लागणार नाही या दृष्टीने कक्षाने पामचे संवर्धन यशस्वीपणे केले आहे. याची एक शुद्ध जात आता तयार असून या झाडांची मोठ्या प्रमाणावर लागवड करण्यात येणार आहे.

## (५) पंखधारी घेवडा

घेवड्याचे अनेक प्रकार आहेत. घेवड्यांच्या बियामध्ये ३७ टक्के प्रथिने असतात. तेव्हा याचा उपयोग कुपोषण सुधारण्यासाठी होतो. पंखधारी घेवड्याची लागवड कक्षामार्फत महाराष्ट्राच्या विविध भागांत केली गेली. आज हा घेवडा उपलब्ध असून त्यामुळे पौष्टिक अन्नाचा पुरवठा होण्यास मदत होणार आहे.

## (६) जोजोबाची लागवड

मेक्सिकोमध्ये वाळवंटी प्रदेशात जोजोबा नावाचे झुडूप उगवते. या वनस्पतीमध्ये एक उत्तम प्रकारचे तेल मिळते. हे तेल वंगण आणि सौंदर्य प्रसाधने तयार करण्याच्या कामात विशेष उपयोगी पडते. शिवाय हे तेल उद्योगधंद्यात वापरल्या जाणाऱ्या देवमाशाच्या तेलासारखेच असल्यामुळे त्याचा फार मोठ्या प्रमाणावर वापर होतो. मध्यवर्ती शासनाच्या विज्ञान खात्यामार्फत जोजोबाच्या लागवडीचा कार्यक्रम जोधपूर व लखनऊ येथे राबविण्यात आला. महाराष्ट्राच्या विज्ञान कक्षाने मराठवाड्यातील कमी पावसाच्या प्रदेशात जोजोबाची लागवड करण्याचा उपक्रम हाती घेतला. मराठवाड्यातील कृषि विद्यापीठाने परभणी जिल्ह्यात ३५० झुडपांची लागवड केली आहे. या लागवडीचे परिणाम उत्साहवर्धक आहेत.

## (७) मत्स्योद्योग

कोळंबीचे उत्पादन मागणीच्या मानाने फार कमी आहे. यासाठी कोळंबीचे संवर्धन करण्याच्या योजना रत्नागिरी येथे राबविण्यात आल्या. कोळंबीसाठी लागणारे खाद्यही अल्प किंमतीत तयार करण्यात यश आले असून आता कोळंबी भरपूर



प्रमाणात उपलब्ध होईल. रत्नागिरी येथेच ऑईस्टरच्या (शिंपले) संवर्धनाचे केंद्र स्थापन करण्यात आले आहे.

कटला, रोहू, मृगल आणि सायप्रिनस हे गोडचा पाण्यातील कार्प जातीचे मासे आहेत. या माशांचे उत्पादन वाढावे यासाठी विज्ञान कक्षाने खास संशोधन प्रकल्प राबविले. नागपूर विद्यापीठामार्फत कृत्रिम संप्रेरकांच्या इंजेक्शनमुळे या माशांची उत्पादनक्षमता वाढविण्याचे प्रयोग करण्यात आले. गोडचा पाण्यातील हे मासे आता मोठ्या प्रमाणात उपलब्ध होऊ लागतील.

**(८) पशुसंवर्धन**

मुंबई येथील पशुवैद्यक महाविद्यालयामार्फत म्हशीच्या दुधाचे उत्पादन वाढविण्यासाठी प्रयत्न केले गेले. विज्ञान कक्षाच्या अनुदानाने या महाविद्यालयाने संप्रेरकांचा वापर करण्यास सुरुवात करून दूध निर्मितीत लक्षणीय वाढ केली आहे. उत्तम निपज करण्यासाठी रेडा व म्हैस यांची योग्य प्रमाणात निर्मिती करावी लागते. त्यासाठी रेडचाच्या वीर्यातील एक्स् व वाय् गुणसूत्रधारी शुक्रबीजे अलग करून कृत्रिम गर्भधारणांचे यशस्वी प्रयोग करण्यात आले आहेत. यामुळे उत्तम दर्जाच्या म्हशींची निपज मोठ्या प्रमाणावर करता येईल.

**(९) ऊर्जा निर्मिती**

ऊर्जेची टंचाई जाणवत असताना नवे नवे ऊर्जा स्रोत शोधून काढण जरूर आहे. यासाठी विज्ञान कक्षाने काही प्रकल्प राबविले आहेत.

मुंबईमधील कचरा आज केवळ जमिनीची भरणी करण्याकरिता वापरला जात आहे. या कचऱ्यापासून ज्वलनवायू निर्मितीचे प्रकल्प हाती घेण्यात आले आहेत. ह्यासाठी योजना आयोगाने एक कोटी रुपयांचे अनुदान दिले असून त्याच्या आधारावर १०० टन कचऱ्यावर प्रक्रिया करण्याचे प्रयोग सुरू झाले आहेत. ही योजना यशस्वी झाल्यास इंधन समस्येवर फार मोठा तोडगा निघेल यात शंका नाही.

पवनचक्कीचा उपयोग करून ऊर्जा मिळविण्याच्या खटपटीत कक्षाने काही प्रकल्प हाती घेतले आहेत. राज्यात १०० पवनचक्क्या उभारल्या जाणार असून त्यांची निर्मितीही राज्यातच होणार आहे.

कापडाच्या गिरण्यांमध्ये गरम पाणी लागते. यासाठी बॉयलरमध्ये इंधन वापरतात. आता सूर्याच्या उष्णतेवर बॉयलरचे काम करण्याचा प्रकल्प कक्षाने हाती घेतला आहे. सौर ऊर्जेवर चालणारे बॉयलर व त्यापासून मिळणारे गरम पाणी मुंबईच्या जे. जे. रुग्णालयात व वेस्टर्न इंडिया टेक्स्टाईल गिरणीत मिळत आहे.

बायोगॅस निर्मितीसाठी दापचारी येथे एक यंत्रणा बसविण्यात आली आहे. हा वायू वीजनिर्मितीसाठीही वापरता येतो. त्यामुळे त्या भागातील शेतकऱ्यांच्या पंपांना वीज मिळू लागली आहे.

**(१०) कुष्ठरोग्यांना मदत**

हा प्रकल्प जरा वेगळा आहे. कुष्ठरोग झालेल्या माणसांना त्वचेच्या व्याधी चटकन होतात. काही रोग्यांना तळपायावर फोड किंवा व्रण होतात. या व्रणाचे दुःखही त्यांना जाणवत नाही. परंतु व्रणामुळे त्यांच्या हालचालीवर निर्बंध येतो. अशा रोग्यांना व्रण होणार नाही अशा प्रकारचे पादत्राण तयार करण्यासाठी कक्षाने अनुदान दिले. या प्रकल्पातून प्लॅस्टिकचे सँडलसारखे पादत्राण तयार झाले असून त्याची चाचणी सुरू आहे. पादत्राण पोकळ असून आतल्या बाजूस एक लोखंडी पट्टी बसविलेली आहे. यामुळे पायतळ पादत्राणावर घासत नाही, पायाला धर मिळतो व पर्यायाने व्रण होत नाहीत.

**(११) कीटकनाशकांचा फवारा मारणारी बैलगाडी**

पिकांवर होणारी कीड नष्ट करण्यासाठी औषधांचे फवारे मारणे जरूर असते. हे काम एखाद्या माणसाला फवारा पंप घेऊन करावे लागते. साहजिकच माणसाच्या कार्याला मर्यादा पडत असल्यामुळे थोडचा वेळात विस्तारित विभागावर फवारणी होत नाही. कक्षाने दिलेल्या अनुदानातून खामगाव येथील शासकीय पॉलिटेक्निकने



बैलगाडीत बसणारे एक साधन तयार केले आहे. या साधनामार्फत कीटकनाशकाचा फवारा मारता येतो. त्याचबरोबर पिकांना द्यावयाचे पौष्टिक द्रावही देता येतात. या साधनामुळे एकटा शेतकरी एका दिवसात १२ एकर क्षेत्रावर फवारणी करू शकतो.

महाराष्ट्र राज्याच्या विज्ञान व तंत्रज्ञान कक्षाने केलेल्या या कामगिरीचे हे दिग्दर्शन आहे. त्याशिवाय कक्षाने अनेक नव्या योजना हाती घेतल्या असून त्यामुळे महाराष्ट्राच्या विज्ञान व तंत्रज्ञान प्रगतीला फार मोठा हातभार लागणार आहे.

विकासाचा आढावा घेत असताना एका घटकाचा शेवटी उल्लेख करणे आवश्यक आहे. महाराष्ट्रात मध्यवर्ती शासनामार्फत चालविलेल्या, नियंत्रित केलेल्या आणि अनुदानित अशा विविध प्रकारच्या अनेक संस्था काम करीत आहेत. जसे मुंबई येथील टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रीसर्च, भाभा अणु संशोधन केंद्र, टाटा कॅन्सर रीसर्च सेंटर, पुणे येथील नॅशनल केमिकल लॅबोरेटरी इत्यादी. या सर्व संस्था आपापल्या परीने संशोधन करतात व राष्ट्राच्या विकासास हातभार लावतात. एवढेच नव्हे तर या संस्था खुद्द महाराष्ट्रासाठी मोलाचे काम करतात. त्यांचा फक्त उल्लेख येथे केला आहे. विज्ञान परिषदेतर्फे विज्ञानविषयक जागृतीचे स्पृहणीय काम चालू असते.

विज्ञान व तंत्रज्ञानाच्या क्षेत्रांत महाराष्ट्र निश्चितच आघाडीवर आहे. विकासाचा हा वेग वाढत जाणार आहे आणि आपण आगामी नव्या शतकात मोठ्या आत्मविश्वासाने पदार्पण करणार आहोत.



आधुनिक उपकरणाने अंड्यांची चाचणी

पुढील पानावर : पवनचक्कीवर सुरू असलेली पाणीपुरवठा योजना



कृषि प्रगतीचे प्रतीक :
शेतकरी स्त्री
*शिल्पकार : श्री. पानसे*

# महाराष्ट्राचा आर्थिक विकास

संतोष दास्ताने

**प्रास्ताविक**

महाराष्ट्राची सर्वांगीण प्रगती व्हावी व मराठी संस्कृती, मराठी अस्मिता यांचा चहूबाजूंनी विकास व्हावा यासाठी स्वतंत्र महाराष्ट्राची निर्मिती बरोबर पंचवीस वर्षांपूर्वी झाली. विकासाच्या घोडदौडीमध्ये क्षणभर थबकून आतापर्यंत झालेली प्रगती न्याहाळणे ही गोष्ट अनोखी आहे तशीच गरजेची आहे. व्यक्तीच्या किंवा समाजाच्या आर्थिक समस्यांची उकल कितपत जमली, आजवरच्या प्रगतीतून बोध काय घ्यायचा याचा मागोवा पुढील पानांमधून घ्यावयाचा आहे. उद्योगधंदे, शेती, वाहतूक व्यवस्था अशांसारख्या विकासाच्या विविध पैलूंचा विचार येथे केला असून आजवर साधलेल्या प्रगतीवर लक्ष केंद्रित केले आहे. या सर्व प्रगतीमध्ये उणिवा किंवा कमकुवत स्थळे नाहीत असे नव्हे. परंतु तशा चिकित्सक अभ्यासाचा येथे प्रयत्न नाही. १९६१ साली ३ कोटी ९६ लाख लोकसंख्या असणाऱ्या व आज १९८५ साली अंदाजे साडेसहा कोटी लोकसंख्या असलेल्या आपल्या राज्याच्या आर्थिक प्रगतीचे फक्त ठळक टप्पे येथे नोंदले आहेत.

**स्वतंत्र महाराष्ट्राची सुरुवात**

स्वतंत्र महाराष्ट्र राज्याची निर्मिती होत असताना कच्छ, सौराष्ट्र, गुजरात हे वेगळे झाले. दक्षिणेकडील चार जिल्हे कर्नाटकास जोडले गेले व पश्चिम महाराष्ट्राच्या बरोबरीने मराठवाडा व विदर्भ जोडून अखंड महाराष्ट्र राज्य बनले.

१९६० साली देशात पहिल्या दोन पंचवार्षिक योजना पुऱ्या होत आल्या होत्या. शेती व उद्योगधंद्यांमध्ये मोठी गुंतवणूक होत होती. पण वाढत्या किंमती, वस्तूंची टंचाई, अस्थिरता यांचे धक्के देशास बसत होते. राज्यापुरता विचार केल्यास असे दिसते की महाराष्ट्राचा विकास त्या काळी बराचसा एकांगी होता. विकासाचे कागदोपत्री दिसणारे चित्र मुंबई शहराची तुलनात्मक भरभराट असल्याने अधिक उजळ वाटत होते. राज्यातील बहुतेक शेती लहरी पावसावर अवलंबून असणारी पोटभरू शेती होती. औद्योगिक नकाशावर पश्चिम महाराष्ट्रातील मूठभर गावे वगळता इतर भाग कोरेच होते. वेगवेगळ्या सामाजिक, आर्थिक, राजकीय व नैसर्गिक परिस्थितीत राहिल्यामुळे शेतीच्या पद्धती किंवा स्थानिक उद्योगांच्या पद्धतीही राज्यात भिन्न होत्या. किंबहुना पश्चिम महाराष्ट्र, विदर्भ व मराठवाडा यांच्यात प्रादेशिक एकतानता परंतु काही प्रमाणात सांस्कृतिक व आर्थिक भिन्नता अशी परिस्थिती होती. स्वतंत्र महाराष्ट्र राज्याला नुसता विकास साधायचा नव्हता तर विकासाचा आत्मविश्वास वाढून आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक सामंजस्य साधायचे होते. आज पंचवीस वर्षांनंतर मागे वळून पाहता ही अपेक्षा कितपत साध्य झाली हे तपासणे उद्‌बोधक ठरते.

विकास साधला जात असताना स्थैर्य व सातत्य या दोन गुणांना महत्त्व असते व ते साध्य करण्यासाठी विस्तृत व पक्क्या पायावर विकासाची इमारत उभी असावी लागते. त्या दृष्टीने १९६० मधील केवळ अन्नधान्य व ऊस यांवर उभा असलेला शेतीचा डोलारा किंवा कापड उद्योग, खाद्यवस्तू व छोटी यंत्रे यांच्या पायावर उभा असलेला उद्योगधंद्यांचा मनोरा हे चित्र तुलनेसाठी विचारात घ्यावे लागते. संपर्क माध्यमे, जिल्हा व ग्रामीण रस्ते, वृत्तपत्रे, आकाशवाणी, शाळा-महाविद्यालये या सर्वांच्या त्या काळातील अपुऱ्या सोयी पाहता राज्यातील वास्तव विकासासाठी सत्र



शेतीला अधिक पाणीपुरवठा करण्यासाठी शासनाने अनेक धरण योजना हाती घेतल्या आहेत



समावेशक प्रयत्नांची किती मोठ्या प्रमाणात गरज होती ते पटू लागते.

आर्थिक कार्यक्रमांमध्ये वास्तव व समतोल विकासाचे भान हवे हे आणखी एका मुद्यावरून स्पष्ट करता येईल. राज्यातील वनांमधून अधिक उत्पादनाचे प्रयत्न व्हावेत हे कोणी नाकारीत नाही. परंतु वनांमधून उत्पादन होत असताना वनांची नवीन लागवडही केली जावी, त्या लागवडीद्वारे पर्यावरणाचा समतोल राखला जावा व त्याचबरोबर तेथील स्थानिक जनतेच्या आर्थिक व सांस्कृतिक मूल्यांची जपणूक व्हावी, त्यांनी विकासात सहभागी व्हावे आणि विकासाची फळे त्यांनाही मिळावीत या सर्व बाजूंकडे लक्ष द्यायला हवे. राज्याच्या विकास कार्यक्रमांची तपासणी करताना असा विकासाचा दृष्टिकोन बाळगणे गरजेचे ठरेल.

आकडेवारीच्या अभावी विकासाच्या सर्व निकषांकडे लक्ष देता येणार नाही. परंतु विकासाच्या प्रयत्नांमधील काही वैशिष्टचपूर्ण टप्पे व कार्यक्रम तपासणे गरजेचे ठरणार आहे.

**शेतीविकास**

महाराष्ट्रात प्रामुख्याने जिराईत शेती होते. लागवडीखालील एकूण शेतजमिनीपैकी फक्त १३ टक्के जमीन ओलिताखाली आहे व आणखी फक्त १० टक्के जमिनीस निश्चित पाणीपुरवठा होतो. बाकी सर्व शेती कोरडवाहू आहे. ज्वारी, गहू, तांदूळ, बाजरी, मका ही तृणधान्ये; डाळी, तूर ही कडधान्ये; ऊस, कापूस, तंबाखू, मिरची, भाजीपाला ही नगदी पिके; भुईमूग, तीळ, जवस, एरंडी, करडी, मोहरी ही गळिताची पिके महाराष्ट्रात होतात.

गेल्या पंचवीस वर्षांत महाराष्ट्रातील शेतीचे चित्र पुष्कळ प्रमाणात पालटलेले दिसते. ऊस, कागदी लिंबे, फळे, भाजीपाला, तंबाखू, कांदे, बटाटे यांच्या उत्पादनात वेगाने वाढ झालेली आहे. जलसिंचनाच्या सोयीमुळे हे शक्य झाले आहे. परंतु त्याचबरोबर शेतीतील उपयुक्त संशोधन, खतांचा वापर, यांत्रिकीकरण, शेतकऱ्यांना मार्गदर्शन करणाऱ्या अनेक विस्तार योजना या सर्वांमुळे हे शक्य झाले आहे. अन्नधान्याच्या बाबतीत राज्यातील शेती अजूनही तूट दाखवत आहे. १९६०–६१ साली राज्यात ३३ लाख टन अन्नधान्याचे उत्पादन झाले. आज ते वाढून १०० लाख टनांच्या वर गेले आहे. परंतु वारंवार उद्‌भवणाऱ्या दुष्काळी परिस्थितीमुळे त्यात चढउतार दिसतो.

संत्री, द्राक्षे, केळी, कांदा, तंबाखू, हळद, भुईमूग, नारळ अशी पिके राज्याच्या बाहेरही दूरपर्यंत विकली जातात. अपुऱ्या व अनियमित पावसामुळे, मध्यम प्रतीच्या जमिनीमुळे व शेताच्या लहान आकारामुळे मध्य व दक्षिण महाराष्ट्रातील शेती अन्नधान्याऐवजी फळांच्या उत्पादनाकडे वळत आहे. किंबहुना फळांची लागवड, दूधदुभत्याचा किंवा कुक्कुटपालनाचा जोडधंदा यामुळे शेतीचे पारंपरिक चित्र बदलून गेले आहे.

पशुसंवर्धन कार्यक्रम, मिश्र जातींच्या पशूंची पैदास व पशुसुधार कार्यक्रमांना शासनाने दिलेल्या सवलती आणि शासनाने ह्या बाबतीत स्वतः घेतलेला पुढाकार यामुळे हा व्यवसाय राज्यात स्थिरावला आहे. १९६०–६१ साली राज्यात एकूण १ कोटी पशुधन होते ते आज ३ कोटींपर्यंत पोचले आहे.

कृषि संशोधन व विस्तार कार्यक्रम यांना कृषि विद्यापीठांनी हातभार लावला आहे. राहुरी, अकोला, परभणी व दापोली येथे कृषि विद्यापीठे आहेत व त्यांना एकूण २५ महाविद्यालये संलग्न आहेत. शिवाय शेतीशाळा व ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रेही आहेत. कापूस, कडधान्ये, कोरडवाहू पिके, द्राक्षे, मत्स्यव्यवसाय, दुग्धव्यवसाय या शाखांमधील संशोधन व्यवहारात उपयुक्त ठरले आहे. करडी, मका, ज्वारी यांवर खाजगी क्षेत्रातही बहुमोल संशोधन झाले आहे.

राज्यातील मत्स्यव्यवसाय हा देशात दुसऱ्या क्रमांकाचा आहे. एकूण मत्स्योत्पादनापैकी फक्त १० टक्के गोड्या पाण्यातून मिळते व ९० टक्के खाऱ्या पाण्यातून मिळते. १९६०–६१ साली असणारे वार्षिक सुमारे १ लाख टन माशांचे उत्पादन आज ३.५ लाख टनांपर्यंत गेले आहे. आज राज्यात सुमारे १००० सहकारी मत्स्यव्यवसाय संस्था आहेत. पंचवीस वर्षांपूर्वी त्या १५८ होत्या. आज राज्यात नऊ मत्स्यव्यवसाय शिक्षणसंस्था आहेत. पूर्वी





पारंपरिक पद्धतीने शेतीची मशागत

पाणी पुरवठ्यामुळे उसामारखी नगदी पिके घेणे शक्य झाले आहे



द्राक्षाच्या
उत्पादनातही
महाराष्ट्र
अग्रेसर आहे



त्या फक्त सहा होत्या.

शेतीमधील संस्थात्मक सुधारणांच्या दृष्टीने राज्यातील कूळकायदे व शेतीसुधार कायदे महत्त्वाचे ठरतात. कसेल त्याची जमीन हा कायदा दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळात अस्तित्वात आला. १९६२ साली कमाल जमीनधारणा कायदा संमत झाला. १९७५ साली कमाल जमीनधारणा पातळी कमी करण्यात आली. गेल्या पाव शतकाच्या काळात सुमारे १ लाख कुळांना जमिनीचे मालकी हक्क प्राप्त झाले आहेत. कमाल जमीनधारणा कायद्याने प्राप्त झालेल्या अतिरिक्त जमिनीपैकी १.८५ लाख हेक्टर जमीन भूमिहीन शेतकऱ्यांना वाटून झाली आहे. आदिवासींच्या हातून जमिनी वळकावल्या जाऊ नयेत म्हणून १९७४ मध्ये विशेष कायदा संमत करण्यात आला. अतिरिक्त जमिनीचे वाटप होत असताना दलित मजुरांना प्राधान्य देण्यात येते.

दुग्धव्यवसायाचा विकास होऊन धवलक्रांती घडून येणे ही शेती विकासातील एक उल्लेखनीय घटना. १९७१ नंतर हा प्रकल्प राबविला गेला. १९७८ मध्ये याचा दुसरा टप्पा सुरू झाला. १९६१ साली सरकारी दूध योजना नगण्य स्वरूपाची होती. आज राज्यात ३० ठिकाणी सरकारी दूध योजना काम करीत आहे. त्यामार्फत रोज सुमारे ३० लाख लिटर दुधाची विक्री होते. १९६१ साली राज्यात फक्त ४५० सहकारी दूधविक्री संस्था होत्या. आज त्यांची संख्या ९००० वर गेली आहे. दुधावर प्रक्रिया करून लोणी, तूप, चीज असे पदार्थ तयार करून विकणे ही गोष्टही सरकारी व सहकारी दूध योजनांनी साध्य केली आहे.

शेतमालावर प्रक्रिया करणे, शेतमालाची विक्री, भात सडणे, सरकी काढणे, तेल गाळणे, मालाची साठवण, साखरेचे उत्पादन, मालाची ने-आण या सर्व बाबतीत गेल्या पंचवीस वर्षांत उलाढाल वाढली आहे. त्यातही या सर्व क्रिया प्रामुख्याने सहकारी क्षेत्रात घडत आहेत हे विशेष होय. वस्तूंचा दर्जा उच्च राखणे, त्यांची योग्य प्रतवारी करणे, विक्रीसाठी आवश्यक त्या माहितीची सतत सोय करणे, भेसळीचे गुन्हे शोधून काढणे अशा बाजूंनी ग्राहकाचे हित जपण्याचे प्रयत्न कसोशीने केले जातात. ज्वारी, भात, गहू, कापूस, कांदा यांच्या आधारभूत किमतीच्या खरेदीने उत्पादकांनाही रास्त दाम मिळण्यास मदत झाली आहे.

**जलसिंचन**

पाटबंधारे योजनांच्या दृष्टीने महाराष्ट्र फारसा सुदैवी नाही असेच म्हणावे लागेल. १९६०–६१ साली राज्यातील एकूण लागवडीखालील क्षेत्राच्या फक्त ६.५ टक्केच जमीन ओलिताखाली होती. विहिरी व कालव्यांच्या पाण्याचा वापर वाढल्याने आज हे प्रमाण १३ टक्क्यांपर्यंत वाढलेले दिसते. लागवडीखालील आणखी १० टक्के क्षेत्राला निश्चित व समाधानकारक पाणीपुरवठा विशेषतः पावसामुळे होतो. उरलेले सर्व क्षेत्र म्हणजे सुमारे ७७ टक्के क्षेत्र अपुऱ्या व अनिश्चित पावसाचे किंवा अवर्षणप्रवण म्हणता येईल. आजही पाटबंधाऱ्यांची कितीही प्रगती दिसत असली तरी एकूण क्षेत्रापैकी सुमारे ५८ टक्के क्षेत्र विहिरींमुळेच भिजते.

राज्यात बारमाही नद्या नसल्याने पाटबंधारे योजनांच्या प्रगतीवर स्वाभाविक मर्यादा पडतात. भरपूर पावसाच्या क्षेत्रातील म्हणजे कोकणातील नद्या पश्चिमवाहिनी असल्याने मध्य व पूर्व महाराष्ट्रातील दुष्काळी भागांच्या दृष्टीने त्यांचा उपयोगच नाही व दुष्काळी प्रदेशातील बहुतांशी मैदानी वा सपाट प्रदेशामुळे जलसिंचन योजना पुऱ्या करताना अधिक खर्च येतो.

१९६२ मध्ये कै. स. गो. बर्वे यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या पाटबंधारे आयोगाने राज्याची सिंचनक्षमता ५३ लाख हेक्टर जमिनीची आहे असे नमूद केले होते. तर त्या वर्षी फक्त सुमारे ४ लाख हेक्टर जमिनीस सिंचन व्यवस्था उपलब्ध होती. आजमितीस ही सिंचन व्यवस्था सुमारे २३ लाख हेक्टरपर्यंत वाढली आहे. ही वाढ मोठ्या, मध्यम, लघु पाटबंधारे योजना व स्थानिक लघु पाटबंधारे योजना आणि उपसा जलसिंचन योजना यांच्याद्वारे घडून आलेली आहे. जागतिक बँकेच्या वतीने राज्यातील अपेक्षित सिंचनक्षमतेचे मापन १९७९ साली पुनः एकदा घेतले होते. त्यांच्या मतानुसार तर ही क्षमता ६२ लाख हेक्टरची आहे. परंतु या सुधारित अंदाजामध्येही काही प्रमाणात बदल होण्याची शक्यता आहे.





*महाराष्ट्रातील अनेक शेतकरी आता शेतीच्या मशागतीसाठी ट्रॅक्टरसारख्या यंत्रांचा व फवारणी उपकरणासारख्या सुधारलेल्या अवजारांचा उपयोग करू लागले आहेत*



पाटबंधारे योजना राबवत असताना फक्त धरण बांधून अथवा कालवे काढून भागत नाही तर धरणाच्या लाभक्षेत्राच्या विकासासाठी एकत्रित प्रयत्न करावे लागतात ही गोष्ट सुमारे १० वर्षांपूर्वी ओळखली गेली व त्यासाठी राज्यात ठिकठिकाणी ८ लाभक्षेत्र विकास प्राधिकरणांची स्थापना करण्यात आली. येथे विकासाचे कार्यक्रम अधिक सुसूत्र पद्धतीने राबविले जातात. जमीन आणि पाण्याच्या योग्य वापराचे शिक्षण देण्यासाठी औरंगाबाद येथे १९८१ साली जल व भूमि व्यवस्थापन संस्थेची स्थापना करण्यात आली.

राज्यात आतापर्यंत २० मोठे प्रकल्प व सुमारे १०० मध्यम प्रकल्प पूर्ण झाले असून आणखी सुमारे १०० लहानमोठे प्रकल्प प्रगतीच्या निरनिराळ्या टप्प्यांमध्ये आहेत. उजनी, जायकवाडी, चासकमान, धोम, सूर्या, इटियाडोह, कोयना, कुकडी, ऊर्ध्व गोदावरी, पवना इत्यादी पाटबंधारे प्रकल्प महाराष्ट्राचे गौरवस्थान बनले आहेत.

वारंवार पडणारे दुष्काळ, पिण्याच्या पाण्याची कमतरता या प्रश्नांची सोडवणूक करणे हाही जलसिंचन प्रकल्पाचा सध्या अविभाज्य भाग बनला आहे. हाताशी असलेल्या जलसिंचन सोयींचा नियोजनशून्य वापर व जंगलतोडीमुळे सुरू झालेले दुष्काळाचे दुष्टचक्र, अपुऱ्या व अकाली पावसाचा फेरा आणि बागायती पिकांद्वारे पाण्याची नासाडी यामुळे गेल्या २-३ वर्षांत अभूतपूर्व अशा समस्या उभ्या राहिल्या आहेत. विहिरींची दुरुस्ती, नवीन विहिरी खोदणे, तात्पुरत्या नळयोजना आखणे, कूपनलिका खोदणे व शक्य तेथे पाणी अडवून जिरवणे अशा भगीरथ प्रयत्नांनी दुष्काळावर मात करण्याचे प्रयत्न चालू आहेत.

**उद्योगधंदे**

स्वतंत्र महाराष्ट्राच्या निर्मितीच्या वेळी देशात हे राज्य औद्योगिक विकासाच्या दृष्टीने आघाडीवर होते आणि गेल्या पंचवीस वर्षांच्या विकासाच्या वाटचालीत महाराष्ट्राने ही आघाडी कायम राखली आहे. राज्यातील सुती कापड उद्योगाला तर





*रत्नागिरीचा आंबा व नागपूरची संत्री देशातच नाही तर विदेशातही प्रसिद्ध आहेत*



*कुक्कुटपालन हा शेतकऱ्यांचा महत्त्वाचा जोडधंदा झाला आहे*



उसाच्या भरघोस पिकाने आनंदित झालेला शेतकरी



महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची अहमदनगर येथील औद्योगिक वसाहत



एक शतकाहून अधिक काळाची परंपरा आहे. त्याबरोबरीनेच यंत्रसामग्री, धातुउद्योग, काच, कागद असे कारखाने राज्यात स्थिरावले. कारखानदारी उद्योगातील मूल्यवाढ व कारखानदारी रोजगारातील वाटा १९६० साली राज्यात देशाच्या अनुक्रमे २५ टक्के व १८ टक्के होता. आजही इतक्या वर्षांनी जवळपास हेच प्रमाण महाराष्ट्राने कायम राखले आहे. विकासातील हे सातत्य ही राज्याची जमेची बाजू आहे.

राज्यातील औद्योगिक प्रगतीचा केंद्रबिंदू १९६० मध्ये मुंबई-ठाणे-पुणे या पट्ट्यातच होता. परंतु इतर जिल्ह्यांमध्ये वेगाने निघणाऱ्या कारखान्यांमुळे हा केंद्रबिंदू सरकला आहे. वर नमूद केलेल्या तीन जिल्ह्यांचा एकूण औद्यौगिक रोजगारात दहा वर्षांपूर्वी ७८ टक्के वाटा होता तो आता ६३ टक्क्यांपर्यंत खाली आला आहे.

राज्यातील वेगवान औद्योगिकीकरणाचा आणखी एक निकष दाखविता येईल. राज्याच्या औद्योगिक उत्पादनाची संरचना बदलत आहे. १९६०–६१ च्या सुमारास राज्यात खाद्य वस्तू, सुती कापड अशा वस्तूंचे प्राबल्य होते. आज मात्र यंत्रे, अवजारे, सुटे भाग, रसायने, पेट्रोलियम उत्पादने, परिवहन सामग्री, दुचाकी वाहने अशा भांडवली वस्तूंचे उत्पादनात प्राबल्य दिसते. औद्योगिकीकरणाचा पाया विस्तृत व सखोल झाला आहे. उत्पादनात विविधीकरण साधले गेले आहे असेच यावरून दिसते. औद्योगिक प्रगतीमध्ये नवीन गुंतवणूक, कारखान्यांची उभारणी, संशोधन व विकास यासाठी खाजगी क्षेत्रांनी घेतलेला पुढाकार हे राज्यातील औद्योगिकीकरणाचे आगळे वैशिष्टच आहे.

राज्यातील उद्योगांनी देशात सर्वांत अधिक प्रमाणात औद्योगिक परवाने मिळविले आहेत. गेल्या दहा वर्षांत नवीन औद्योगिक परवान्यांपैकी २२ टक्क्यांहून जास्त महाराष्ट्राच्या वाट्याला आले आहेत.

मोठ्या व मध्यम उद्योगांच्या बरोबरीनेच औद्योगिक प्रगतीत लघुउद्योगांचा सहभाग लक्षणीय आहे. १९६१ साली राज्यात फक्त ४,६८० लघुउद्योग होते, आता त्यांची संख्या ८०,००० च्या वर गेली आहे. एकूण रोजगारात आज त्यांचा १८.५ टक्के वाटा आहे तर एकूण उत्पादनात त्यांचा वाटा १९ टक्के आहे. यंत्रांचे सुटे भाग, औजारे, वाहतूक सेवा, रबर, प्लॅस्टिक या उद्योगामधील उत्पादनाचा मोठा भाग आता लघुउद्योग क्षेत्रातून बाहेर पडतो. मोठ्या उद्योगांना मदत करणे, उद्योगांच्या विकेंद्रीकरणास मदत करणे, स्वयंरोजगाराची संधी देणे या गोष्टी लघुउद्योग क्षेत्राने पुरविल्या आहेत.

नवीन उद्योगधंदे आणि तंत्रज्ञानाचा विकास, मागासलेल्या भागात नवीन उद्योगधंदे, छोटे उद्योग व कुटिरोद्योग यावर भर आणि स्वयंरोजगाराचे विशेष प्रयत्न ही राज्यातील औद्योगिक धोरणाची वैशिष्टये राहिली आहेत. रस्ते, वाहतूक, विकाससोयी हे पुरवित असतानाच औद्योगिक वाढीसाठी विकास क्षेत्रे निवडून त्या त्या ठिकाणी लक्ष केंद्रित करावयाचे असा शासनाचा प्रयत्न गेल्या काही वर्षांत राहिला आहे. जलद विकासासाठी आवश्यक त्या भांडवली गरजा, कर्जपुरवठा, सल्लामसलत हे पुरविण्यासाठी महाराष्ट्र शासनाने अनेक विशेषीकृत विकास संस्थांची स्थापना केली. या संस्थांनी राज्याचे औद्योगिक चित्र बदलण्यासाठी प्रयत्न केले.

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची (MIDC) स्थापना १९६२ मध्ये झाली. कारखान्यांसाठी विकसित भूखंड पुरविणे, रस्ते, पाणी, बँका, पोस्ट, टेलिफोन, टेलेक्स, पोलीस, इस्पितळे, निवास अशा सर्व पायाभूत सोयी पुरविणे हे या संस्थेचे प्रमुख काम आहे. महामंडळाच्या एकूण ६८ औद्योगिक वसाहतींपैकी ५२ वसाहती विकसनशील भागात आहेत. सिकॉमतर्फे (स्थापना १९६६) अविकसित भागातील उद्योगधंद्यांना प्रोत्साहन देणाऱ्या अनेक योजना राबवल्या जातात. त्यात प्रकल्प उभारणीपूर्वीचे सहाय्य, विक्रीकरातील सवलती, दीर्घ मुदतीचे कर्ज, बीजभांडवलाचा पुरवठा अशा सवलती आहेत. महावित्ततर्फे (स्थापना १९६२) स्थिर जिंदगीसाठी दीर्घकालीन कर्ज दिले जाते. परंतु अविकसित भागांमध्ये सुशिक्षित बेकारांना प्राधान्य आणि सवलती आहेत. १९६२ मध्येच स्थापन झालेल्या लघुउद्योग



विकास महामंडळाने लघुउद्योगांना कच्चा मालपुरवठा व त्यांच्या उत्पादनाच्या विक्रीची व्यवस्था अशी जबाबदारी उचलली आहे. कोकण, पश्चिम महाराष्ट्र, मराठवाडा व विदर्भ या चार विभागीय विकास महामंडळांनी उद्योगधंद्यांच्या सवलतींमध्ये सुसूत्रता आणण्याची जबाबदारी उचलली आहे. नवीन उद्योग स्थापन करताना मार्गदर्शन करण्यासाठी सर्व जिल्ह्यांमध्ये १९७८ नंतर जिल्हा औद्योगिक केंद्रांची स्थापना करण्यात आली. नवीन उद्योगांचा विकास व रोजगारनिर्मिती यांसाठी केंद्र सरकारच्या ज्या योजना आहेत त्याही राबविण्याची जबाबदारी राज्य सरकारवर आहे.

विविध औद्योगिक उपक्रमांना सहाय्य देत असताना शासनाने स्वतःचेही काही औद्योगिक उपक्रम सार्वजनिक क्षेत्रात सुरू केले आहेत. यामध्येही विकासाचा समतोल, अविकसित भागास सहाय्य व विकासासाठी पायाभूत सोयींचा पुरवठा करणे असा दृष्टिकोन आहे. यात मुंबई, नाशिक येथे नियोजित शहरांचा विकास करणारी सिडकोसारखी संस्था, आजारी गिरण्यांची व्यवस्था पाहणारी महावस्त्र ही संस्था, दूध व इतर शेतकी उत्पादने विकणारी मॅफकोसारखी संस्था, गृहनिर्माण प्राधिकरण यांची नावे प्रामुख्याने येतात.

**वीजपुरवठा**

उद्योगधंद्यांमधील महाराष्ट्राचा पहिला क्रमांक ज्या अनेक घटकांमुळे शक्य झाला त्यात वीजपुरवठा हाही घटक आहे. विजेच्या एकूण वापरामध्ये उद्योगधंद्यांसाठी वापर, शेतीसाठी वापर व घरगुती वापर असे तीन भाग करता येतील. महाराष्ट्रात १९६१ साली एकूण वीज वापरात उद्योगाचा वाटा सुमारे ७५ टक्के होता. गेल्या पंचवीस वर्षांत वीजनिर्मिती व वापरात पुष्कळ वाढ झालेली असली तरी शेतीमधील जलसिंचनासाठी असलेला विजेचा वापर टक्केवारीने वाढला आहे. राज्यात घडून येत असलेल्या शेतकी क्रांतीचाच तो एक भाग आहे. आज हाताशी असलेल्या आकडेवारीनुसार राज्यात औद्योगिक कारणांसाठी ६२ टक्के, जलसिंचनासाठी १६ टक्के व घरगुती आणि इतर कामांसाठी २२ टक्के असा विजेचा वापर होत आहे.

राज्याची भौगोलिक रचना पाहता जलविद्युत निर्माण करण्यासाठी राज्यात फार अनुकूल परिस्थिती नाही. किंबहुना मध्य महाराष्ट्र, विदर्भ, मराठवाडा या विभागांमध्ये या मार्गाने वीज निर्माण करण्यावर मर्यादाच पडतात. याउलट राज्यातील दगडी कोळशाच्या साठ्यांमुळे औष्णिक वीजनिर्मितीस भरपूर वाव आहे. महाराष्ट्र राज्य वीजमंडळाची स्थापना १९६० मध्ये झाली. वीजनिर्मिती, वहन व वितरण ही कामे वीजमंडळातर्फे होऊ लागली. मूलभूत विकाससाधने सामाजिक मालकीची ठेवण्याचा एक भाग म्हणून गेल्या पंचवीस वर्षांत शासनाने राज्यातील बहुतेक खाजगी वीज कंपन्या ताब्यात घेऊन त्यांचा कारभार वीजमंडळाकडे सुपूर्द केला आहे.

पंचवीस वर्षांपूर्वी राज्यात अणुजन्य व नैसर्गिक वायूवर आधारित वीजनिर्मितीचे प्रमाण नगण्यच होते. परंतु आज एकूण वीज उत्पादनात या दोन मार्गांनी अनुक्रमे ३ टक्के व ५ टक्के वीज निर्माण होते. अर्थातच वीजनिर्मितीचा मुख्य भार औष्णिक (६४ टक्के) व जलविद्युत (२८ टक्के) यांनी उचलला आहे.

जलजन्य किंवा औष्णिक विजेच्या अनेक नव्या केंद्रांची उभारणी तसेच चालू केंद्रांचा टप्प्याटप्प्याने विस्तार हे धोरण गेल्या काही वर्षांत राबविले गेले. जायकवाडी, मुळा, उजनी, कोयना, वैतरणा, खडकवासला, पवना, तिल्लारी येथे जलविद्युतनिर्मिती, एकलहरे, परळी वैजनाथ, भुसावळ, चंद्रपूर, खापरखेडा, कोराडी येथे औष्णिक वीजनिर्मिती, तारापूर येथे अणुवीज तर उरण येथे नैसर्गिक वायूपासून वीजनिर्मिती यांचा उल्लेख आवश्यक ठरेल. आंतरराज्यीय वीजनिर्मिती प्रकल्पांमध्ये नर्मदा प्रकल्प, भोपालपट्टण, इंचमपल्ली व पेंच प्रकल्पांचा समावेश होईल.

वीजनिर्मितीचे यश खेड्यांच्या विद्युतीकरणावरूनही मोजता येईल. १९६१ साली राज्यात फक्त ८५३ खेड्यांपर्यंत वीज पोहोचली होती व फक्त ६,६९५ पंप विजेवर चालणारे होते. आज सुमारे ३२,००० खेड्यांमध्ये वीज पोहोचली आहे (एकूणपैकी

*वीज उत्पादनात महाराष्ट्र अग्रेसर आहे*



आर्थिक विकासासाठी पूल व रस्ते ही
दळणवळणाची साधने आवश्यक असतात

माल वाहतूक व्यवसायाला अतिशय महत्त्व प्राप्त झाले आहे



सुमारे ८५ टक्के) व ८ लाख पंप आज विजेवर चालतात.

**वाहतूक–दळणवळण**

वाहतूक व्यवस्थेमुळे प्रवासी व मालाची ने-आण शक्य होते. कोळसा, खनिजे, कापूस असा कच्चा माल किंवा धान्य, साखर अशा शेतीवर आधारित वस्तू किंवा रसायने, कापड अशी उत्पादने किंवा बाजारात रवाना होणारा तयार माल अशा सर्वांना वाहतूक माध्यमामार्फत जावे लागते. दळणवळण व संपर्क व्यवस्थेमुळे वृत्त, माहिती, संदेश यांची देवाणघेवाण होते. संपर्क व्यवस्थेमध्ये टपाल, तार, दूरध्वनी, टेलेक्स, दूरदर्शन, आकाशवाणी अशा माध्यमांचा व त्याचबरोबर वृत्तपत्रे, नियतकालिके, चित्रपट यांचा समावेश होतो. वाहतूक साधनांमध्ये लोहमार्ग, रस्ते, अंतर्गत व किनारा जलवाहतूक हे महाराष्ट्राच्या दृष्टीने विचारात घ्यावे लागतात. वरील दोन्ही माध्यमांमुळे धंदा, व्यापार, शेती व औद्योगिक विकास तसेच कायदा व सुव्यवस्थेचे पालन आणि साक्षरतेतील सुधारणा राज्यात शक्य झाल्या आहेत.

१९६० मध्ये राज्यात ५,१६१ कि.मी. लांबीचे लोहमार्ग होते. देशातील त्या वेळच्या लोहमार्गांशी हे प्रमाण ८.९ टक्के होते. आज स्वतंत्र महाराष्ट्राच्या प्रगतीचा पंचवीस वर्षांचा टप्पा लक्षात घेता राज्यातील लोहमार्ग ५,२९७ कि.मी.पर्यंत वाढलेले दिसतात. देशातील एकूण लोहमार्गांशी आज हे प्रमाण किंचितसे उतरून ते ८.६ टक्क्यांवर आले आहे. लोहमार्गांच्या विकासामध्ये नवीन लोहमार्ग बांधणे हा एक भाग असतो. पण त्याचबरोबर वेगवान व अखंड वाहतुकीच्या दृष्टीने लोहमार्गांचे रुंदीकरण, वाहतुकीची कोंडी टाळण्यासाठी लोहमार्गांचे दुहेरीकरण व वाहतुकीचा वेग आणि क्षमता वाढण्यासाठी डिझेल व विजेचा वापर याही गोष्टी महत्त्वाच्या ठरतात. राज्यात लोहमार्गांच्या विकासामध्ये वरील तिन्ही बाबतींत कमी अधिक यश प्राप्त झाले आहे. नवीन रेल्वे बांधणी व रुंदीकरण यांचे प्रचंड खर्च व रेल्वे विकासासाठी ध्यानात घेतले जाणारे राष्ट्रीय अग्रक्रम यांमुळे विकासाचा वेग काहीसा नरम राहतो हे खरे.

राज्यातील लोहमार्गांचा विकास थोडासा असमतोल आहे. मुंबईहून दिल्ली, मद्रास व कलकत्ता यांना जोडणारे ब्रॉडगेज मार्ग, मराठवाड्यातून जाणारा मनमाड-नांदेड असा मीटरगेज मार्ग, व मिरज-पंढरपूर-लातूर असा नॅरोगेज मार्ग हे राज्यातील प्रमुख लोहमार्ग. यांना पूरक म्हणून लहान-मोठे अनेक लोहमार्ग आहेत. गेल्या पंचवीस वर्षांत राज्यात विविध मार्गांनी या सेवेचा विकास झाला. मराठवाड्यातील हिंगोलीपर्यंत टाकल्या गेलेल्या नव्या मीटरगेज मार्गाने देशात मीटरगेज लोहमार्ग अखंडपणे साधला गेला. उमरेड ते बुटीबोरी या नव्या ब्रॉडगेज लोहमार्गाने कोळसा व खनिजांच्या वाहतुकीस चालना मिळाली. कोकण या पश्चिम किनारा रेल्वेचा भाग म्हणून दिवापासून रोहा नंतर उरणपर्यंत ब्रॉडगेज लोहमार्ग टाकला गेला आहे. मुंबईवरील ताण कमी करण्याच्या दृष्टीने वसई-डोंबिवली ब्रॉडगेज मार्गाची उभारणी पुरी होत आली आहे. लोहमार्ग रुंदीकरणामध्ये १९७१ साली पुरे झालेले पुणे-मिरज-कोल्हापूर या मीटरगेजचे रुंदीकरण लक्षणीय ठरते. मनमाड-नांदेड या मीटरगेजच्या रुंदीकरणाची पावले उचलली गेली आहेत. कुर्ला-चेंबूर व पुणे-दौंड या मार्गांचे दुहेरीकरणही नजिकच्या भूतकाळातीलच कमाई आहे. विद्युतीकरणामध्ये भुसावळ-नागपूर, भुसावळ-इटारसी, नागपूर-इटारसी व वर्धा-बल्लारशा या मार्गांवर काम चालू आहे. नवीन लोहमार्ग बांधणीमध्ये कोकण रेल्वेचा विस्तार, मानखुर्द-बेलापूर लोहमार्ग यांचे काम चालू आहे तर पुणे-मुंबई लोहमार्गावरील घाटामध्ये तिसऱ्या लोहमार्गाचे अवघड काम भारतीय रेल्वेने विक्रमी वेळात पुरे केले आहे.

१९६१ साली महाराष्ट्रात सर्व तऱ्हेचे मिळून ३९,२४१ कि.मी. लांबीचे रस्ते होते. यात राष्ट्रीय महामार्ग, राज्य महामार्ग, जिल्हा रस्ते, ग्रामीण रस्ते, यांचा समावेश आहे. आज पंचवीस वर्षांनंतर राज्यातील एकूण रस्त्यांची लांबी १,०५,००० कि.मी.पर्यंत जाऊन पोहोचली आहे. देशात ही रस्त्यांची लांबी क्षेत्रफळाच्या प्रमाणात सातव्या क्रमांकाची आहे.

सध्याच्या हमरस्त्यांना पूरक ठरणे, रेल्वे बांधणीस पूरक ठरणे




सहकारी बँकांनी ग्रामीण क्षेत्राला पतपुरवठा करण्याची महत्त्वाची कामगिरी बजाविली आहे



व नवनवीन उद्योगधंद्यांना व मागासलेल्या विभागांना चालना देणे या दृष्टीने राज्य सरकारने आणखी ११ रस्त्यांची राष्ट्रीय महामार्ग म्हणून शिफारस केली आहे. यात मराठवाडा, विदर्भ व मध्य महाराष्ट्रातील अनेक नियोजित मार्ग आहेत. रोजगार वाढ, नवे उद्योगधंदे व उद्योगधंद्यांचे विकेंद्रीकरण यांमुळे साध्य होणार आहे.

जलवाहतुकीमध्ये राज्यातील लहान-मोठ्या ४९ बंदरांचा उपयोग केला जातो. बंदरांचा बारमाही उपयोग व्हावा व त्यानुसार किनाऱ्यालगतची प्रवासी व मालवाहतूक वाढावी असे प्रयत्न गेल्या १० वर्षांत केले गेले. त्यासाठी बंदरालगतच्या जमिनीची धूप थांबविणे व बंदरांचा विकास करणे यावर सहाव्या योजनेत एकूण ६ कोटी रुपये खर्च केले गेले. भगवती, रेडी व दिघी या बंदरांचा विकास करण्याचे काम सध्या वेगात चालू आहे.

उद्योगधंदे व व्यापार यांमध्ये देशात महाराष्ट्र आघाडीवर असल्यामुळे अर्थातच टेलेक्स, दूरध्वनी, टपाल-तार अशा संपर्क माध्यमांचा देशातील सर्वांत मोठा हिस्सा राज्याच्या वाटयास आला आहे. १९६१ साली राज्यात फक्त सुमारे ५ लाख रेडिओ परवानेधारक होते तर २५ वर्षांनंतर आज सुमारे २० लाखांपेक्षाही अधिक रेडिओ परवानेधारक आहेत. राज्यात जळगाव, औरंगावाद, सांगली, रत्नागिरी, परभणी ही नभोवाणी केंद्रे नव्याने प्रस्थापित झाली आहेत. १९७२ साली दूरदर्शन सेवा मुंबईत प्रथम सुरू झाली. आज मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक, अहमदनगर, औरंगावाद, सोलापूर अशा अनेक ठिकाणी दूरदर्शन सेवेचा लाभ नव्याने मिळत आहे. यामुळे राज्यातील फार मोठ्या शहरी आणि ग्रामीण लोकसंख्येस वृत्तवितरण, मनोरंजन, क्रीडा, चित्रपट, युवदर्शन अशा कार्यक्रमांचा लाभ मिळत आहे. प्रौढ शिक्षण व दूरशिक्षण अशा शैक्षणिक कामांसाठी या माध्यमाचा वापर करण्याचे प्रगतिशील पाऊल राज्याने नुकतेच उचलले आहे.

१९६० साली राज्यात सर्व भाषांमधील एकूण ६०० दैनिके व नियतकालिके होती. आज त्यांची संख्या चौपटीपेक्षाही वाढून ती २,६०० पर्यंत पोहोचली आहे. वृत्तवितरण, ज्ञानप्रसारण, मतप्रसार तसेच मनोरंजन करीत असताना लोकशाही मूल्ये रुजविणे हे या संपर्क माध्यमांनी साध्य केले आहे. नवनवीन लेखक, कवी, पत्रकार व समीक्षक यांच्या कलागुणांना निश्चितच वाव मिळाला आहे.

**पतपुरवठा**

धंदा, व्यापार किंवा घरगुती गरजा भागविण्यासाठी कर्जपुरवठा ही एक अत्यावश्यक गरज मानली जाते. जशी गरज असेल त्यानुसार हा कर्जपुरवठा अल्पकालासाठी किंवा दीर्घकालासाठीही असू शकतो. कोठे कर्जफेड एकरकमी केली जाते तर कोठे ती हप्त्याने केली जाते. मित्र, नातेवाईक, व्यावसायिक, सहकारी व सावकार यांच्याकडून कर्जपुरवठा होऊ शकतो. तसाच तो व्यापारी बँका व सहकारी बँका यांच्यामार्फतही होत असतो.

ग्रामीण भागात शेतीसाठी कर्जपुरवठा विनासायास, विनातारण व सवलतीने व्हावा आणि त्या कर्जफेडीची मालविक्रीतून आपोआप सोय व्हावी यासाठी सहकारी यंत्रणा राबविण्याची शिफारस अखिल भारतीय ग्रामीण पतपुरवठा सर्वेक्षणाने १९५५ मध्ये केली. त्यानुसार सहकाराचा खेडे, जिल्हा व राज्यपातळीवरील त्रिस्तरीय आकृतिबंध देशात सर्वत्र अमलात येऊ लागला. या यंत्रणेमध्ये रिझर्व्ह बँकेचा म्हणजे पर्यायाने केंद्र सरकारचा प्रत्यक्ष सहभाग सुरू झाला. १९७० पर्यंत म्हणजे स्वतंत्र महाराष्ट्राचे पहिले दशक पाहता सहकारी क्षेत्रास प्राधान्य दिले गेलेले दिसते. अर्थात तो राष्ट्रीय धोरणाचाच एक भाग होता.

राज्यात, खेडेपातळीवर काम करणाऱ्या २१,४०० प्राथमिक शेतकी सहकारी संस्था १९६०–६१ मध्ये होत्या. कमकुवत संस्था बंद पडल्याने व त्यांचे विलीनीकरण घडून आल्याने त्यांची संख्या घटली व आज त्या सुमारे १८,५०० इतक्या आहेत. परंतु त्यांच्या सभासद संख्येत लक्षणीय वाढ आहे. १९६०–६१ मध्ये त्या संस्थांचे राज्यात सुमारे २१.७ लक्ष सभासद होते ते आज ५७.६ लक्ष आहेत. पंचवीस वर्षांपूर्वी निरनिराळ्या सहकारी पत संस्थांनी मिळून एकूण सुमारे २०० कोटी रुपयांचे कर्ज दिले होते.



कापूस हे विदर्भ, मराठवाडा व खानदेश विभागांतील महत्त्वाचे नगदी पीक आहे. कापूस उत्पादकांना रास्त भाव मिळावे म्हणून शासनाने एकाधिकार कापूस खरेदी योजना सुरू केली आहे



आज ते ५,००० कोटी रुपयांच्या घरात गेले आहे. भूतारण बँकांमार्फत दिल्या जाणाऱ्या दीर्घकालीन कर्जातही बरीच वाढ होऊन त्या आपले भूविकास बँका हे नवे नाव सार्थ करीत आहेत.

१९६० मधील व्यापारी बँकांचे चित्र विस्तार व विकासाच्या दृष्टीने प्रतिकूल होते. व्यापारी बँका त्या काळी खाजगी क्षेत्रात होत्या. त्यांच्या शाखा मुख्यतः शहरी भागात होत्या. त्यांचा कर्जव्यवसाय, व्यापार व उद्योगधंदे यांपुरताच मर्यादित होता. त्या वर्षी व्यापारी बँकांच्या राज्यात एकूण फक्त १,१०० शाखा होत्या. बहुतेक व्यापारी बँका या खाजगी औद्योगिक गृहांच्या आश्रयाने किंवा पूर्वीच्या संस्थानिकांच्या आश्रयानेच उभ्या होत्या. अपुरे भांडवल व प्रमाणाबाहेर धोका पत्करण्याच्या प्रवृत्तीमुळे बँकांचे व्यवहार अनिश्चित वाटत. १९६० नंतर स्वतंत्र राज्यात औद्योगिक विकास वेगाने होत राहिला. उद्योगाचे केंद्र मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक या पट्ट्यांतून पूर्व व मध्य महाराष्ट्रातील अविकसित भागात गेले. शासनाने उद्योगधंद्यांना दिलेल्या सवलतींमुळे उद्योगाबरोबर बँकांचीही वाढ झाली. बँकांना तारणावरील कर्जाच्या सावध व्यवहारांची चाकोरी सोडून देऊन विकास प्रक्रियेतील महत्त्वाचा घटक म्हणून नवीन जबाबदारी घ्यावी लागली. १९६९ मध्ये झालेल्या व्यापारी बँकांच्या राष्ट्रीयीकरणाने बँकांवरील या सामाजिक, आर्थिक व विकासविषयक जबाबदारीचे शिक्कामोर्तब केले. १९७० नंतरच्या दशकात सहकारी क्षेत्राची मक्तेदारी कमी होऊन अनेक वित्तीय संस्थांनी निरनिराळ्या कारणांसाठी व निरनिराळ्या पद्धतीने कर्जे घ्यावीत अशी यंत्रणा अमलात आली.

बँकशाखांचा विस्तार विचारात घेता राज्यातील १९६० मधील बँकशाखांची संख्या चौपटीने वाढून आज ती ४,५०० शाखांपर्यंत पोहोचली आहे. धंदा-व्यापारासाठी दिल्या जाणाऱ्या पारंपरिक वित्तव्यवहारांबरोबर शेतीला, लघुव्यवसायाला, स्वयंरोजगाराला कर्ज, भागभांडवलाच्या विक्रीची हमी; संशोधन विकासास कर्जपुरवठा, अविकसित भागांचे सर्वेक्षण करणे, कर्जाच्या उपयोगासाठी सल्लामसलत देणे, सहकारी संस्थांनाही कर्जे देणे असे व्यवहार व्यापारी बँका मोठ्या प्रमाणावर आता करीत आहेत. नागरी विभागातील व्यक्तींना घरबांधणी, वस्तूंची खरेदी अशा दैनंदिन गरजांसाठी नागरी सहकारी बँकांचा मोठा आधार वाटतो. १९६१ साली राज्यात फक्त १४९ नागरी सहकारी बँका होत्या. आज त्यांची संख्या साडेतीनशेच्याही पुढे गेली आहे. त्यांची पूर्वीची ४.३ लाखांची सभासदसंख्या वाढून आज ती २२ लाखांवर गेली आहे.

विकासाचे कितीही प्रयत्न केले तरी मागास जिल्हे बँकसेवेचा पुरेसा फायदा घेऊ शकत नाहीत. त्यासाठी १९७० नंतर रिझर्व्ह बँकेने अग्रणी बँक योजना राबविली. प्रत्येक व्यापारी बँकेने एक एक जिल्हा वाटून घेऊन विकास कार्यक्रमांना गती देण्याच्या या अग्रणी बँक योजनेने राज्यात चांगली प्रगती केली. राज्यातील सर्व जिल्हे चार राष्ट्रीयीकृत व्यापारी बँकांनी वाटून घेतले. तेथे विकास कार्यक्रमाची शक्यता अजमावली व मोठ्या प्रमाणावर शाखा उघडल्या. १९८० नंतर या बँकांच्या विकासकार्याचा दुसरा टप्पा सुरू झाला आहे. शेतमजूर, सीमांत शेतकरी, भूमिहीन शेतमजूर यांच्याही कर्जाच्या गरजांकडे लक्ष पुरविता यावे म्हणून देशात सप्टेंबर १९७५ पासून क्षेत्रीय ग्रामीण बँक योजना राबविली जात आहे. राज्यात प्रथम एकच क्षेत्रीय ग्रामीण बँक मराठवाड्यातील नांदेड जिल्ह्यात सुरू झाली. आज मागे वळून पाहता या बँकांची संख्या सात झाली असून राज्यातील १३ जिल्ह्यांमध्ये मिळून त्यांच्या १३८ शाखा पसरलेल्या दिसतात. लग्नकार्य, प्रवास, औषधोपचार अशा गरजा भागविण्यासाठी क्षेत्रीय ग्रामीण बँकांनी पुढाकार घेतला आहे. समाजातील दुर्बल व कमकुवत गटांतील व्यक्तींना ही मोठीच मदत आहे. सावकाराच्या मगरमिठीतून सुटका करणे व स्थिर विकासासाठी सर्व तऱ्हेचे साह्य पुरविणे अशा गोष्टी यामुळे हळूहळू साध्य झाल्या आहेत.

केंद्र सरकारच्या व राज्य सरकारच्या अनेक वित्तीय संस्थांनी राज्यातील उद्योगधंद्यांच्या व शेतीविकासाच्या योजनांना गेल्या दशकात मोठे साह्य केले आहे. आयुर्विमा महामंडळ, युनिट ट्रस्ट,





ग्रामीण भागातसुद्धा दुग्धव्यवसाय आधुनिक स्वरूपात सुरू झाला आहे



औद्योगिक विकास बँक या राष्ट्रीय पातळीवरील वित्तीय संस्थांच्या साहाय्याचा मोठा वाटा राज्यातील खाजगी क्षेत्राला मिळाला आहे. राज्यात महावित्त, लघुउद्योग, सिकॉम अशा वित्तीय संस्थांनीही आपली जबाबदारी उचलली आहे. मुंबई येथील व आता पुणे येथे नव्याने सुरू झालेल्या शेअर बाजाराने दीर्घकालीन वित्तपुरवठ्याची उलाढाल काही पटींनी वाढविली आहे.

एकात्मिक ग्रामीण विकास, ग्रामीण रोजगार योजनांचे यश आता बँकांशी निगडित करण्यात आले आहे. त्यामुळे वाढता रोजगार, समतोल विकास व दुर्बल घटकांची प्रगती यावर लक्ष केंद्रित करता येईल व गरिबी दूर करण्यास मदतच होईल.

**सहकार**

देशातील सहकारी क्षेत्राची वाटचाल ही आधुनिक भारतातील नेत्रदीपक घटना आहे. सावकारांकडून कर्जदार शेतकऱ्यांची होणारी पिळवणूक थांबावी म्हणून सुमारे शंभर वर्षांपूर्वी ब्रिटिश सरकारने कायदा संमत केला होता. ती भारतातील सहकाराची सुरुवात होती असे म्हणता येईल. सहकारी संस्थांचा पहिला कायदा भारतात १९०४ साली संमत झाला. १९१२, १९१९, १९२५ या वर्षांमध्ये त्यात सुधारणा झाल्या. गेल्या सुमारे ६०-७० वर्षांच्या काळात महाराष्ट्रात नामदार गोखले, तात्यासाहेब केळकर, वैकुंठभाई मेहता, दे. गो. कर्वे, विठ्ठलराव विखे पाटील, धनंजयराव गाडगीळ अशांसारख्या व्यक्तींचे समर्थ नेतृत्व सहकारी चळवळीस लाभले. प्रवरानगर-लोणी येथे सहकारी क्षेत्रातील देशातील पहिला साखर कारखाना १९४८ साली काढण्याचे श्रेयही राज्यास मिळाले. विकासात सर्वांना समान हक्क देणारी, लोकशाही तत्त्वांचे पालन करणारी, दुर्बल घटकांना वरदान असणारी सहकारी चळवळ ही भारतातील गौरवपूर्ण घटना आहे. सहकारी साखर कारखाने, सहकारी बँका, नागरी सहकारी बँका यांच्या रूपाने राज्यातील ही सहकारी चळवळ भारतात आघाडीवर आहे हे विशेष.

स्वतंत्र महाराष्ट्राची गेली पंचवीस वर्षे ध्यानात घेता सहकारी क्षेत्राची घोडदौड स्पष्टपणे नजरेत भरते. १९६० च्या सुमारास






*सहकारी भांडारांनी किंमती आटोक्यात ठेवण्यात यश मिळविले आहे*

*वारणानगरसारख्या ग्रामीण भागातही सहकारी भांडारे लोकप्रिय झाली आहेत*



सहकारी साखर कारखाने ग्रामीण विकासाची केंद्रे झाली आहेत



उद्योगांना चालना देण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने अनेक औद्योगिक वसाहती सुरू केल्या आहेत



महाराष्ट्रात अंदाजे ३०,००० सहकारी संस्था होत्या. त्यामध्ये वेगाने वाढ होऊन आज त्यांची संख्या दुपटीपेक्षाही जास्त म्हणजे अंदाजे ७०,००० पर्यंत पोहोचली आहे. १९६० मध्ये राज्यातील सहकारी संस्था देशातील एकूण संस्थांचा एकदशांश भाग होत्या. परंतु देशाच्या तुलनेने महाराष्ट्रातील सहकारी संस्थांच्या संख्येत अधिक वेगाने वाढ होऊन आज राज्यात देशातील एकूण सहकारी संस्थांपैकी सुमारे १९ टक्के संस्था सामावल्या आहेत असे दिसते. सुरुवातीला सर्व सहकारी संस्थांचे मिळून सुमारे ४० लाख सभासद होते. आज त्यांची संख्या अंदाजे २ कोटींपर्यंत पोहोचली आहे. १९६० च्या सुमारास या संस्थांजवळ असणारे ३३० कोटी रुपयांचे खेळते भांडवल आज ७,००० कोटी रुपयांवर जाऊन पोहोचले आहे.

गेल्या पाव शतकाच्या काळात सहकाराचा आकृतिबंध विस्तृत पायावर विस्तारित झालेला आढळून येतो. १९६० मध्ये एकूण सहकारी संस्थांपैकी सुमारे ६० टक्के वाटा शेतकरी सहकारी पतसंस्था व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका यांचा होता. सहकारी चळवळ म्हणजे शेतकऱ्यांना कर्ज देणारी संस्था एवढेच त्याचे स्वरूप होते. परंतु पुढे हे चित्र बदलले. बँकींगबरोबर उत्पादन, सेवा अशा विविध क्षेत्रांमध्ये सहकाराने शिरकाव केला व आपला ठसा उमटविला. खेड्यातील प्राथमिक सहकारी संस्थांच्या बरोबरीने आज नागरी बँका, पतसंस्था, पणन, साखर उत्पादन, सूत गिरणी, विणकाम, घरबांधणी, डेअरी, औद्योगिक सहकारी बँक, उपसा सिंचन, मच्छीमार, मजूरसेवा, मुद्रण अशा कितीतरी क्षेत्रांमध्ये सहकारी संस्था मोलाचे काम करीत आहेत. शेतकी सहकारी पत संस्थांचे एकुणातील प्रमाण आज कमी होऊन ते २८ टक्क्यांवर आले आहे. राज्यातील सहकारी चळवळीचे विविधीकरण झाले आहे व ती आता अधिक स्थिर पायावर उभी आहे असे यावरून म्हणता येईल. राज्यातील प्रत्येकाचा या ना त्या रूपाने सहकारी संस्थेशी संबंध येतो व संस्थेच्या कामकाजात स्वत: भाग घेण्याची प्रत्येकास संधी मिळते. मग ती पतसंस्था किंवा नागरी सहकारी बँक किंवा घरबांधणी संस्था किंवा इतर कोणतीही संस्था असो. १९७० नंतर व्यापारी बँकांनीही सहकारी बँकांच्या विकासास हातभार लावला आहे. सहकारी क्षेत्रास भांडवल पुरवून, कर व नोंदणी शुल्कात सवलती देऊन शासनानेही या क्षेत्राच्या विकासास अग्रक्रम दिला आहे. सरकारचे अनुकूल धोरण, सबसिडी, तारणाऐवजी व्यक्तीच्या उपक्रमशीलतेवर भर, कर्ज-उत्पादन-विक्री यांची घातलेली सांगड अशा कारणामुळेच सहकारी क्षेत्राने आज एवढी मजल मारली आहे. अशिक्षित निराधार व्यक्ती, समाजातील दुर्बल घटक यांना सहकारी क्षेत्र हे वरदान ठरले आहे.

राज्यातील सहकारी साखर कारखान्यांची वाटचाल हे राज्यातील सहकारी चळवळीतील एक वैभवशाली पर्व आहे. १९६० साली राज्यात फक्त वीस सहकारी साखर कारखाने होते. तर आज त्यांची संख्या चौपटीच्याही वर म्हणजे १०० पर्यंत पोहोचली आहे. त्यांपैकी ६७ कारखान्यांमध्ये प्रत्यक्ष गाळप चालू आहे. या कारखान्यांमध्ये १९६१ साली ४३ कोटी रुपयांचे खेळते भांडवल गुंतले होते. तर आज सुमारे १,००० कोटी रुपयांचे खेळते भांडवल वापरले जात आहे. १९६० साली या कारखान्यांची एकूण गाळप क्षमता दैनिक २०,००० टन ऊस गाळण्याची होती. ती आजरोजी १.४ लाख टन ऊस गाळण्यापर्यंत वाढली आहे. देशातील एकूण सहकारी साखर कारखान्यांपैकी सुमारे ४५ टक्के कारखाने राज्यात वसलेले आहेत. मध्य, दक्षिण व उत्तर महाराष्ट्रातील बहुतेक जिल्ह्यांमध्ये साखर कारखानदारी हा प्रमुख व्यवसाय बनला आहे. उसाच्या लागवडीस चालना देऊन व मोठ्या प्रमाणावर रोजगार निर्माण करून या कारखान्यांनी राज्याचे आर्थिक आणि सामाजिक चित्र तसेच पर्यायाने राजकीय चित्रसुद्धा पालटून टाकले आहे.

सहकारी साखर कारखान्यांनी आपल्या कामाचे गेल्या दहा वर्षांत केलेले विविधीकरण दुर्लक्षून चालणार नाही. मद्य, रसायन, आम्ल, कागद, पशुखाद्य यांची निर्मिती, रस्ते व घरबांधणी, जलसिंचन योजना राबविणे, गोबर गॅस संयंत्र उभारणे, विहिरी



खणणे, इस्पितळ, महाविद्यालय, तंत्रनिकेतन चालविणे, वाहतूक-पणन-दुग्धव्यवसाय अशा सेवा देणे अशा कितीतरी दिशांनी सहकाराचा वृक्ष फोफावला आहे.

सहकारी संस्थांमध्ये काम करण्यासाठी प्रशिक्षणाच्या सोयीही वाढविण्यात आल्या आहेत. सहकारी तत्त्वांची निरनिराळ्या क्षेत्रांत व तळागाळापर्यंत अंमलबजावणी करणे व दुर्बल घटकांना विकासाची समान संधी देणे यामुळे शक्य झाले आहे.

**कामगार**

उद्योगधंद्यामध्ये कामगार हा घटक अत्यंत महत्त्वाचा आहे. किंबहुना भांडवल किंवा यंत्रसामग्री उभारली गेली तरी कामगारांच्या उपयोगाशिवाय कोणतेही उत्पादन अशक्यच आहे. कामगारांचे वेतन, कामाच्या ठिकाणची परिस्थिती, कामाचे तास, औद्योगिक कलहाचे निवारण, कामगारांचे प्रशिक्षण, त्यांचे आरोग्य व कल्याणाच्या सोयी अशा अनेक अंगांनी कामगारांच्या समस्येचा विचार होतो. कारखान्यातील रोजगारीच्या बाबतीत महाराष्ट्राने सतत प्रथम क्रमांक ठेवला आहे.

कामगारांसंबंधीचे कायदे संमत करीत असताना कामगार व मालक यांचे संबंध सलोख्याचे राहावेत, कामगारांची पिळवणूक होऊ नये याबद्दल काळजी घेतली जातेच, परंतु कामगारांनी आपली उत्पादकता वाढवून अधिक उत्पादन करावे व त्यासाठी मालकाकडून त्याला त्याबाबतचा रास्त हिस्सा मिळावा असाही प्रगतिशील दृष्टिकोन यामागे आहे.

पूर्वीपासून मुंबई इलाखा विणकाम किंवा कापड गिरण्यांच्या बाबतीत देशात आघाडीवर राहिलेला आहे व त्यामुळे पर्यायाने गेली सुमारे पन्नास वर्षे राज्यातील कामगार चळवळ ही देशातील कामगार चळवळीची प्रातिनिधिक चळवळ बनली आहे. राज्यातील कामगारांवरील ही विशेष जबाबदारी ओळखून राज्य सरकारने सुरळीत औद्योगिक संबंध राखण्यासाठी मोठी यंत्रणा उभारली आहे. राज्यात कामगार संचालनालयाचे वेगळे कार्यालय असून त्यामार्फत औद्योगिक कलहांचे निरसन व निरनिराळ्या कामगार कायद्यांचे पालन अशी कामे केली जातात. राज्यात कारखाना कायदा, औद्योगिक कलह कायदा, औद्योगिक संबंध कायदा, कामगार संघटनांबाबतचा कायदा, बोनस कायदा, किमान वेतन कायदा, माथाडी कामगार कायदा असे कितीतरी कायदे अमलात आले आहेत. या कायद्यांची अंमलबजावणी काटेकोरपणे करण्यासाठी निरीक्षकांची मोठी फौज हाताशी आहे. कामगार आरोग्य व कल्याण यांच्याही सोयीमध्ये अभिमानास्पद वाढ झालेली दिसते.

आतापर्यंत दुर्लक्षित असलेल्या कित्येक उद्योगधंद्यांतील कामगारांना राज्यातील प्रगतिशील कामगार कायद्याचा लाभ झाला आहे. उदा. विडी कामगार कायदा (१९६६), माथाडी हमाल व इतर श्रमिक कायदा (१९६९), करारबद्ध कामगार कायदा (१९७०), वेठबिगारी निर्मूलन कायदा (१९७६) इत्यादी.

१९६१ साली राज्यात ८,२०० कारखाने व त्यात ३.८ लाख कामगार होते. आज या दोन्हींची संख्या वाढलेली असून राज्यात सुमारे १८,००० कारखाने व सुमारे १२ लाख कामगार आहेत. मात्र राज्यातील औद्योगिक विवादाकडेही लक्ष देणे जरूरीचे आहे. १९६१ साली राज्यात संप व टाळेबंदीची एकूण २३४ प्रकरणे झाली व त्यात सुमारे ८३ हजार कामगारांनी भाग घेतला. यातही प्रचंड वाढ दिसून येते. हाताशी असलेल्या ताज्या आकडेवारीनुसार गेल्या वर्षी राज्यात संप व टाळेबंदीची एकूण सुमारे ४०० प्रकरणे झाली व त्यात १.२३ लाख कामगारांनी भाग घेतला.

**उल्लेखनीय आर्थिक घडामोडी**

गेल्या पंचवीस वर्षांच्या काळात महाराष्ट्र राज्याने निरनिराळ्या आघाड्यांवर कसकशी प्रगती साधली याचा धावता आलेख आपण पाहिला. कोरडवाहू शेती, विकासाच्या अपुऱ्या सोयी, वाहतूक साधनांची कमतरता अशा मुलभूत अडचणींवर राज्याने यशस्वी मात केली व विकासाचा वेग कायम राखला. औद्योगिक प्रगतीची देशातील आघाडी मोडली नाही. इतकेच

*महाराष्ट्रात कापड गिरण्यांबरोबर हातमागालाही प्राधान्य देण्यात येते*



*ग्रामीण भागांतील दारिद्र्यरेषेखालील लोकांची स्थिती सुधारण्यासाठी त्यांना दुभती जनावरे, शेतीची अवजारे इत्यादी उत्पादक साधने पुरविण्यात येतात*



नव्हे तर हरित क्रांती व धवल क्रांतीचे कार्यक्रमही बव्हंशी यशस्वी करून दाखविले. दारिद्र्य, कुपोषण, अनारोग्य, बेकारी, दुष्काळ, टंचाई अशी अनेक आर्थिक संकटे सतत भेडसावत राहिली. परंतु नवनवीन विकास कार्यक्रमांनी या संकटांवर मात केली. यांपैकी काही वैशिष्टचपूर्ण कार्यक्रमांचा उल्लेख येथे थोडक्यात केला आहे. हे कार्यक्रम अभूतपूर्व असेच असल्याने संपूर्ण देशास मार्गदर्शक ठरले आहेत. १९७२ सालापासून सर्व राज्यभर लागू झालेल्या रोजगार हमी योजनेचे नाव या संदर्भात अभिमानाने घ्यावे लागेल. गरिबी हटविण्यासाठी बाहेरून मदत देण्याचे कार्यक्रम आखण्यापेक्षा गरजू व्यक्तीस स्वतःच्या गावाजवळच रोजगार पुरविण्याची हमी देणे, रोजगार पुरवता न आल्यास निर्वाहापुरता बेकार भत्ता देणे व अशा मार्गांनी गरीब लोकसंख्येच्या हातात स्थिर उत्पन्न देणे अशी ही क्रांतिकारी योजना आहे. यामार्फत रस्ते, जलसिंचन योजना, भूविकास, मृद्संधारण, पाझर तलाव अशी विकासाची कामे पार पाडण्यात आली. गेल्या सुमारे १२ वर्षांत या कामावर एकूण अंदाजे ५५० कोटी रुपये खर्च झाले आहेत. आंतरराष्ट्रीय तज्ज्ञांनीही या योजनेची वाखाणणी केली आहे. देशातील इतर काही राज्ये ही योजना राबविण्यास उत्सुक आहेत यावरून या योजनेचे यश लक्षात येते. गेल्या वर्षीच रोजगार हमी कामावरील मजुरीच्या दरात व बेकार भत्त्यात वाढ करण्यात आली व अनेक नवीन कामांचा यात समावेश करून ती अधिक व्यापक करण्यात आली.

१९७२ सालीच सुरू झालेली एकाधिकार कापूस खरेदी ही राज्यातील आणखी एक वैशिष्टचपूर्ण व क्रांतिकारी घटना. शेतकऱ्यांना पडत्या किंमतीला कापूस विकावा लागू नये, त्यांचे मध्यस्थ व व्यापाऱ्यांच्या पिळवणुकीपासून संरक्षण व्हावे, कपाशीची किंमत रोख मिळावी यासाठी ही योजना सुरू झाली. कपास पिकविणाऱ्या विभागांमध्ये अनेक खरेदी केंद्रे उघडल्याने शेतकऱ्यांची सोयच झाली. कापूस खरेदी करून त्यावर प्रक्रिया करणे, गासड्या बांधणे, सरकी काढणे अशी कामेही केली जातात. १९८२–८३ या एकाच वर्षी ४३८ कोटी रुपये किंमतीच्या



ग्रामीण जनतेसाठी अधिक रोजगार निर्माण करण्यासाठी छोट्या उद्योगानाही प्रोत्साहन देण्यात येते





*पिण्याच्या पाण्याची टंचाई असलेल्या गावांना पाणीपुरवठा करण्यासाठी युद्ध पातळीवरून प्रयत्न होत आहेत*



*बायोगॅस संयंत्र बसविण्यात देशात महाराष्ट्र आघाडीवर आहे. एक ग्रामीण महिला गॅसवर स्वयंपाक करताना*




प्रवरानगर (लोणी)येथील अद्ययावत रुग्णालय. साखर कारखान्यांनी अशी रुग्णालये काढल्यामुळे ग्रामीण भागांत अधिक वैद्यकीय सोयी उपलब्ध झाल्या आहेत



*धनगरांसारख्या भटक्या जमातींना स्थायिक करण्यासाठी मेंढीपालनाला प्रोत्साहन देण्यात येते*



कापसाची खरेदी करण्यात आली. केंद्र सरकारने देऊ केलेल्या आर्थिक सहाय्यामुळे ही योजना राबविणे शक्य होत आहे व ती चालू ठेवली जावी म्हणून राज्य शासनाचा पाठपुरावा चालू आहे.

महाराष्ट्र म्हणजेच सहकारी साखर कारखाने असे समीकरण देशात तयार झाले आहे. (सहकारी साखर कारखान्यांची माहिती याच प्रकरणात अन्यत्र दिली आहे.) सहकारी साखर कारखान्यांच्या मार्गाने राज्यात सामाजिक, राजकीय, औद्योगिक क्रांती घडून आली व गेल्या पंचवीस वर्षांत राज्याचा कायापालट झाला. १९९० पर्यंत राज्यात १२५ साखर कारखाने उभे राहतील अशी उमेद आहे. राज्यातील साखरेचा उताराही इतर राज्यांच्या तुलनेने अधिक आहे. साखर उत्पादनातून आज सरकारला सुमारे ९० कोटी रुपये निरनिराळ्या करांद्वारे मिळतात.

बेकारीचा भस्मासुर दिवसेंदिवस भयानक स्वरूप घेत आहे. त्यामुळे अधिक रोजगार निर्माण करणाऱ्या काही योजना जर खरोखर हाती लागल्या तर ती उल्लेखनीय बाब ठरते. १९७५–७६ पासून राज्यात अमलात असलेल्या रोजगार संवर्धन कार्यक्रमाचा उल्लेख अपरिहार्य आहे. याद्वारे किमान शालान्त परीक्षा उत्तीर्ण असणाऱ्यांना किंवा कोणत्याही उद्योगाचे जुजबी ज्ञान असणाऱ्यांना एखाद्या उद्योगकलेचे व्यावहारिक प्रशिक्षण दिले जाते. त्या मुदतीत त्यांना विद्यावेतनही दिले जाते. विद्यार्थ्यांची निवड करताना अनुसूचित जाती-जमाती, विमुक्त जाती या प्रकारातील विद्यार्थ्यांना प्राधान्य दिले जाते. गेल्या सुमारे दहा वर्षांत साठ हजारांपेक्षा जास्त व्यक्तींनी हे प्रशिक्षण मिळविले. बेकारीच्या एकूण समस्येकडे पाहता हा उपक्रम म्हणजे योग्य दिशेने टाकलेले पाऊल आहे.

१९७६ साली राज्य शासनाने टाकलेले आणखी एक प्रगतिशील पाऊल म्हणजे राज्यातील आदिवासींच्या आर्थिक प्रगतीसाठी संमत केलेला कायदा. आदिवासी विभागातील उत्पादनांच्या विक्रीमध्ये अशिक्षित आदिवासींची होणारी पिळवणूक टाळून त्यांच्या उत्पादनांची सहकारी संस्थांमार्फत खरेदी



'इ.स. २००० पर्यंत सर्वांसाठी आरोग्य' हे उद्दिष्ट दहा वर्षे आधीच पूर्ण करण्याचा महाराष्ट्राचा निर्धार आहे



कापड गिरण्या हा महाराष्ट्रातील सर्वांत मोठा उद्योग आहे



करण्याची सोय शासनाने केली. आज ह्या योजनेमार्फत भात, ज्वारी, वरई, नागली, तूर, उडीद, भुईमूग, मोहाचे बी, चवळी, चारोळी, डिंक, हिरडा अशा वस्तूंची खरेदी केली जाते. १९८२ या एका वर्षात १८ कोटी रुपयांच्या वस्तूंची खरेदी केली गेली. आदिवासी जनतेचा विकास व कल्याण यांच्या कार्यक्रमातील सुसूत्रतेसाठी राज्य शासनाने १ मे १९८३ पासून स्वतंत्र आदिवासी विकास विभाग निर्माण केला आहे.

**समारोप**

महाराष्ट्राच्या वाटचालीची आर्थिक बाजू मागील पानांमध्ये तपासली. जमीन, पाणीपुरवठा किंवा खनिजे यांच्या बाबतीत म्हणावी तितकी अनुकूल परिस्थिती नसताना महाराष्ट्राने विकासाचे प्रयत्न सोडले नाहीत. धंदा, व्यापार, आयात-निर्यात, बँक सेवा, उद्योगधंदे, सहकारी चळवळ अशा कितीतरी बाबतीत महाराष्ट्र अवघ्या देशास मार्गदर्शक ठरला आहे.

विकास ही सतत चालणारी प्रक्रिया आहे. महाराष्ट्रात आजही सुमारे ४८ टक्के लोकसंख्या दारिद्र्यरेषेखाली राहते. राज्यात कुपोषण मोठ्या प्रमाणावर आहे. राज्यातील हजारो खेड्यांना पिण्याचे पाणीही मिळू शकत नाही अशा गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे काही थोड्याशा निकषांनी पंचवीस वर्षांपूर्वी प्रगती तपासणे हे थोडे घाईचे व अन्यायाचे वाटते. १९६० साली विकासाचा राज्यातील केंद्रबिंदू पश्चिम भागाकडे झुकला होता. पण आज तो मध्य किंवा पूर्व महाराष्ट्राकडे हलविण्याचे सर्वांगीण प्रयत्न होत आहेत. तरीही विदर्भ व मराठवाडा यांच्या दृष्टीने अजून खूपच पल्ला गाठायचा आहे. शासनाने १९८४ साली नेमलेल्या प्रा. वि. म. दांडेकर प्रादेशिक असमतोल सत्यशोधन समितीने हीच गोष्ट अभ्यासपूर्ण पद्धतीने मांडली आहे. विकास कितीही साधला तरी यापुढील विकास कोणत्या दिशेने व किती वाव आहे याची जाणीव या सिंहावलोकनातून यायला हरकत नाही.



ग्रामीण भागातील बेकारी दूर करण्यासाठी रोजगार हमी योजनेद्वारा उत्पादक कामे हाती घेण्यात येतात. महाराष्ट्राने सुरू केलेली ही योजना आता राष्ट्रीय पातळीवरही हाती घेण्यात आली आहे



◁ महाराष्ट्रीय पद्धतीचा साजश्रृंगार
करीत असलेली ललना

कैलास पर्वतावर शिव-पार्वती पर्वत हलविण्याचा रावण प्रयत्न करीत आहे
वेरूळच्या लेण्यातील अप्रतिम शिल्प



'अंधकासुरवध' : वेरूळच्या लेण्यातील बोलके शिल्प

जटायुवधाचे सुंदर शिल्प : वेरूळची लेणी ▷



कार्ला लेण्यांच्या भिंतीवरील बुद्ध मूर्ती व मिथुन युगुले

गंगेचे पावित्र्य व सौंदर्य दर्शविणारे आकर्षक शिल्प : वेरूळची लेणी ▷



नागनाथ मंदिरातील सुरेख अश्वशिल्पाचे अवशेष



त्र्यंबकेश्वर
येथील
सुंदर
शिवमंदिर



औंढा नागनाथ येथील शिवमंदिरातील शिल्पसौंदर्य



महाराष्ट्राचा कणा असलेल्या सह्याद्रीचे विहंगम दृश्य



रायगडावरील राणी महालांचे अवशेष



झाशीची राणी वीरांगना लक्ष्मीबाईचा पुणे येथील अश्वारूढ पुतळा



येथील प्रसिद्ध शालिनी पॅलेस



महाराष्ट्राचे एक
आराध्यदैवत:
जेजुरीचा
खंडोबा.
खंडोबाचे मंदिर
व दीपमाळ



ोहमयी मुंबापुरीची विविध दृश्ये : Δ रात्री प्रकाशमय झालेला मरीन ड्राइव्ह Δ व्हिक्टोरिया टर्मिनस: अप्रतिम वास्तुशिल्प
Δ हुतात्मा चौकातील कारंजाचे सुंदर शिल्प (फ्लोरा फाउंटन) Δ मुंबई महानगरपालिका Δ मुंबई विद्यापीठाच्या आवारातील राजाबाई टॉवर
Δ महाराष्ट्र विधानभवनाची भव्य वास्तू Δ माहीम येथील सूर्यास्ताचा मनोरम देखावा



वाईचा घाट : सूर्योदयाचे प्रासादिक वातावरण

पुढील पानावर : माउंट मेरी चर्च व पारशी अग्यारी, मुंबई



*शिखांचे दहावे गुरु गोविंदसिंह यांनी अखेरच्या दिवसांत नांदेड येथे वास्तव्य केले व तेथेच देह ठेवला. त्यांच्या स्मरणार्थ बांधलेला हा गुरुद्वारा. महाराष्ट्राच्या संत नामदेवांनी भागवत धर्माची पताका पंजाबात नेली. त्यांचे अभंग ग्रंथसाहेबमध्ये आहेत. भारतीय संस्कृतीच्या एकात्मतेचे हे अद्वितीय उदाहरण!*



सेवाग्राम येथील महात्मा गांधींच्या कुटीत त्यांच्या नेहमीच्या वापरातील वस्तू जपून ठेवण्यात आल्या आहेत. महात्माजींची कुटी हे आधुनिक भारताचे तीर्थस्थान झाले आहे



रानात असूनही आनंदी आदिवासी...



..तालबद्ध कोळी नृत्य . . .



. . .आणि रांगडे आदिवासी नृत्य



गणेश उत्सवाची रंगतदार मिरवणूक

गोकुळ अष्टमीला दहिहंडी फोडण्यासाठी मानवी मनोरा ▷




मोहरमनिमित्त ताजियांची मिरवणूक



. . . अन् बांबूपासून टोपल्या विणणे . . .



*. . . मासेमारीसाठी जाळे लावणे . . .*



भारत
उ
० २०० ४०० ६००
कि.मी.
अहमदाबाद
मुंबई
अरबी
समुद्र
बेळगांव
बंगालचा उपसागर
मुंबई
इलाखा
१८६२ - १९३७
हिंदी
महासागर




भारत
उ
० २०० ४०० ६००
कि.मी.
अहमदाबाद
मुंबई
अरबी
समुद्र
बेळगांव
बंगालचा उपसागर
मुंबई
प्रांत
१९३७-१९५९
हिंदी
महासागर







बदलत्या सीमा : पूर्वीच्या मुंबई इलाख्यापासून आजच्या महाराष्ट्र राज्यापर्यंत



*आकर्षक पाहुण : धरण योजनांच्या जलाशयांमुळे परदेशांतील अनेक पक्षी महाराष्ट्रात स्थलांतर करू लागले आहेत*